विठ्ठल बीडकरकृत

# सीता स्वयंवर

( हस्तलिखितावरून तयार केलेली पाठशुद्ध प्रत
मूळ, प्रस्तावना, पाठभेद, टीपा व शब्दकोश यांसह )


: संपादक :

दत्तात्रय सीताराम पंगु
राजाराम कॉलेज कोल्हापूर






वर्षप्रतिपदा शके १८७३
७ एप्रिल, १९५१

किंमत ४ रुपये

स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.

# विठ्ठल बीडकर



## ( चरित्र व काव्यविवेचन )

मराठी वाङ्मयांत आख्यानक काव्याचा प्रारंभ मुख्यतः भास्करभट्ट दामोदर पंडित, व नरेंद्र इत्यादि महानुभावी कवींनीं आपल्या अनुक्रमें शिशुपालवध, वच्छहरण, व रुक्मिणीस्वयंवर या भागवती आख्यानांनीं केला असला, तरी हें सर्वच वाङ्मय महानुभावपंथीयेतरांना अज्ञात राहिल्यानें, शिवकालांत उदयास आलेल्या आख्यानक कवींना, श्रीएकनाथांचें रुक्मिणी-स्वयंवर हें भागवती आख्यानकाव्यच विशेष प्रेरक व प्रोत्साहक व्हावें, यांत नवल नव्हतें. तथापि या सर्वच आख्यानक कवितेकडे थोडा सूक्ष्म दृष्टिक्षेप केल्यास, शिवकालाच्या प्रथम पादापर्यंतच्या या वाङ्मयावर, भागवत संप्रदायाची अथवा कृष्णभक्तीची जी एक विलक्षण छाप बसली आहे, ती मात्र शिवकालाच्या उत्तर विभागांत नव्यानेंच पण अधिक जोमानें उचल खाल्लेल्या श्रीसमर्थसंस्थापित रामसांप्रदायाच्या प्रसारामुळें, पुष्कळच ओसरलेली आढळून येते. वामनपंडित-सामराजासारखे शिवकालारंभींच आख्यान-कवी, भावनेनें व तत्त्वज्ञानानें श्रीएकनाथांना अधिक जवळचे असल्यानें, त्यांनीं जशी प्रामुख्यानें कृष्णभक्तिपर व कृष्णचरित्रपर काव्यरचना केली, त्याप्रमाणेंच शिवकालाच्या द्वितीय पादांत उदय पावलेल्या वेणाबाई, नागेश, आनंदतनय, गोसावीनंदन व अनंत इत्यादि कवींनीं पुनः श्रीएकनाथांची धर्ती व रचनापरिपाटी स्वीकारून देखील, जी सीतास्वयंवरासारख्या राम-चरित्रपर आख्यानावर रचना केलेली दिसून येते, तिला पूर्वीच्या थोड्या फार निवृत्तिपर भागवतधर्मांत प्रवृत्तीचें अथवा व्यवहाराचें नवचैतन्य

ओतून त्याला महाराष्ट्रधर्माचें नवीन व तत्कालीं अवश्य तें युयुत्सु स्वरूप देणारा श्रीसमर्थांचा रामसांप्रदायच मुख्यतः कारणीभूत झाला, असें म्हटलें पाहिजे शिवकालाचें वैशिष्ट्य याप्रमाणें जसें रामदासांच्या वैचारिक स्वातंत्र्यात आहे, तसेंच तें तत्कालीन अनेक कलाकवींच्या उदयांत आहे. यामुळें आमचे प्राचीन मराठी कवी गीर्वाण कविपरंपरेपैकीं नाहींत असा जो [1]आरोप, डॉ. केतकर यांनीं केला आहे, तो अंशतः तरी उडवून टाकण्याचें श्रेय, वामन, सामराज, नागेश, विठ्ठल, रघुनाथपंडित व आनंदतनय या कलाकविमालिकेनें संपादिलें आहे, हें निःसंशय. या सर्व कवीनीं कालिदास, भारवी, माघ व श्रीहर्ष या महाकवींच्या काव्यांच्या पद्धतीवर जी सगुण सालंकार रचना केली आहे, तिनें प्राचीन मराठी काव्यवाङ्मयात आख्यानकवींचें एक स्वतंत्र व अभिनव दालन उघडलें आहे. संस्कृत महाकवीप्रमाणेंच एकादा पौराणिक कथाभाग अगर स्वयंवरप्रसंग घेऊन त्यावर आपल्या कल्पनाशालित्वानें स्वतंत्र अशा महाकाव्याची अथवा आख्यानकाव्याची इमारत उभारण्याची महत्त्वाकांक्षा, वरील मराठी कलाकवीपैकीं प्रत्येकानें धरली असल्याचें त्यांच्या कृतीवरून स्पष्ट दिसतें. तरी पण संस्कृत महाकाव्यांच्या किंवा खंडकाव्यांच्या धर्तीवर मराठींत तशी रचना करण्याची स्फूर्ति होण्यास, तत्कालीन राजकीय वातावरणच अप्रत्यक्षपणें कारणीभूत झालें, हें मात्र निर्विवाद आहे. कवींच्या मनांत महाकाव्याचा अगर आख्यानकाव्याचा उदय होण्यास, राजकीय स्वातंत्र्य, स्वराज्य, राजाश्रय, संपन्नता व स्वास्थ्य अशा अनकूल परिस्थितीची अपेक्षा असते. यादवांच्या साम्राज्यनाशाबरोबरच महाराष्ट्राचें स्वातंत्र्य नष्ट झाल्यामुळें, महाकाव्याला अगर आख्यानकाव्यासारख्या प्रदीर्घ रचनेला स्फूर्ति देणाऱ्या पुरुषांचा व प्रसंगांचा, पुढें सारखा तुटवडाच पडत चालला. परकेपणा, लाचारवृत्ति व स्वाभिमानशून्यता सर्वत्र बोकाळल्यामुळें, स्वत्वानें, स्वाभिमा-

---

१ महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण.

नानें व राजनिष्ठेनें प्रेरित झालेलें महाकाव्य अथवा आख्यानकाव्य, या मध्यंतरींच्या कालांत झालेंच नाहीं. शिवाय या राजकीय संक्रमणावस्थेच्या कालांत प्रत्येकाला आपला धर्म व स्वत्व टिकविण्याची चिंता लागून राहिल्या-मुळें, स्वतंत्र व प्रदीर्घ काव्यरचनेला अवश्य असणारें मनःस्वास्थ्य व अवसरही तत्कालीन कवींना मिळालेला नसावा. श्रीएकनाथांचा काल व तत्कालीन वाङ्मय हें अशा दुःस्थितींत सांपडलेल्या महाराष्ट्राचें अंतरगत दर्शवितें.

पण पुष्कळ काळ विपत्ति भोगल्यानंतर आचानक सुखसमृद्धीचीं चिन्हें दिसावीं, किंवा अनेक दुःखांतूनच भावी सुखांचा जन्म व्हावा, अशीच कांहींशी स्थिति श्रीशिवछत्रपतींच्या उदयकालीं महाराष्ट्राची झाली होती. मुसलमानी अंमलाची दुःखें असह्य झाल्यामुळें, त्यांतून आपली कायमची सुटका कर-णारा कोणी प्रभावी असा अवतारी पुरुष लवकरच जन्म घेणार, अशी आशा महाराष्ट्रांतील आबालवृद्धांना वाटूं लागली होती; व तिचेंच स्पष्ट प्रतिबिंब मुक्तेश्वर–लोलिंबराजांच्या स्वतंत्र व भावपूर्ण काव्यकृतींत पडलेलें दृष्टोत्पत्तीस येतें. भावीं स्वातंत्र्याची आशा व सांप्रदायनिरपेक्षता या दोन गोष्टीं स्वतंत्र काव्यरचनेला जन्म देण्यास यावेळीं जशा प्रवृत्त झाल्या, तशाच त्या पुढील आख्यानकवींच्या अथवा कलाकवींच्या ललित मनोहर काव्यमंदिरांची उभारणी करण्यासही कारण झाल्या. मुक्तेश्वर हा श्रीएकनाथांचा नातू असूनही त्यांच्याप्रमाणें भागवतसांप्रदायासारख्या एका विशिष्ट अध्यात्मिक पंथाचा तो जसा अनुयायी नव्हता, तसाच लोलिंबराज देखील एक स्वतंत्र वृत्तीचा रसिक असल्यानें, काव्यांतरिक्षांत मनसोक्त भराऱ्या मारण्यास त्यालाही कस-लाच प्रत्यवाय नव्हता. पुढें तर श्रीशिवरायांच्या सर्वत्र दिग्विजयानें व त्यांच्या वैभवसंपन्न व डोळ्यांचें पारणें फेडणाऱ्या राज्याभिषेकानें कवींची ही स्वतंत्रवृत्ति अथवा प्रतिभा अधिकच फोंफावूं लागून, मराठी वाङ्मयांत

प्रदीर्घरचनेचा जो एक प्रचंड वृक्ष वाढीस लागला, तो सहजच अनेक आख्यानकाव्यांच्या फुलाफळांनीं बहरला. वामन, सामराज, नागेश, रघुनाथपंडित व आनंदतनय हे आख्यानकवी ज्ञानभक्तीचे उपासक असले, तरी महाराष्ट्रांत तत्कालीं रूढ असणाऱ्या कोणत्याही एका विशिष्ट पंथाचे अनुयायी नव्हते. वामन किंवा सामराज यांना वर सांगितल्याप्रमाणें कृष्णभक्ति विशेष प्रिय असेल, तर समर्थ रामदासांनीं रूढ केलेल्या कोदंडधारी रामचंद्राची उपासना तत्कालीं अधिक प्रभावी असल्याचें दिसून आल्यामुळें, नागेश, विठ्ठल, रघुनाथपंडित, आनंदतनय व गोसावीनंदन हे आपणास रामभक्त म्हणवीत असतील. तरी पण महानुभावपंथ व नाथपंथ यांच्याप्रमाणें रामदासांचा रामसांप्रदाय संकुचित स्वरूपाचा दिसत नाहीं. प्रत्यक्ष पंथप्रसाराचें कार्य रामदासांनीं नेमलेले भिन्न भिन्न मठाधिपति आपापल्या मठांच्या द्वारां करीत असल्यामुळें, रामभक्ति प्रिय असणाऱ्या इतरांना सांप्रदायनिरपेक्ष असें बुद्धिस्वातंत्र्य दाखवून काव्यरचना करण्यास पूर्ण मुभा होती. रामदासांचा हा रामसांप्रदाय महाराष्ट्रांत रूढ झाल्यावरच, ‘ सीतास्वयंवर ’ प्रसंगावर जवळ जवळ १९ कवींनीं जी सगुण सालंकार अशी आख्यानरचना केली तिचें मर्म हेंच कीं, ही उपासना करीत असतांना मठाधिपतीशिवाय इतरांना आपल्या कवित्वशक्तीचा उपयोग सांप्रदायप्रसाराकडेच केला पाहिजे, असा निर्बंध त्यांच्यावर लादला गेलेला नव्हता. रघुनाथपंडित, आनंदतनय व गोसावीनंदन इत्यादि कर्नाटक प्रांतीय मराठी कवी रामदासांचे भक्तच होते. पण त्यांनीं अनुक्रमें नलदमयंतीस्वयंवर व सीतास्वयंवर या प्रकरणांवर संस्कृत काव्यांचा पध्दतीवर जी मराठी रचना केली आहे, ती सांप्रदायनिरपेक्ष अशीच आहे. उलटपक्षीं भास्करभट्ट महानुभावाला आपल्या ‘ शिशुपालवध ’ या नितांत सुंदर आख्यानरचनेबद्दल आपल्या गुरुबंधूकडून ‘ हा ग्रंथ निवृत्तिमार्गीयाजोगा नव्हेचि ’ असा शेरा ऐकून घ्यावा लागून, निवृत्तिमार्गीयाजोगा असा ‘ उद्धवगीता ’ हा पंथप्रणीत दुसरा ग्रंथ पुनः

लिहावा लागला. सारांश शिवकालांतच कलाकवी अधिक प्रमाणांत निर्माण होण्याचीं मुख्य कारणें म्हणजे, स्वराज्यामुळें प्राप्त झालेली स्वस्थता, संपन्नता व सांप्रदायनिरपेक्षता हींच होत, यांत मुळींच संशय नाहीं. आमचा विठ्ठल बीडकर देखील असाच एक सांप्रदायनिरपेक्ष कवि असून, वामन, सामराज, नागेश, रघुनाथपंडित, आनंदतनय इत्यादि तत्कालीन आख्यानकविमालिकेंतच त्याचाहि समावेश होतो.

## विठ्ठलाची वैयक्तिक माहिती

विठ्ठलाची थोडी फार माहिती, त्याच्या काव्यांच्या शेवटच्या श्लोकांत त्यानेंच नमूद करून ठेवली आहे. हा कवि आपणास विठ्ठल-दास, सत्कविराज विठ्ठल, कवींद्र विठ्ठल अशा नांवानीं उल्लेखीत असून, आपण आश्वलायन शाखी ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण असल्याचें व मोंगलाई-तील बीड परगण्याखालील गौरीपूर हें आपलें मुख्य वसतिस्थान असल्याचें, त्यानें आपल्या काव्यग्रंथांत अनेक [१]ठिकाणीं सांगितलें आहे. शिवाय आपलें आडनांव क्षीरसागर असल्याचें त्यानें '[२]दुग्धसागरकुलालंकारचूडामणि' या आत्मगौरवपर विशेषणानें जसें सूचित केलें आहे, तसेंच आपल्या वडिलांचें नांव [३]अनंत असल्याचें, आपली वृत्ति [४]व्यापाऱ्याची असून आपण हरिभक्त असल्याचें, व त्यांतूनही पुनः आपण वर्षादिसा पंढरपुरास जात [५]असल्याचें, त्यानें मोठ्या साक्षेपानें ग्रथित करून ठेवलें आहे.

## विठ्ठलाचा विनय व आत्मविश्वास

तथापि एकंदरीनें पाहिल्यास विठ्ठल जसा विनयशाली आहे, तसाच मराठी भाषेचा [६]अभिमानही त्याला कांहीं कमी होता असें नाहीं. आपणास

---

१ सीतास्व–७।४६; रुक्मिणीस्व—उपसंहार. २ रुक्मिणीस्व–उपसं. ३ पांचाली-स्तवन–२२. ४ विठ्ठजीवन–सज्जनप्रार्थना–५. ५ विठ्ठजीवन–सज्जन–प्रार्थना–४. ६ सीतास्व– ११९.

छंद, बंधरचना, नवरस, अलंकार इत्यादि साहित्यशास्त्राचे प्रकार व विभक्ति किंवा कोशादिक असे व्याकरणाचे प्रकार अवगत नसून, आपल्या गांठीं फक्त मराठी भाषाच काय ती असली, तरी त्या भाषेंत सुरस शब्दयोजनाहि आपणास करतां येत नाहीं, अशी तो मोठ्या प्रांजळपणानें कबुली [1]देतो. आपण कोणतेच शास्त्रार्थ जसे पाहिले नाहींत, तसे काव्य, नाटक, रस अलंकार व छंद यावरील ग्रंथही अवलोकन केले नसल्यानें, आपल्या काव्यांत जे कांहीं दोष घडले असतील, ते क्षमा करून आपणास धीर द्यावा, अशी त्यानें चतुर वाचकांना आणखीही मोठ्या अजीजीनें प्रार्थना केली [2]आहे. तसेंच आपण केलेला हा संस्कृत काव्याचा अनुवाद, मराठी चतुर वाचकांना जर मान्य झाला, तर आपणास अशीच काव्यरचना करण्यास अधिक उत्साह येईल, अशी आमच्या कवीनें रसिकांच्या कौतुकाची अपेक्षाहि व्यक्त केली आहे[3]. शिवाय आपल्या ग्रंथांत कांहीं चुका आढळल्यास त्यांच्याकडे लक्ष न देतां, विद्वज्जनांनीं तो वाचावा अशी विनवणी करतांना, ग्रंथांत शब्दार्थांच्या व पदबंधाच्या चुका या व्हावयाच्याच, तरी पण तो गोड मानून घ्यावा अशी त्यानें पुनरपि त्यांना विनंति केली आहे[4]. पण विठ्ठलाच्या या विनयाची किंवा रसिकाबद्दल त्यानें दाखविलेल्या आदरभावाची परिणति मात्र न्यूनगंडांत झालेली नाहीं, हें येथें स्पष्ट करणें अवश्य आहे. उलटपक्षीं आपणास कविवर, कवींद्र, सत्कविराज व वित्पन्न, अशा अगदीं शेलक्या बहुमानदर्शक विशेषणांनीं तो आपणा स्वतःस भूषवीत असल्यानें, त्याचा आपल्या कवित्वाधिकाराबद्दल अथवा विद्वत्तेबद्दल जसा आत्मविश्वास व्यक्त झाला आहे, तसेंच आपल्या पद्यरचनेंत पादपूरणार्थक अथवा गौण शब्द नाहींत[5] असें छातिठोकपणानें सांगतांना, पद्यरचनेवरील आपलें प्रभुत्वही लोकनिदर्शनास आणण्याची त्यानें बरीच खबरदारी घेतली आहे,

१ सीतास्व-१।९. २ विद्वज्जीवन-१।१०. ३ सीतास्व-१।९-१०
४ विद्वज्जिवन-७। सज्जनप्रार्थना-१. ५ सीतास्व-३।१.

असें दिसून येतें. त्याच्या कवितेचें सूक्ष्म वाचन केल्यानंतर मात्र, वृत्त-सुखार्थ त्यानें मूळ शब्दांतील ऱ्हस्वदीर्घाच्या केलेल्या ओढाताणीचा[1] प्रत्यय घेऊन, सहृदय वाचक, त्याचें वरील विधान तितक्याशा परमार्थानें घेतील किंवा नाहीं याबद्दल शंका वाटते.

## विठ्ठलाचें औदासिन्य

तरी पण विठ्ठलाच्या कवित्वाचा हा जोष व उपरिनिर्दिष्ट आत्म-विश्वास, धनिकांनीं त्याच्या कवितेचें द्रव्यद्वारां कौतुक केलें नाहीं, म्हणून शेवटीं शेवटीं अगदीं फिका पडल्याचें अनुकंपनीय दृश्य आपणास त्याच्या काव्यांतच पहावयास सांपडतें. आपण आपल्या कल्पलतेला रायपुरी साखरेचें आळें बांधलें, व बहुत श्रमानें तिला कामधेनूच्या दुग्धानें शिंपली, पण तिला सुवासिक पुष्पें यावयाच्या ऐवजीं रुईचीं फुलें येऊन आपली पुरती निराशा झाली, असें ज्या अर्थीं कवि म्हणतो[2], त्या अर्थीं आमच्या कवीनें कवित्वाचे एवढे सायास केवळ द्रव्यासाठीं केल्याचें पाहून व त्यांतूनही त्याच्या पदरीं आलेलें अपयश पाहून, कोणालाही त्याच्याबद्दल करुणा आल्याशिवाय राह-णार नाहीं. शिवकालांतील सामराज व नागेश यांना अनुक्रमें छत्रपतींचा व यशवंतराव कोकाटे सरदारांचा आश्रय लाभल्यानें, आपापली कविता त्यांना द्रव्यापायीं कोणापुढें नाचविण्याचें कारण नव्हतें. विठ्ठलाला उलट तसा कोणा श्रीमंताचा आश्रय नसला, तरी त्याचा मूळ व्यवसायच व्यापाऱ्याचा असल्यामुळें, त्याला सुद्धां निदान आपल्या चरितार्थाकरतां दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची पाळी आली नसावी, ही जी वाचकांची अपेक्षा, ती विठ्ठलाच्या उद्गारांनींच येथे फोल ठरलेली पाहून, त्यांना देखील त्याच्या-बद्दल उद्वेग वाटणें साहजिक आहे. विठ्ठलाला त्याच्या व्यापारी व्यवसायांत

१ सीतास्व–२।४८; ४।३; ४।५२, ५५; ५।४८; ६।२१, २३.

२ विद्वज्जीवन–१।१९.

म्हणावा तसा अर्थलाभ होत नसावा हेंच खरें. म्हणून जठराग्निशांतीसाठीं आपली वाणी त्याला गर्वानें अंध व बधिर झालेल्या धनिक लोकांपुढें नाचवावी लागली[1], व त्यांनीं त्याच्या काव्याचें कौतुक करून अपेक्षित द्रव्यदानानें त्याला न गौरविल्यामुळें[2], शेवटीं निराशा पदरीं बांधून घेऊन आपल्या वांछापूर्तीसाठीं श्रीपांडुरंगाकडे त्याला धाव घ्यावी लागली[3]. रघुनाथपंडितालासुद्धां एवढ्या राजदरबारांत वागूनही शेवटीं, 'भाताच्या तजविजीची' चिंता जशी करावी लागली, व त्यलाही 'धनिक करी वंचना नेदी तिळभरही कांचना[4]' अशी तक्रार करणें जसें भाग पडलें, अथवा आधुनिक कालांतील थोडें निराळें उदाहरण घ्यावयाचें झाल्यास, केशवसुतांनासुद्धां "जें पृथ्वीवर आणिलें जन तया धिक्कारिती हो! कसें ?" असा आपल्या कवितेची उपेक्षा करणाऱ्यांचा साश्चर्य निषेध जसा करावासा वाटला, त्याचप्रमाणें विठ्ठलानें आपल्या काव्याची बूज न राखणाऱ्या तत्कालीन श्रीमंत व गर्विष्ठ धेंडांचीं हजेरी घेण्याची संधि, आपल्या काव्यांत त्यांचा सर्वसाधारण निर्देश करून साधून घेतली, असेंच फार तर येथें म्हणतां येईल.

## विठ्ठलाचे काव्यग्रंथ

आणि तसें पाहावयास गेलें, तर तत्कालीन धनिकांनीं अगदीं जाणूनबुजून नाकें मुरडावीं इतकी कांहीं विठ्ठलाची ग्रंथसंपत्ति खास उपेक्षणीय नाहीं. त्याच्या नांवावर (१) **पांचालीस्तवन** ( श. १५९६ ) (२) **रुक्मिणीस्वयंवर** ( १५९६ ), (३) **सीतास्वयंवर** ( १५९९ ), (४) **रसमंजरी** ( १६०१ ), (५) **द्रौपदीवस्त्रहरण** ( १६०२ ), (६) **विद्वज्जीवन** व **बिल्हणचरित्र** इतके काव्यग्रंथ मोडत असून, ते 'काव्यसंग्रहांत' छापलेले आहेत. 'पांचालीस्तवन' या त्याच्या पहिल्या

१ विद्वज्जीवन–१।१३. २ विद्वज्जीवन–१।१६. ३ विद्वज्जीवन–१।१९.
४ दमयंतीस्व–१८३.

काव्यांत, द्रौपदीचा धावा २३ श्लोकांत वर्णिला असून, त्याच वर्षांत 'रुक्मिणीस्वयंवर' या संस्कृत महाकाव्याच्या धर्तीवर रचलेल्या सप्तसर्गात्मक भागवती आख्यानांत, भिन्न भिन्न गणवृत्तें, छत्र, चामर, पट्टीश, द्वादशकमल, वापी, माला, धनुर्बाण, अश्व, उष्ट्र व्यजन, चक्र, स्वतिक, वृक्ष, सर्प इत्यादि विविध बंध, चमत्कृतिजनक यमकश्लेषानुप्रासादि शब्दालंकार, विठ्ठलानें इतके खचून भरले आहेत कीं, तेथें काव्याच्या मूळ कथानकाकडे किंवा त्यांतील रसाविष्काराकडे लक्ष देण्यास वाचकाला मुळीं अवसरच सांपडूं नये! आपलें काव्य, माघ व श्रीहर्ष या महाकवींच्या काव्यांच्या तोडीचें निपजावें असा अभिनिवेश धरतांना, आमच्या कवीनें त्यांच्या इतर श्रेष्ठ काव्यगुणांचें अनुकरण करण्याऐवजीं, चित्रकाव्यरचनेसारख्या शाब्दिक कसरतीवर जो विशेष जोर दिला आहे, तो मराठी वाङ्मयांत अपूर्व असला, तरी अशा अव्यंग्य रचनेला कोणी उच्च कोटीला बसवीत नाहीं, हें त्याच्या तरी लक्षांत यावयास पाहिजे होतें. यानंतर तीन वर्षांनीं रचलेलें 'सीतास्वयंवर' ही असेंच सप्तसर्गात्मक असलें व त्यांत एक दोन ठिकाणीं चित्रबंधरचना असली, तरी विठ्ठलानें तेथें आपल्या रुक्मिणीस्वयंवराप्रमाणें प्रतिलोम यमकांची[1] अथवा कूटश्लोकांची[2] योजना करून निष्कारण क्लिष्टता आणलेली दिसत नाहीं. तरी या दोंनीं स्वयंवरांच्या मांडणींत व रचनेंत शेवटीं शेवटीं जें लग्नांतील सोहळ्यांचें, याज्ञिक विधींचें व मंगलाष्टकांचें वर्णन आलें आहे, त्यावरून आमच्या कवीवर श्रीएकनाथांच्या 'रुक्मिणीस्वयंवरा' चा कसा दृढ संस्कार झाला आहे, तें मात्र चांगलेंच प्रत्ययास येऊन, त्यानें देशीं भाषेंतून घेतलेल्या ऋणाचाही कांहींसा उलघडा होतो. आमच्या कवीचा यापुढील 'रसमंजरी' हा काव्यग्रंथ, भानुदासकृत संस्कृत रसमंजरीचा निवळ अनुवाद असून तो शहागड येथें रचल्याचें त्यानेंच त्या ग्रंथाच्या अंतिम श्लोकांत सांगितलें आहे. या काव्यांत विठ्ठलानें नवरस, षोडश नायिका,

---

१ रुक्मिणीस्व–६।३३. २ रुक्मिणीस्व–१।२५.

सखीकर्म, दूतिकर्म, पतिभेद, नायकभेद, अष्टसात्विकभाव, शृंगारभेद, दशस्मरावस्था व दर्शनत्रय इत्यादींचें तीन उल्लासांत व सुमारें १२२ श्लोकांत विषयानुरोधानें जें वर्णन केलें आहे तें त्याच्या इतर रचनेच्या मानानें बरेंच प्रासादिक उतरलें आहे. विठ्ठलाचा नेहमींच आपल्या ग्रंथाच्या शेवटीं आपल्या शाखेचा, गोत्राचा, गांवाचा नांवाचा व रचनाकालाचा स्पष्ट उल्लेख करण्याचा शिरस्ता आहे, व तो त्यानें आपल्या शिवचरिणी वृत्तांतल्या, 'द्रौपदीवस्त्रहरणा' पर्यंत साक्षेपानें जसा पाळलेला दिसतो, तसा तो त्याच्या 'विद्वज्जीवन' व 'बिल्हणचरित्र' या दोन काव्यांत पाळलेला दिसत नाहीं. तथापि 'विद्वज्जीवन' हा त्याचाच ग्रंथ आहे, हें त्याच्या शैलीवरून जसें कोणीही सांगू शकेल, तसाच तो त्याच्या उतारवयांत व जगाच्या कटु अनुभवानें पोळलेल्या मनःस्थितींत लिहिलेला आहे, हें त्यांतील कवीनें काढलेल्या आत्मचरित्रपर कळवळ्याच्या उद्गारावरून समजण्यासारखें आहे. या काव्याचेही सात उल्लास असून, त्यांत कवीनें भागवताच्या दशमस्कंदांतील कृष्णकथांचें निरूपण, आपल्या नेहमींच्या पद्धतीनें अनेक गणवृत्तांत केलें आहे. विद्वानांना केवळ जीवन देणारी भागवती कथा हा या ग्रंथाचा विषय असल्यानें, विठ्ठलानें या आपल्या काव्याला 'विद्वज्जीवन' असें जें थोडें सूचक नामाभिधान दिलें आहे, तें यथार्थ आहे असेंच म्हटलें पाहिजे. शेवटचें 'बिल्हणचरित्र' मात्र बीडकर विठ्ठलाचें नसावें, असें कै. भाव्यांप्रमाणेंच[1] माझेंही मत आहे. यांत योजलेली साधी शुद्ध भाषा, शब्दालंकारांचा अभाव, व रसानुकूल वर्णरचना, या अंतर्गत गोष्टी जशा त्याच्या कर्तृकत्वाच्या आड येणाऱ्या आहेत, तसाच काव्याच्या शेवटीं विठ्ठलाच्या शिरस्त्याप्रमाणें असणाऱ्या रचनाकालाचा व आत्मचरित्रपर उल्लेखाचा अभाव, या वरवर दिसणाऱ्या गोष्टी देखील या काव्याचें कर्तृत्व दुसऱ्या कोणत्या तरी विठ्ठलाचें असावें

---

१ महाराष्ट्र सारस्वत—आवृत्ति २ रीं— पृ. ८५.

अशा संशयाला जागा देणाऱ्या आहेत. 'काव्यसंग्रहांत' बीडकर विठ्ठल, दीक्षित विठ्ठल व केरीकर विठ्ठल अशा तीन विठ्ठलांची कविता एकत्र छापलेली असली, तरी बीडकर विठ्ठलानें आपल्या काव्यांच्या शेवटीं केलेल्या आत्मपर उल्लेखांनीं तरी निदान त्याच्या काव्यांची होणारी गफलत टळल्यासारखी झाली आहे.

## विठ्ठलाची व्युत्पन्नता व विद्वत्ता

त्यांतूनही पुनः विठ्ठलाची विद्वत्ताच आजमावयाची झाल्यास, त्याच्या काव्यग्रंथांचीं नुसतीं नावें व त्यांचें अंतरंग थोडें आस्थेनें पाहिलें तरी सुद्धां भागण्यासारखें आहे. त्याचीं 'पांचाळीस्तवन' व 'द्रौपदीवस्त्रहरण' हीं आख्यानें जशीं त्याच्या महाभारताच्या परिचयाचीं द्योतक आहेत, तसे त्याचे 'रुक्मिणीस्वयंवर' व 'विद्वज्जीवन' हे काव्यग्रंथ, त्याचा महाभागवताच्या दशमस्कंदाचा दृढ अभ्यास व्यक्त करणारे आहेत. त्यानें भानुदासाच्या संस्कृत रसमंजरीचा केलेला मराठी अनुवाद तर, त्याच्या संस्कृतभाषाप्रभुत्वाची उत्तम साक्ष देणारा असून, 'सीतास्वयंवर' या आपल्या आख्यानास पुनः

> " कांहीं 'श्रीहनुमंतनाटक कथा' कांहीं रघूवंशिची ।
> कांहीं आदिकविप्रमेयरचना, कांहीं गिरा देशिची ॥ "

याप्रमाणें वाल्मीकी रामायण, रघुवंश, हनूमन्नाटक इत्यादि काव्यनाटकांचा त्यानें घेतलेला [1]आधार, वरील विधानास अधिकच पुष्टि देणारा आहे. स्वतंत्ररचनेपेक्षां विठ्ठलाची एकाद्या संस्कृत ग्रंथाच्या अनुवादावर भिस्त अधिक, हें त्याच्या सीतास्वयंवराच्या चवथ्या सर्गाचा ३४ वा श्लोक, व पांचव्या सर्गाचा ५ वा व १९ वा श्लोक, हे अनुक्रमें हनूमन्नाटकांतील त्या

१ सीतास्व—३।१.

त्या प्रसंगींच्या समानार्थक श्लोकांचे शब्दशः अनुवाद आहेत हें पाहिल्यानंतर जसें प्रत्ययास येतें, तसेंच तें रघुवंशासारखा बहुविध सरस काव्यप्रसंगांनीं परिपूर्ण असा काव्यग्रंथ पुढें असतां, त्याच्या धर्तीवर सामराज-नागेशांप्रमाणें स्वयंवरार्थ जमलेल्या राजांच्या शृंगारचेष्टेसारखा अगर मिरवणूक पाहाण्यास पुढें सरसावलेल्या पौरस्त्रियांच्या धांदलीसारखा एकही अभिनव प्रसंग आपल्या काव्यांत चित्रित न करण्यांत दिसून आलेल्या त्याच्या असहाय्यतेनेंही स्पष्ट होण्यासारखें आहे. तथापि विठ्ठलाच्या काव्यांत जागजागीं योजलेल्या अनुप्रासांनीं, यमकांनीं, प्रतिलोम यमकांनीं, सभंग श्लेषांनीं व कूटश्लोकांनीं त्याचें शब्दालंकारप्रभुत्व जितकें डोळ्यांत भरतें, तितकें त्यानें अगदींच हात राखून योजलेल्या अर्थालंकारांनीं त्याचें साहित्यशास्त्राचें ज्ञान अथवा कल्पनाशालित्व वाचकांचें लक्ष मुळींच वेधीत नाहीं, हें मात्र खरें आहे. सारांश विठ्ठलाचें संस्कृत भाषेचे ज्ञान चांगलें असून, त्यानें वाचलेल्या संस्कृत ग्रंथांचा व भागांचा योग्य स्थळीं मराठी अनुवाद करण्याची त्याच्या अंगीं पात्रता आहे. महाभारत, भागवत, रामायण, पंचमहाकाव्यें व तदनुषंगिक ग्रंथ, त्यानें आपल्या गरजेपुरते वाचलेले असून, एकनाथ, तुकाराम नागेश व रघुनाथपंडित या मराठी कवींचें वाङ्मयही त्यानें डोळ्याखालून घातलें असावें. त्याची भाषा, सामाराज, नागेश रघुनाथपंडित यांच्या भाषेइतकी संस्कृतप्रचुर नसली, तरी वृत्तसुखार्थ समासबद्धरचना करण्यास अगर श्लेष साधण्यास, लागणाऱ्या संस्कृत शब्दांचा सांठा त्याच्या जवळ भरपूर प्रमाणांत आहे. विठ्ठल स्वतः म्हणवितो त्याप्रमाणें खराच व्युत्पन्न किंवा विद्वान् होता किंवा नाहीं, हा प्रश्न थोडा फार वादग्रस्त आहे. पण 'व्युत्पन्न' याचा अर्थ षट्शास्त्रांपैकीं निदान एक दोन शास्त्रांत पारंगत असा केल्यास मात्र, तो त्या कसोटीस उतरेल असें वाटत नाहीं. तरी एकंदरीनें तो बऱ्यापैकीं संस्कृतज्ञ असून, त्या भाषेंतील ललित ग्रंथांचें सूक्ष्म नसलें तरी चालचलाऊ वाचन त्यानें केलें होतें, हे निर्विवाद आहे.

## विठ्ठलाची बहुश्रुतता

विठ्ठलाच्या या वाचनास बहुश्रुततेची म्हणावी तशी जोड मिळाली होती, असें मात्र म्हणवत नाहीं. वास्तविक त्याच्यासारख्या व्यापारीवृत्तीच्या माणसास, देशाटणामुळे व अनेक भिन्न भिन्न व्यक्तींच्या परिचयामुळे, मनुष्य-स्वभावाचें, ठिकठिकाणच्या रीतिरिवाजांचें, व विविध प्रकारच्या वस्तूंचें सूक्ष्म परिज्ञान असावयास पाहिजे होतें. पण त्यानें डोळे उघडून प्रवास न केल्यानें, अथवा नागेश–सामराजाप्रमाणे प्राचीन कालांत स्वकाल दाखविण्यास अवश्य लागणारी कल्पकता व योजकताही त्याच्याजवळ नसल्यामुळें, त्यानें केलेलीं वर्णनें निवळ यादीवजा व निर्जीव उतरलीं आहेत. सीता-स्वयंवरार्थ जमलेल्या राजांच्या यादींत नागेशानें आपल्या काळच्या महाराष्ट्र, सौराष्ट्र, चव्हाण, राणे, तुंगार, शृंगार, मोरे, गोरे, तोरे, गुजर, शिरसाट, सक्राड व साटे अशा मराठा राजांची नांवें गोंवतांना, कालविपर्यासाचा[१] दोष पत्करूनही महाराष्ट्राचा अभिमान व्यक्त केला आहे, तर इकडे आमच्या विठ्ठलानें याच प्रसंगाच्या वर्णनांत, रामायणांतील निरनिराळ्या देशांच्या राजांची व मुक्तेश्वरानें आपल्या आदिपर्वांतील शकुंतलोपाख्यानांत उल्लेखलेल्या कांहीं विदेशी व यावनी राजांची नामावळी जपून कशी तरी वेळ निभावून नेली आहे. वास्तविक त्याला मुक्तेश्वर–सामराज–नागेश यांच्या प्रमाणें [१]भद्रवनवर्णनप्रसंगीं आपणास ठाऊक असलेल्या सर्व फुलझाडांचा व फळझाडांचा किंवा सीतेच्या व रामाच्या अंगावरील [२]अलंकारांचें वर्णन करतांना, स्वकालीं रूढ असलेल्या दागिन्यांच्या प्रकारांचा, विस्तारानें नामनिर्देश करून आपला चौकसपणा व सूक्ष्मावलोकन प्रगट करण्यास काय हरकत होती ? पण आपण जें जें पाहिलें तें तें आपल्या ग्रंथांत प्रसंग साधून कोठें तरी समाविष्ट करून टाकण्याचा, विठ्ठलाला मुळीं अभिनिवेशच नसल्यामुळें, त्यानें

---

१ सतिास्व— २।१३-१५. २ सीतास्व-४।२७-३०.

दशरथाच्या पागेंतील घोड्यांच्या [1]जाती, त्या घोड्यांचे दागिने, किंवा रामलक्ष्मणांच्या विवाहप्रसंगीं वाजविण्यांत आलेलीं वाद्यें,[3] अथवा नांदीश्राद्ध देवक, गोदान यासारखे लग्नविधींतील याज्ञिक प्रकार,[4] यांचें थोडें अधिक तपशिलवार वर्णन करून जो बहुश्रुतपणाचा कांहींसा डौल आणला आहे, तो देखील त्यानें नागेशाच्या सीतास्वयंवरांतील तत्सदृश वर्णनाचा केलेला तर्जुमा असण्याचाच संभव आहे हें लक्षांत आल्यावर, उसना असल्याचेंच प्रत्ययास येतें. विठ्ठलाला नाहीं म्हणायला थोडेसें ज्योतिषविषयक ज्ञान असावें, हें त्यानें सीतेचें शारीरवर्णन करून[5] व पुनः विवाहमंगलाष्टकप्रसंगीं द्वादश-राशींचा उल्लेख[6] करून जें भासविण्याचा प्रयत्न केला आहे, तें देखील त्याला अगदीं ज्योतिषशास्त्राबद्दलचा मोठा जिव्हाळा होता म्हणून नसून, आपल्या हातून कोणीकडून तरी कूटश्लोकात्मक अथवा श्लेषात्मक रचना होऊन, काव्यांत शब्दचमत्कृति साधल्याचें श्रेय आपणास मिळावें, हाच त्याचा प्रामुख्यानें हेतु दिसून येतो. विठ्ठलाच्या अंगीं भावना अथवा कल्पना यांच्यापेक्षां कृतीचाच प्रकर्ष अधिक असल्यानें, स्वतंत्र व अभिनव प्रसंगनिर्मितीची त्याच्याकडून अपेक्षा करण्यापेक्षां, दुसऱ्याच्या काव्याचा अनुवाद अगर अनुकरण करण्यांत त्यानें दाखविलेलें कौशल्यच आपण विचारांत घेणें युक्त आहे.

## विठ्ठलाचे काव्यगुण

तशांतूनही विठ्ठल वृत्तीनें वस्तुनिष्ठच म्हटला तरी चालेल. त्यामुळें त्याच्या व्यक्तित्वाचा ठसा त्याच्या काव्यांत कोठेच उमटलेला दिसत नाहीं. आपल्या काव्यांतील विविध प्रसंगीं पात्रांच्या मनांत होणारी भिन्न भिन्न वृत्तींची खळबळ चित्रित करण्यांत, कवींजवळ जी सहृदयता व सहानुभूति

१ सीतास्व-६।११, १५. २ सीतास्व-६।१४. ३ सीतास्व-६।२४.
४ सीतास्व-७।५. ५ सीतास्व-५।१२. ६ सीतास्व-७।२७.

लागते ती विठ्ठलांत मुळांतच नसल्यानें, अहिल्यारूपीं शिळेला पाय लावतांना रामाची झालली चलचित्तवृत्ति, अथवा शाप मिळालेल्या अहिल्येचें पश्चात्तापदग्धहृदय, हळवारपणानें वर्णन न करतां त्या घटना फक्त घडल्याचें तो एकाद्या दुसऱ्या ओळींत निर्विकारपणानें जाहीर करतो.[1] तसेंच रामाला सकृद्दर्शनीं पाहून सीतेच्या उल्हसित वृत्तीचें वर्णन करतांना त्याच्या मनालाही जो बहर यावयास पाहिजे होता, किंवा रामाला तें प्रचंड शिवधनुष्य उचलेल कीं नाहीं, अशी सीतेच्या मनाची हुरहूर व्यक्त करतांना, जी उत्कंठेची भावना त्याच्या काव्यांत उतरावयास पाहिजे होती, तिच्या ऐवजीं अनुक्रमें, 'निर्धनासि धन जेविं सापडे। जानकीस नयनीं तसा पडे।'[2] अशी एकादी कोरडी उपमा योजण्यात, अथवा '[3]वज्रशरासन त्याप्रति शासन कैंवि घडे रघुनंदनहातें' अशी नुसती शंका प्रदर्शित करण्यांत, व पुढेही पुनः रामाकडून तें धनुष्य भंगावें म्हणून शेष–कूर्मादिकाना सीतेन केलेली नीरस प्रार्थना[4] व्यक्त करण्यांत, विठ्ठलानें जो तांत्रिक व्यवहारीपणा दाखविला आहे, त्यावरून मूळ काव्यांतील प्रसंग सहानुभूतीच्या कुंचल्यानें रसरंजित करून उत्कट स्वरुपांत मांडणें त्याला कसें जड जातें, हेंच सिध्द होण्यासारखें आहे. खरा प्रतिभासंपन्न कवि मूळचे प्रसंग व स्वभाव, स्वत.च्या भावनेनें व कल्पनेनें आपल्या काव्यांत असे कांहीं खुलवून दाखवितो कीं, त्यांचें मूळचें स्वरूप पालटून त्यांना एक अभिनव व स्वतंत्र रंगरूप यावें! याच्या उलट आमचा विठ्ठल अंतरंग तर राहोच, पण बहिरंगदेखील इतक्या तटस्थवृत्तीनें चित्रित करतो कीं, व्यक्तिवर्णनांत ठराविक [5]अवयवांच्या व त्यावर घालावयाच्या अलंकारांच्या तपशीलवार उल्लेखाशिवाय त्याला अधिक असें कांहींच करतां येत नाहीं.

---

१ पहा--सीतास्व. २।३५, ४९. २ सीतास्व--४।३१. ३ सीतास्व--४।३५. ४ सीतास्व--४।३८, ३९. ५ सीतास्व-५।३२, ३३. ६ सीतास्व—५।३४-३६.

या भावनाविष्काराच्या अभावामुळेंच विठ्ठलाच्या काव्यांत अर्थालंकारांच्या द्वारां स्फुट होणाऱ्या कल्पनाविलासालाही नांव घेण्यासारखा वाव मिळालेला नाहीं. भद्रवनवर्णन[1] अथवा जनकसभावर्णन[2] अशा स्थलवर्णनांत, वास्तविक उदात्तासारख्या संपन्न अलंकाराचा अवलंब करून केवढा तरी भरघोसपणा त्याला साधतां आला असता! पण विठ्ठलाला कोणत्याच गोष्टीचा जिव्हाळा असा नसल्यानें, [3]रामाच्या किंवा सीतेच्या[4] अवयववर्णनांत, नागेशाप्रमाणें व्यतिरेक, अतिशयोक्ति हेतूत्प्रेक्षा, अपन्हुति अशा बुद्धीचे नवनवोन्मेष दाखविणाऱ्या व भावनेचे उद्दीपन करणाऱ्या अलंकारांचा थाटमाट, त्यांस उडवितां आला नाहीं, इतकेंच काय, पण अशा प्रसंगीं हें अवयववर्णन देखील आखडतें घेऊन तो निवळ दागिन्यांच्या ज्या याद्या देत बसतो, त्यावरून कोणी झालें तरी हेंच म्हणेल कीं, विठ्ठलाला नागेशाप्रमाणें अंगचें वारें असें कांहींच नसून केवळ वस्तुनिष्ठ वृत्तीनें कसल्याही स्थलाचें अगर व्यक्तीचें वर्णन करतांना त्याला स्वतःचें वैशिष्ट्य म्हणून राखतांच येत नाहीं. शिवाय कवि आपल्या काव्यांतील प्रसंगाशीं व व्यक्तीशीं समरस न होतां काव्य करूं लागला, म्हणजे त्याचीं सर्वच वर्णनें कशीं कायम ठशाचीं व सांकेतिक होतात, याचें विठ्ठलाचीं व्यक्तिवर्णनें हें एक चांगलें निदर्शन असून, स्वतः कसलाच अभिनिवेश न धरतां केलेलीं याची हीं वर्णनें, म्हणूनच थोडीफार बेचव उतरलीं आहेत.

एकंदरीनें विठ्ठलांत भावना व कल्पना यांचा मधुर संगम प्रत्ययास येत नसला, तरी त्याच्या काव्यांत प्रसाद, माधुर्य व ओज या काव्याधिष्ठित तीन गुणांचें अस्तित्व आहे, हें मान्य केलें पाहिजे. सर्वसुलभता तर आमच्या कवीचा एक विशेष असून, सोप्या शब्दांत गुंफलेलीं या काव्यांतील

---

१ सीतास्व-२।१३-१५. २ सीतास्व-३।४६. ३ सीतास्व-४।३५. ४ सीतास्व-५।३२-३६.

वर्णनें निःसंशय वाचनीय झालीं आहेत. त्यांतूनही पुनः सीतेच्या [1]शारीर-वर्णनप्रसंगीं अथवा तिच्या विविध [2]सोहाळ्यांच्या वर्णनप्रसंगीं त्याच्या वाणीला आलेलें माधुर्य, त्याच्या सानुस्वार व मृदुवर्णरचनेंतून जसें व्यक्त झालें आहे, तसेंच उरावर शिवधनुष्य पडून उलथलेल्या [3]रावणाच्या वर्णनप्रसंगीं तिला चढलेलें ओज, त्याच्या अर्थानुकूल अशा कठोरवर्णरचनेंतूनच अविष्कृत झालें आहे. पण कांहीं असलें तरी विठ्ठलाला अर्थालंकारापेक्षां शद्बालंकारांचाच सोस अधिक असून, आपल्या काव्यांत अनुप्रास, यमक व श्लेष यांची त्यानें म्हणूनच यथेच्छ पेरणी केल्याचें आढळून येतें. आपल्या रुक्मिणी-स्वयंवरांत जशी त्यानें या अनुप्रासाच्या अनुरोधानें अनेकप्रकारच्या चित्र-बंधांची रचना केली आहे, तशीच त्यानें एकदोन ठिकाणीं प्रतिलोम यम-काची व शद्बकूटाचीही योजना केल्याचें आपण पाहिलेंच आहे. आपल्या काव्यांत एकदा आलेल्या कल्पनेची [4]अगर दिलेल्या [5]उपमेची तो पुनरुक्ति करतो हा थोडाफार दोष असला, तरी एकंदरीनें विठ्ठलाला आपल्या यम-कानुप्रासयुक्त कवित्वाचें जें कौतुक [6]वाटतें तें तत्कालीन सर्वसाधारण लोका-भिरुचेंच स्पष्ट गमक होय असें म्हटलें पाहिजे. आज आपण विठ्ठलाला 'चित्रकवि' म्हणून हिणवीत असलों, तरी आमच्या कवीच्या ज्या चित्रकूट-रचनेचें मोरोपंतांनीहीं कौतुक[7] केलें, अथवा ज्या रचनेंत माघहर्षांसारखे महा-कवीही डौलानें डुंबतांना दिसतात, ती एकेकाळीं तरी शिष्टसंमत असावी, असें मानल्यावांचून गत्यंतर नाहीं. संस्कृत महाकाव्यांच्या पावलावर पाऊल टाकून चालण्याचें आमच्या मराठी आख्यानकवींनीं ठरविल्यामुळें, संस्कृतकाव्यांतील गुणविशेषांचें अनुकरण त्यांनीं आपल्या कृतींत करणें क्रमप्राप्तच होतें. विठ्ठलानें देखील या न्यायास अनुसरून जी चित्रकाव्यरचना केली आहे, ती शेवटच्या शेवटच्या संस्कृत काव्यांतील तशा रचनेला थोडीफार लोकमान्यता त्याच्या-

१ सीतास्व--५।३२–३६. २ सीतास्व-५।३६–४०. ३ सीतास्व-४।४६,--४९; ५१--५२. ४ सीतास्व–१।४६, २।११, ३।२, ७।५; ५ सीतास्व–५।१, ३, ५०. ६ रु. स्व–१।७. ७ पद्दा–विठ्ठलकविच्या भलता लंघूं न शकेचि चित्रकूटातें-सन्माणिमाला.

कालींही मिळत असलेली पाहूनच केली असल्यानें, श्रेष्ठामागून जाण्याच्या मोहापलीकडे त्याच्याकडून फारसा मोठा प्रमाद झाला असें म्हणवत नाहीं.

## विठ्ठलाची भाषा

याप्रमाणें आमच्या कवीच्या कांहीं गुणांचें थोडें फार केलेलें हें विवेचन त्याच्या भाषेच्या समालोचनाभावीं अपुरें वाटण्याचा संभव आहे. कारण कोणत्याही ग्रंथकाराचें व्यक्तित्व व काल ठरविण्यास जशा कांहीं बाह्य गोष्टीं उपयोगी पडतात, तद्वतच त्याच्या भाषेसारखीं अंतःसाधनेंहीं विचारांत घ्यावीं लागतात. विठ्ठलाची भाषा जुने मराठी, संस्कृत, अपभ्रष्ट व फार्शी अशा चतुर्विध शब्दसंपत्तीनें अलंकृत असून तिच्यावर शिवकालाचा स्पष्ट ठसा उमटलेला आहे. विशेषतः [1]मुखरणि [2]हेलावला, [3]घवघवित, [4]वळथा हे शब्द; [5]हळू जाली, [6]स्वार होणें, [7]बसों घातली असे वाक्‌संप्रदाय; [8]दीजे, [9]आलोकिजे अशीं कर्मकर्तरी प्रयोगाचीं आज्ञार्थी रूपें; [10]ऋषीकारणें, असा द्वितीयेच्या 'ला' प्रत्ययार्थी 'कारणें' हा शब्द योजणें; विचार केला या अर्थी 'विचारिलें' हें क्रियापद येणें, शिकविलेलें, आलेंले अशा पूर्णभूतकालाबद्दल [11]आलें, [12]शिकविलें असें साध्या भूतकाळाचें रूप घालणें; [13]नुचलेचि, [14]नेटवावे, [15]नादिसे अशीं नकारार्थी अव्ययुक्त क्रियापदें घालणें; इत्यादि व्याकरणविशेष; [16]संकष्ट, [17]आचमन [18]वित्पत्र, [19]सूर्यांशिचा, [20]भवभोगवेथा, [21]मंद्र ( मंदर ), जगंत्र

---

१ सीतास्व--१।१६. २ सीतास्व--५।२१. ३ सीतास्व--५।३९. ४ सीतास्व--६।३१. ५ सीतास्व--१।३४. ६ सीतास्व-५।५१, ६।३. ७ सीतास्व--१।१९. ८ सीतास्व--२।२९. ९ सीतास्व--५।७. १० सीतास्व--२।५३, ५।४. ११ सीतास्व--४।५०. १२ सीतास्व--२।२. १३ सीतास्व--१।२६, २८. १४ सीतास्व--१।३२. १५ सीतास्व--३।७. १६ सीतास्व--१।३९. १७ सीतास्व--२।४८. १८ सीतास्व--२।५८. १९ सीतास्व--३।६. २० सीतास्व--४।५५. २१ सीतास्व--५।७.

( जगत्रयें )[1] तां ( त्वां ),[2] कैके ( कैकेयी )[3] इत्यादि संस्कृत शब्दांचीं अपभ्रष्ट रूपें; व वज्र'तुल्य,[4] दिकूचापाममतुल्य,[5] अशा सामासिक शब्दांत सामान्यरूप कायम ठेऊन समास करण्याची पद्धति; या गोष्टी विठ्ठलाला शिवकालांत नेणाऱ्या आहेत. आमच्या कवीची शब्दसंपत्ति तशी डोळयात भरण्यासारखी असून, देव्हारचौकी,[6] चवरिया,[7] मांडखुटी,[8] असे यादवकालीन शब्द जसे त्याच्या काव्यांत सांपडतात, तसेच भांबडभूत,[9] कळकुंबा,[10] नवरंग,[11] गोधांगुळी[12] अशा थोड्या अपरिचित शब्दांबरोबरच चवरडोल,[13] निमासुर,[14] विस्तारलें,[15] असे एकनाथकालीन शब्दही तेथे आढळत असल्यानें, त्याचा प्राचीन मराठी वाङ्मयाचा अभ्यासही त्यावरून व्यक्त होण्यासारखा आहे. सामराजाप्रमाणें एकाद्या शब्दाचा ध्यास असा विठ्ठलानें घेतला नसला, तरी ' निर्के ' हा शद्ब[16] त्याचा बराच आवडता असून, ' न्याय ' हा शद्ब[17] ' प्रमाणें ' या अर्थी त्यानें जसा योजला आहे, तसा सज्ज[18] हा शब्दही सामराजनागेशांप्रमाणेंच वापरून त्यानें त्या कवींशीं आपलें समकालीनत्व सिद्ध केलें आहे.

वरील शब्दांबरोबरच विठ्ठलाच्या काव्यांत राजव्यवहारकोशांत सांपडणाऱ्या अश्वजातिविषयक,[19] अश्वालंकारविषयक[20] व वाद्यविषयक[21] शब्दाव्यतिरिक्त फार्शी व आरबी शब्दांचें जें अत्यल्प प्रमाण दिसून येतें, तें फार्शी भाषेच्या ओसरत्या कालाचें निदर्शक समजण्यापेक्षां

---

१ सीतास्व--६।२१. २ सीतास्व--२।३०. ३ सीतास्व--६।३३. ४ सीतास्व--४।१. ५ सीतास्व--४।२. ६ सीतास्व--१।२४. ७ सीतास्व--३-४६. ८ सीतास्व--४।४७. ९ सीतास्व--५।१७. १० सीतास्व--४।४३. ११ सीतास्व--७।३२. १२ सीतास्व--७।३७. १३ सीतास्व--५।८१. १४ सीतास्व--४।३५. १५ सीतास्व--७।३१. १६ सीतास्व--२।१९. १७ सीतास्व--४।५१. १८ सीतास्व--३।४९. १९ सीतास्व--६।११, १५. २० सीतास्व--६।१४. २१ सीतास्व--६।२४.

विठ्ठलाची त्या भाषेंत फारशी गति नसावी, किंवा ज्या राजदरबारीं त्या भाषेचा एवढा फैलाव होता, त्याशीं तरी म्हणावा तसा त्याचा परिचय नसावा हेंच खरें. कारण तत्कालीन राजदरबारांत व व्यवहारांत फार्शी भाषेचें माजलेलें प्रस्थ कमी करण्याच्या हेतूनें, श्रीशिवछत्रपतीनीं रघुनाथपंडिताकडून राजव्यवहारकोशासारख्या पारिभाषिक कोशाची मुद्दाम रचना केली हें जरी मान्य असलें, तरी ज्या शके १५९६–९८ या कालांत वरील कोशाची रचना झाली, त्याच कालांत विठ्ठलानें विशेषतः आपली रचना केली असल्यामुळें, विठ्ठलाच्या रचनेंतील फार्शी शब्दांच्या अल्पत्वास हा कोश कारणीभूत झाला असेल असें म्हणवत नाहीं. आज आपण सामराज, नागेश व जयराम पिंड्ये यांच्या काव्यांत फार्शी शब्दांचें प्राचुर्य आहे म्हणून तीं काव्यें त्या कोशापूर्वीं झालीं, असें म्हणून फार्शी शब्दांच्या अल्पत्वाचा व त्या कोशाचा कार्यकारणभाव लावतों.[1] पण राजव्यवहारकोशाचें अस्तित्व नसतांनाही जेथें विठ्ठलाच्या काव्यांत फार्शी शब्दांचें अल्पत्व दृष्टीस पडतें, तेथें विठ्ठलाच्या बाबतींत तरी निदान हा न्याय लागू पडत नसून, त्याला अन्य कारणें असावीं असें कल्पिणें भाग आहे.

## विठ्ठलाचें वृत्तप्रभुत्व

पण वर वर्णिलेलें शब्दप्रभुत्व नागेशाप्रमाणेंच विठ्ठलालाही वृत्तप्रभुत्व देण्यास कारण झालें आहे. सामराजाप्रमाणें आमच्या कवीनें आपल्या काव्यांत जरी उपजातीसारख्या धावत्या वृत्ताचाच अधिक उपयोग केला नसला, तरी वसंततिलका, शार्दूलविक्रीडित, शिखरिणी, स्रग्धरा, सवाई, भुजंगप्रयात, मालिनी, शालिनी, तोटक, स्वागता, दोधक, इंद्रवज्रा, इंद्रवंशा, द्रुतविलंबित, रथोद्धता, विद्युन्माला[2] अशा सर्वपरिचित १६ वृत्तांचा व

---

१ सामराज–पृष्ठ १०५. २ विद्वज्जीवन–७।२५

विपरितपूर्वा,[१] मंजुभाषिणी,[२] प्रहरणकलिका[३] कुसुमविचित्रा,[४] अशा कांहीं अपरिचित वृत्तांचाही त्यानें अवलंब केला आहे. सामराजानें आपल्या काव्यांत १६ भिन्न भिन्न गणवृत्तें योजलीं आहेत, तर नागेश व विठ्ठल या दोघांनीं त्याच्याही पुढें मजल मारून गणवृत्तांची संख्या आपपल्या काव्यांत ज्याअर्थी १९।२० पर्यंत नेली आहे, त्याअर्थी त्यांच्या वृत्तप्रभुत्वाबरोबरच सामराजाहून त्यांचें उत्तरकालीनत्वही मानतां येण्यासारखें आहे. तथापि कवीनें आपली नवरसात्मक काव्यरचना विविध वृत्तांत गुंफण्यांत त्याचें वृत्तप्रभुत्व अधिक व्यक्त होतें, कां एकाच वृत्तांत ती गुंफण्यांत, याबद्दल कांहीं विद्वानांत वाद माजलेला आढळतो. अनेकवृत्तात्मक रचनेंत अक्षर-मात्रांच्या ठरविक संख्येचें व वर्णांच्या ऱ्हस्वदीर्घत्वाचें कवीला जितकें बंधन पाळावें लागतें, तितकें त्याला एकवृत्तात्मक रचनेंत पाळावें लागत नाहीं, या निकषाबरोबरच विविध गणवृत्तांतील लघुगुरुक्रम साधण्यासाठीं कवी-जवळ विविध शब्दसंपत्तीही असावी लागते असें यांपैकीं एका बाजूचें म्हणणें असून, उलटपक्षीं काव्यांतील भिन्न भिन्न प्रसंग, वर्णनें व भाव एका सलग वृत्तांत वठविण्यातच कवीचें अवधान व कौशल्य अधिक व्यक्त होतें, असा दुसऱ्या बाजूचा आग्रह आहे. पण हा प्रश्न अशा शाब्दिक चर्चेनें सुटण्यासारखा नसून, प्रत्येकानें आपल्या सहृदयतेनेंच खरें पाहिलें असतां तो सोडविण्यासारखा आहे. आमची अनेकवृत्तात्मक काव्यरचना तिच्यां-तील लघुगुरुक्रमाच्या आंदोलनानें वास्तविक निरनिराळया रसांना व भावांना पोषक होऊन वाचकांच्या मनांत त्या त्या रसांचें व भावनांचें जसें उद्दीपन करते, तशी एकवृत्तात्मक रचना मुळींच करीत नसून, रसभावनांना उलट ती बहुतांशीं प्रतिकूल होऊन वाचकानांही ती कंटाळवाणी होते, असा

---

१ विद्वज्जी--७।७. २ विद्वज्जी--७।३१. ३ विद्वज्जी--७।३२. ४ विद्वज्जविन-४।३९.

बहुतेकांचा अनुभव आहे. म्हणून इतकीं बंधनें पाळून इष्ट त्या रसाचा उठाव अथवा योग्य त्या भावाचा आविष्कार घडवून आणतांना, अनेकवृत्तांत आपली रचना खेळविणारा कवीच खरा वृत्तप्रभु ठरत असून, संस्कृत महाकाव्यांत भिन्न भिन्न वृत्तांचा केलेला आश्रय हेंच वृत्तप्रभुत्वाचें गमक होय असें ओघानेंच मानण्यांत आलें आहे.

विठ्ठलाचें वृत्तप्रभुत्व त्यानें याच काव्यांत स्वीकारलेल्या अनेक परिचित–अपरिचित गणवृत्तांवरून कळून येण्यासारखें आहे. शिवाय तो नागेशाप्रमाणेंच कधीं कधीं वृत्ताचें[1] नांव त्या त्या श्लोकाच्या पहिल्या किंवा शेवटच्या चरणांत अशा कांहीं कौशल्यानें गुंफतो कीं, तें वृत्तनाम एकीकडून वर्ण्य विषयाचें विशेषण व्हावें, तर दुसरीकडून त्यानें त्या श्लोकाचें वृत्तही सहजासहजीं सूचित केलें जावें ! प्राचीन मराठी वाङ्मयांत नागेशविठ्ठलाव्यतिरिक्त विविध गणवृत्तांचा असा मुक्तहस्तानें व सहजगत्या उपयोग फक्त निरंजनमाधवानेंच काय तो आपल्या ‘स्तोत्रसंग्रहांत’ केला असून, वृत्तबनमाला, व वृत्तावतंस या आपल्या ग्रंथांनीं मराठींत वृत्तशास्त्ररचनेच्या अग्रपूजेचा मान त्यानें मिळविला आहे. विठ्ठलानें देखील वृत्तशास्त्राचा चांगला अभ्यास केल्याचें दिसत असून, आपल्या ‘विद्वज्जीवन’ काव्यांत केलेल्या कांहीं उल्लेखांवरून[2] त्यानें वृत्तरत्नाकर व सुवृत्ततिलकासारखे वृत्तशास्त्रावरचे ग्रंथ सूक्ष्मतेनें पाहिल्याचें सिध्द होतें.

## विठ्ठल व इतर समकालीन कवी

यापुढें आमच्या कवीचें कविमंडळांतील स्थान ठरविण्यास त्याच्यासारख्याच इतर आख्यानकवींशीं त्याची तुलना होणें इष्ट आहे. वामन, सामराज, नागेश व रघुनाथपंडित हे सर्वच कवी विठ्ठलाच्या समकाली·

१ सीतास्व–४।४५, विद्वज्जी–२।३, विद्वज्ज्जी–४।१६. २ विद्वज्जी–४।७, १३.

नांत मोडतात. त्यांत वामनपंडितांची रचना इतकी विपुल आहे कीं, त्या बाबतींत सामराज, नागेश, त्यांच्या पासंगालाही पुरणार नाहींत. सामराज-नागेश जसे रसिक, तसे वामनपंडितही आपल्या कांही भागवती आख्यानांत रसिक बनले आहेत. पण सामराज–नागेशांची बहुश्रुतता, त्यांचा राजदरबारपरिचय, समाजनिरीक्षण, अभिनवप्रसगंनिर्माणक्षमता व विनोदपरता, या गुणांचा पंडितामध्यें केवळ अभाव आहे. पुनः पंडित सामराज–नागेशांपेक्षां निश्चित अधिक विद्वान् असले, तरी त्याबरोबरच विद्वज्जडत्व व क्लिष्टता हे दोष पंडितांच्या काव्यांत मुळापासूनच शिरले आहेत. उलट सामराज–नागेशांचे काव्य प्रासादिक, प्रतिभासंपन्न व ललितरम्य असून, त्यांच्या व्यक्तित्वाचा ठसा तेथे जसा स्पष्ट उमटलेला दिसतो, तसा तो वामनपंडितांच्या काव्यांतच काय, पण इतर कोणत्याही प्राचीन कवींत दिसून येत नाहीं.

विठ्ठलाची रचना सामराज–नागेशांपेक्षां विपुल आहे. चित्रकाव्यरचना, कूटशब्दयोजना व छंदःशास्त्रनैपुण्य हे या कवीचे विशेष असून, संस्कृतांतलीं कांहीं अपरिचित वृत्तें यानें नागेशाप्रमाणेंच मराठींत आणलीं आहेत. सर्गबद्धरचना करण्याचा उपक्रम करून यानें महाकाव्याचा डौल बाह्यतः आणला आहे. पण नायक–नायिकांच्या विविध भावांचीं, त्यांच्या प्रणयपराक्रमांचीं, चंद्रोदयसूर्योदयांचीं, संपन्न नगरांची व तेथील विविध व्यापारांचीं, महाकाव्यांना नेहमींच सजविणारीं वर्णनें करावयाची सोडून यमकानुप्रासश्लेषांसारख्या शब्दालंकारांची, व ‘छत्र– चामरा’ सारख्या विविध बंधांची रचना करण्यांतच सगळी इतिकर्तव्यता मानल्यामुळें, महाकाव्यरचनेचा त्याचा हेतु सपशेल फसला आहे. विठ्ठलाचा पेशा व्यापाऱ्याचा असून सुद्धां, नागेश–सामराजांप्रमाणें त्याला म्हणण्यासारखी बहुश्रुतता मिळवितां आली नाहीं. भावनेची उत्कटता व कल्पनेची उत्तुंगता तर राहोंच, पण नुसते डोळे उघडे ठेऊन वागल्यानें, सामराज–नागेश–रघुनाथ

पंडितांना जी स्वभावोक्तीची खुमासदार वर्णनें करतां आलीं, त्यांचा विठ्ठलांत पूर्णतया अभावच दृष्टीस पडतो. पात्रांच्या विविध हालचालींनीं, अभिनव प्रसंगांनीं व पुराणकालांत स्वकालाचें प्रतिबिंब पाडणाऱ्या उल्लेखांनीं आपलें काव्य नटवून तें सरस, चटकदार व जिवंत कसें करावें हें कल्पनाशाली व विनोदी सामराज–नागेश जें जाणतात, तें विठ्ठलाच्या गांवींही दिसत नाहीं. त्यामुळें त्या दोघांही व्यक्तित्वनिष्ठ कवींच्या मानानें आमचा वस्तुनिष्ठ विठ्ठल, संस्कृत काव्यांचे किती गिरविणारा अतएव जड वाटतो.

रघुनाथपंडित मात्र या सर्वांहून थोडा निराळा आहे. त्याची अभिरुचि आभिजात असून, नागेश त्या मानानें बराच ग्राम्य व कित्येक वेळां अश्लील वाटतो. कोणतीही गोष्ट वाच्यार्थानें न सांगतां, ध्वन्यर्थानें सूचित करणें हें तर त्याचें वैशिष्ट्य आहेच; पण त्याचा शृंगार देखील नागेशाप्रमाणें उत्तान न होतां, विप्रलंभासारखें सूक्ष्म व मुग्ध स्वरूप धारण करतो. आपण जें जें पाहिलें व ऐकलें, तें तें आपल्या काव्यांत प्रसंग साधून समाविष्ट करण्याचा मुक्तेश्वर–नागेशाप्रमाणें जरी त्यानें अभिनिवेश धरला नाहीं, तरी आपल्या काव्यांत आपल्या व्यक्तित्वाचें व स्वकालाचें प्रतिबिंब पाडण्याचा त्याचा स्वभाव असल्यानें, त्याच्या काव्याला एक विशेष प्रकारचें चैतन्य प्राप्त झालें आहे. सूक्ष्म भावनांची तार छेडणें, सुंदर व सोज्ज्वळ सृष्टिवर्णनें करणें व सूक्ष्म अवलोकनानें स्वभावोक्ति साधणें, या जिवंत काव्यगुणांत सामराज–रघुनाथपंडित, नागेशाहूनच काय, पण मराठींतील कोणत्याही आख्यानकवीहून श्रेष्ठ आहेत. नागेशाचें विनोदी व्यक्तित्व त्याच्या काव्यांत इतराहून अधिक खुलून दिसलें, तरी एकंदरीनें काव्यगुणांत तो जसा सामराज–रघुनाथांपेक्षां खालच्या दर्जाचा आहे, तसा आमचा विठ्ठलही रेखीव व्यक्तित्वाच्या अथवा उत्कट मनोवृत्तीच्या व मौलिकतेच्या अभावीं, नागेशाहून निःसंशय खालच्या पायरीवरच उभा आहे.

# सीतास्वयंवर

तरी आपल्या स्वकालीन अशा नागेश, वेणाबाई, आनंदतनय, गिरिधर, जयरामस्वामी, अनंत, गोसावीनंदन व विष्णुदास इत्यादि आख्यानकवीप्रमाणें विठ्ठलानें निवळ सीतास्वयंवरावरच रचना न करतां, रुक्मिणीस्वयंवरावरही जी रचना केलेली आढळते त्याचें मर्म हेंच कीं, त्याच्या मनावर एकनाथांच्या रुक्मिणीस्वयंवराची छाप[1] जितकी जबर आहे, तितकीच समर्थांच्या रामसांप्रदायानें नवीनच प्राप्त करून दिलेल्या सीतास्वयंवरासारख्या विषयांनींही त्याच्या मनाची पकड घेतलेली दिसते. आज प्रसिद्ध असलेल्या सीतास्वयंवरां 'त आनंदतनय, अनंत, विठ्ठल, नागेश, वामन व वेणाबाई यांच्याच कृती विशेष प्रसिद्ध असून, बहुतेकांनीं या प्रकरणांत विश्वामित्रानें यज्ञरक्षणार्थ दशरथाकडे रामलक्ष्मणांच्या केलेल्या मागणीपासून प्रारंभ करून, जनकाचा शिवधनुर्भंगाचा पण, राजेलोकांचें स्वयंवरास गमन, सीता व तिची दासी यांचें राजेलोकांबद्दल संभाषण, रामाला तें धनुष्य उचलेल काय याबद्दल सीतेला लागलेली चिंता, रावणाच्या प्रचंड शरीराचें वर्णन, त्याचें वढाईखोर भाषण व धनुष्य उचलतांना त्याची झालेली फजिती, आणि शेवटीं रामाकडून शिवधनुर्भंग होऊन सीतारामांचा झालेला विवाह इत्यादि अगदीं ठराविक साच्याचेच प्रसंग वर्णिले आहेत. त्यांतल्या त्यांत आनंदतनयाची रचना बरीच ओजस्वी असून, यमकानुप्रासारख्या शब्दालंकारावर त्यानें दिलेला जोर, त्याच्या शिपाईबाण्याला शोभेसाच आहे. वामनपंडितांनीं तर या प्रकरणाच्या निमित्तानें एकनाथांप्रमाणें भक्ति व अध्यात्म यांची सांगड घातली असल्यानें, स्वयंवराचा गोडवा तेथे यावा तसा अनुभवास येत नाहीं. वेणाबाईनीं मात्र आपलें प्रकरण महदंबेप्रमाणेंच

---

१ रामाच्या विवाहप्रसंगीं पिंगळा वेश्येच्या संन्याशाला लागलेल्या धक्क्याचा प्रसंग ( ७।११ ) विठ्ठलानें, एकनाथांच्या रुक्मिणीस्वयंवरांतील (१८।२५-३१ ) या प्रसंगावरून घेतला आहे.

केवळ रामभक्तीनें प्रेरित होऊन अगदीं घरींच एकादा लग्नसमारंभ घडावा अशा जिव्हाळ्यानें केल्यामुळें, तें अधिक तपशीलवार उतरलें आहे. तथापि वामन व वेणाबाई यांनीं अनुक्रमें भक्ति व अध्यात्म यांचा उपदेश हें आपल्या स्वयंवररचनेच्या मागें ठेवलेलें ध्येय, त्यांच्या काव्यांतील इतर व्यावहारिक वर्णनांतूनही झांकलें गेलेलें नाहीं.

नागेश-विठ्ठलांची गोष्ट तशी दिसत नाहीं. नागेशानें आपल्या ४१५ श्लोकांच्या सीतास्वयंवराचा प्रारंभ, परशुराम व जनकराजा यांच्या मुलाखती-पासून केला असून, सीतेच्या कन्यादानांत आपल्या काव्याची परिसमाप्ति केली आहे. तशांत सीतास्वयंवरास गेलेले देशोदेशींचे राजे, शिष्यप्रशिष्यांसह जाणारे उपहासास्पद ब्राह्मण, गौतमाश्रमांतील पुष्पफलसमृद्धि व मिथिला नगरी इत्यादींची नागेशाचीं वर्णनें, सामराजाच्या रुक्मिणीहरणांतील तत्सदृश वर्णनाशीं इतकीं तंतोतंत जुळतात कीं, सामराजाचें काव्य पुढें ठेऊनच नागे-शानें आपल्या काव्याची रचना केली असावी असें म्हटल्यावाचून राहवत नाहीं. पुनः नागेश जितका रसिक तितकाच कल्पक आहे. ऋषींच्या बाय-कांच्या अनुषंगानें कुरूपसुरूप स्त्रियांचीं त्यानें केलेलीं वर्णनें, अथवा रामाच्या मिरवणुकीमागून चालणाऱ्या विविध सुंदर स्त्रियांचीं त्यानें केलेलीं वर्णनें, जशीं त्याची रसिकता व सूक्ष्मता दाखवितात, तसेंच रामानें आपल्या पदस्पर्शानें शिळेची अहिल्या केल्याचें पाहून, सुंदर स्त्रियांच्या लोभानें एकेक शिळा डोक्यावर घेऊन रामापुढें येणाऱ्या कामुक ब्राह्मणांचें विनोदी वर्णन, अथवा रामाची मिरवणूक पाहण्यास धावणाऱ्या पौरस्त्रियांच्या धांदलीचें वर्णन, त्याची कल्पकता व योजकताच दर्शवितें.

विठ्ठलानें मात्र आपल्या सीतास्वयंवराचे अनुक्रमें जानकीउत्पत्ति, अहिल्योद्धार, श्रीराममिथिलाप्रवेश, रावणमानभंग, रामधनुर्भंग, लग्न-निर्धार व श्रीरामअयोध्याप्रवेश असे सात सर्ग कल्पिले असून, आपलें काव्य रचतांना ‘ कांहीं गिरा देशिची ’ पाहिल्याचें जें सांगितलें आहे, त्यावरून एकनाथांच्या काव्याबरोबरच इतर कोणाची नसली तरी नागेशाची

कृति त्यानें डोळयाखालून घातली असावी असें अनुमान निघतें. मिथिलेला जातांना वाटेंत रामाला नावेंतून गंगापार व्हावें लागलें, त्यावेळीं रामानें शिळेची अहिल्या केल्याचें वृत्त ऐकून नावाड्यानें रामांना अशी विनंति केली कीं, " विंध्याचलावरील दगडांच्या नूतन स्त्रियां बनवून तुम्हीं तापसांची वासना पुरवली. लांकडांत व दगडांत तसा म्हणण्यासारखा भेद नसल्यानें, आपण आपल्या पदस्पर्शानें या लाकडांतूनच मला एक स्त्री निर्माण करून द्यावी. कारण माझ्यासारख्या गरीबाला दुसरी स्त्री करणें शक्य नाहीं." विठ्ठलानें वास्तविक हा प्रसंग,[1] नागेशाच्या सीतास्वयंवरांत योजलेल्या अशाच सुंदर स्त्रियांच्या लाभासाठीं रामापुढें डोक्यावर शिळा घेऊन येणाऱ्या ऋषींच्या प्रसंगावरून[2] जसा उचलला आहे, तशाच दशरथाच्या पागेंतील घोड्यांच्या विविध जाती[3] देखील, त्यानें रामाच्या पागेंतील, नागेशानें वर्णिलेल्या [4]अश्वजातींवरूनच बहुधा उतरल्या असाव्या. रावणाच्या मानभंगासारखे प्रसंग, अनंत किंवा आनंदतनय यांच्या सीतास्वयंवरांप्रमाणें विठ्ठल—नागेशांत सर्वसाधारण असले, तरी विठ्ठलाच्या काव्याच्या शेवटीं येणारीं सीतारामविवाहाचीं मंगलाष्टकें, त्यानें नागेशाच्या तशाच मंगलाष्टकांना आपल्या ज्योतिषविषयक चमत्कृतीची थोडी जोड देऊन रचलेलीं दिसतात.

त्यांतूनही विठ्ठलाच्या या सीतास्वयंवराला, त्यांतील सर्गसंख्या, आठापेक्षां कमी असल्यानें जसें बाह्यतः महाकाव्य म्हणतां येणार नाहीं, तसेंच तेथें नायकनायिकेच्या अभ्युदयाचीं, नगरींच्या व बाजारांच्या संपन्नतेची, प्रभातसायंकालचीं, श्रृंगारवीरकरुणादि नवरसांचीं व व्यक्तिस्थलादिकांचीं भरघोस वर्णनें नसल्यानें, अंतरंगाच्या दृष्टीनेंही त्याला महाकाव्य ही पदवी बहाल करतां यावयाची नाहीं. शिवाय कोणत्याही वर्णनाचा अथवा प्रसंगाचा

१ सीतास्व–३।१७, १८. २ नागेश–सीतास्व–१३२, १५१. ३ सीतास्व–६।११, १५. ४ नागेश–सीतास्व–२९७, २९८.

विस्तार करण्याची विठ्ठलाची असहायता लक्षांत घेतां, सामराजाप्रमाणें महाकाव्यरचनेचा त्याचा अभिनिवेश त्याच्या कोणत्याच काव्यांत दिसून येत नाहीं. विठ्ठलाचीं सीतास्वयंवर, रुक्मिणीस्वयंवर, विद्वज्जीवन व बिल्हणचरित्र हीं काव्यें, प्रदीर्घ आहेत हे खरें. पण त्यांचीं कथानकें पूर्वपरिचित अथवा विख्यात असल्यानें, त्यांना खंडकाव्यें म्हणण्यापेक्षां आख्यानकाव्यें म्हणणेंच अधिक शोभेल. प्राचीन मराठी काव्यवाङ्मयावर बहुतांशीं भक्तीची दाट छाया पसरल्यामुळें, मेघदूताप्रमाणें स्वतंत्र व मौलिक कथानकांनीं मंडित अशा खंडकाव्यांचें पीक तेथें येणें दुरापास्तच होतें. ‘ स्तुती करावी परमेश्वराची । करूं नये व्यर्थ कधीं नराची ’ ही प्राचीन मराठी कवींची सर्वसाधारण वृत्ति असल्यामुळें, यादवकालांतील व शिवकालांतील कलाकवींनीं प्रदीर्घ काव्यांची जी रचना केली, ती रामायण, महाभारत, महाभागवत इत्यादि पुराणग्रंथांतील कथानकांवरच आधारली गेली, व तिचें स्वरूप साहजिकच मग आख्यानक होऊन बसलें. सामराजाचें रुक्मिणीहरण हें एकटें महाकाव्य वगळल्यास, शिवकालांतील सर्व कलाकवी म्हणूनच आख्यानकवी या अभिधानाला पात्र ठरले आहेत.

## विठ्ठलाचा काल

यानंतर विठ्ठलाच्या कालासंबंधीं थोडेंबहुत लिहिणें जरूर आहे. पण अशा कालनिश्चितीला कवीचे आत्मचरित्रपर उल्लेख, सामाजिक व ऐतिहासिक परिस्थिति, कवीच्या समकालीन अथवा उत्तरकालीन कवींनीं तत्संबंधीं इतरत्र केलेले उल्लेख, व कविकालीं व कविप्रांतीं रूढ असणारे, अलंकार, पेहराव, शस्त्रें, व वाद्यें इत्यादि बाह्य व अंतःसाधनांचा विठ्ठलाच्या संकोची व जेवढ्यास तेवढ्या वृत्तीमुळें इतका तुटवडा भासतो कीं, त्याच्या काव्यावरून त्याच्यासंबंधीं निश्चित असें कांहीं म्हणणें कठिण पडतें. तरी एवढें मात्र खरें कीं, विठ्ठल एकनाथांचा ऋणी असल्यानें, तो एकनाथानंतर झाला असें जरें

म्हणता येतें, तसें इ. स. १६४९ सालीं घडलेल्या तुकारामांच्या सदेह स्वर्गवासाचाही त्यानें अप्रत्यक्षपणें उल्लेख[1] केला आहे असें गृहीत धरल्यास, या अपूर्व घटनेचा एक विशिष्ट परिणाम मनावर होण्याइतक्या जाणत्या वयाचा तो त्यावेळीं होता असें म्हणावें लागेल. शिवाय नागेशाच्या कांहीं काव्यप्रकारांचें त्यानें अनुकरण केल्याचें जें दिसत आहे, त्यावरून तो नागेशाचा जसा अगदीं समकालीन, तसाच तो त्याच्याहून वयानें थोडा लहान असावा असें मानावें लागतें; व सन १६१८ ते १६९३ हा नागेशाचा मी दिलेला काल[2] गृहीत धरल्यास, त्याच्यानंतर सुमारें दहा वर्षे म्हणजे सन १६२८ ते १६९० हा विठ्ठलाचा सर्वसाधारण काल मानावयास कांहींच हरकत नाहीं. विठ्ठलानें आपले काव्यग्रंथ इ. स. १६७४ ते १६८० या दरम्यानच्या कालांतच रचल्याचें त्यानेंच आपल्या ग्रंथांच्या शेवटीं केलेल्या उल्लेखांवरून दिसत असलें, तरी रा. प्र. धों. कानिटकर[3] म्हणतात त्याप्रमाणें, त्याच्या 'रसमंजरीचा' खरा शक १६०९ मानल्यास, सन १६८७ पर्यंत तो ग्रंथरचना करीत होता असें दिसतें. यावरून शिवकालाची समाप्ति हाच विठ्ठलाच्या ग्रंथरचनेचाही अवसानकाल ठरतो. पुनः विठ्ठलानें आपल्या 'विद्वज्जीवन' काव्यांत प्रथमच जे अनुतापाचें उद्गार[4] काढले आहेत, ते त्याला जगाचा कटु अनुभव आल्यानंतरचे, अतएव उतारवयांतले मानल्यास, या ग्रंथरचनेच्या कालीं त्याचे वय साधारणतः ४६ ते ५९ पर्यंत असावें असेंच अनुमान निघतें.

वरील कालगणनेवरून विठ्ठल हा सामराज नागेशांचा समकालीन पण त्यांच्याहून थोडा लहान असून त्याच्या काव्यांत, उमटलेला भाषाविशेषांचा ठसा व तत्कालीं ज्ञात असलेल्या घोड्यांच्या जातींचे[5], त्यांच्या दागिन्यांचे[6],

---

१ सीतास्व-३।२४. २ प्राचीन मराठी कविपंचक-पृ. ९१. ३ विविधज्ञान-विस्तार-वर्ष ५९. ४ विद्वज्जी-१।१३-१९. ५ सीतास्व-६।११, १५. ६ सीतास्व-६।१४.

उंटावरील तोफांचे,[1] 'तुबक' नांवाच्या बंदुकीचे[2], वाद्यांचे[3] व शेटे महाजनादि[4] बहुजनसमाजाचे उल्लेख, त्याचें शिवकालीनत्व सिद्ध करतात. तथापि एकंदरीनें सन १६७४ त झालेल्या शिवराज्याभिषेकानेंच या सर्व आख्यानकवींना हे विविध स्वयंवरप्रसंग मोठ्या कलात्मकतेनें वर्णन करण्याची स्फूर्ति दिल्याचें दिसत असून, सामराज, नागेश व विठ्ठल यांच्या काव्यांतील सर्वसाधारण साम्यस्थळांवरून पहिला दुसऱ्याचा व दुसरा तिसऱ्याचा निःसंशय ऋणी आहे, हाच निष्कर्ष या सर्व विवेचनावरून निघण्यासारखा आहे.

## प्रस्तुत आवृत्तीची संपादणी

हें काव्य माधव चंद्रोबा डुकले यांच्या 'सर्वसंग्रहां' त व नंतर 'काव्यसंग्रहां' त प्रसिद्ध झालें आहे. पण त्या दोनी प्रतींतील मूळ संहिता बऱ्याच स्थलीं इतकी अशुद्ध व कित्येक ठिकाणीं तर इतकी दुर्बोध आहे कीं, काव्यांतील त्या ओळींचा अर्थ लागणेंही दुष्कर झालें. सुदैवानें विठ्ठल बीडकराच्या 'रुक्मिणीस्वयंवर' व 'सीतास्वयंवर' या काव्यांची हस्तलिखित वही माझ्या हातीं येण्याचा योग आला, त्यामुळेंच ही पाठ-शुद्ध प्रत काढणें मला शक्य होत आहे. निपाणी येथील शिक्षक रा. सी. डी. शिंत्रे व माझे एक शिष्यमित्र रा. एस. ए. कुलकर्णी बी. ए. हे दोघेही सद्गृहस्थ वाङ्मयप्रेमी व संशोधक असून, जुनीं हस्तलिखितें प्रयासानें जमविण्याचा त्यांना छंद आहे. रा. शिंत्रे असेच कांहीं निमित्तानें पाटण्यास गेले असतां, तेथील एका वाण्याच्या दुकानांत विठ्ठलाच्या काव्यांची ही वही रद्दीवजा त्यांच्या पाहण्यांत आली व वहींतील मराठी अक्षरानें त्यांना कुतूहल उत्पन्न होऊन, त्यांनीं त्या वाण्याकडून ती मिळविली. पुढें निपाणीस परत आल्यावर, रा. शिंत्र्यांनीं रा. कुलकर्ण्यांच्या

---

१ सीतास्व-६।२१. २ सीतास्व-७।१०. ३ सीतास्व-६।२४. ४ सीतास्व-३।२८.

मार्फत सदर वही माझ्याकडे पाठवून दिली, व 'सदरहू ग्रंथ स्वोचित स्थानीं गेल्याबद्दल समाधान' व्यक्त केलें. आज रा. शिंत्रे यांच्या मजबद्दलच्या आपुलकीप्रमाणें विठ्ठलाच्या काव्यग्रंथांपैकीं, 'सीतास्वयंवर' हें काव्य माझ्याकडून पाठशुद्ध स्वरूपांत, टीपाप्रस्तावनायुक्त प्रसिद्ध होत आहे, याबद्दल मला समाधान वाटतें. रा. शिंत्रे व रा. कुलकर्णी यांनीं केलेल्या मदतीबद्दल त्यांचा मी फार आभारी आहे.

प्रस्तुत प्रतींत स्वीकारलेले पाठ वर ठळक अक्षरांत छापले असून, इतर पाठभेद खालीं तळटीपांत दिले आहेत. त्यामुळें पाठभेदांचा तुलनात्मक विचार करण्यास सोईचें होईल अशी आशा आहे. ग्रंथावर टीपा देतांना कठिण स्थलांचे अर्थ, तुलनेसाठीं जागजागीं समानार्थक अवतरणें व पाठभेदचिकित्सा इत्यादींची भरपूर योजना केली असल्यानें, प्रस्तुत काव्याभ्यासास बरीच मदत होणारी आहे. तरी पण, कांहीं श्लोकांचे विशेषतः सर्ग १ श्लोक ६० व सर्ग ७ श्लोक २७ यांचे, पारिभाषिक व शास्त्रीय अर्थ बसविण्याच्या कामीं, येथील सेवानिवृत्त विद्वान् पंडित, वे. शा. सं. बाळाचार्य खुपेरकर यांच्याशीं केलेल्या चर्चेचा मला फार उपयोग झाला, हें कृतज्ञतापूर्वक नमूद करण्यास मला आनंद वाटतो. शास्त्रीबोवांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

त्याचप्रमाणें हें काव्य प्रकाशित करण्याची जबाबदारी स्वीकारल्या-बद्दल येथील स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉलचे मालक, रा. दा. ना. मोघे यांचेही आभार मानणें क्रमप्राप्त आहे.

कोल्हापूर.
वर्षप्रतिपदा
७।४।५१

दत्तात्रय सीताराम पंगु

# प्रो. पंगु यांचीं पुस्तकें

**संशोधन**

( १ ) सामराज.
( २ ) प्राचीन मराठी कविपंचक.

**संपादित**

( ३ ) वच्छहरण.
( ४ ) सीतास्वयंवर—नागेश.
( ५ ) लवकुशोपाख्यान.
( ६ ) वनपर्व—मुक्तेश्वर.
( ७ ) ज्ञानेश्वरी अ. १२.
( ८ ) ज्ञानेश्वरी अ. १६.
( ९ ) सभापर्व—मुक्तेश्वर.
(१०) सीतास्वयंवर-विठ्ठल.

**प्रबंध**

(११) आस्वाद.
(१२) तुषार.
(१३) पुष्पांजलि.

# सर्ग पहिला.

[ सवाई ]

* श्रीगणनायक सिद्धिविनायक मंगळदायक मंगळमूर्ती[1]
स्फूर्तिवरप्रद जान्हविचा ह्रद येकें[2] सितच्छदभापरिपूर्ती[3] ।
भूषणमंडित तुंदिलें[4] पंडित शुंड अखंडित दंडितें[5] दंदी
कोकनदा[6]सन मूषकवाहन विश्वविमोहन विठ्ठल वंदी ॥ १ ॥

( प्रतिछंद )

\+ श्रीमन्मंगळमूर्ति दे[7] मति पूर्ती[8], राघवकीर्ती सुखकर्ती[9]
ते मी गाइनें[10] गाणीं[11] साक्षे[12] पुराणीं[13] अद्भुत आणी रसवाणीं[14], ।
बोधीं चित्त जनाचें तुं वदनाचें[15] मंडण साचें सुरसाचे
विघ्नें सर्व निवारीं मजला तारीं हे[16] अवतारीं अवधारीं[17] ॥२॥

( मालिनी )

प्रणमित जगदंबे ! कल्पवल्लीकदंबे ।
कवि तुज न विसंबे, प्रेम पोटीं झळंबे, ।

---

* हा श्लोक काव्यसंग्रहप्रतींत दुसरा आहे. १ मूर्ति--हस्तालि. २ एक--काव्यसं. ३ सितक्षदभापरिपूर्ति--हस्तालि. ४ दुंदिल--काव्यसं. ५ दंदित-काव्यसं. ६ कोकन-दाशन-हस्तलि. + हा श्लोक काव्यसंग्रहप्रतींत पहिला आहे. ७ तूं सुमति दे--काव्यसं. ८ पूर्ति--काव्यसं. ९ सुकीर्ती--काव्यसं १० गाईन--काव्यसं. ११ गाणी--हस्तालि. १२ साक्षी--काव्यसं. १३ पुराणा--हस्तालि. १४ रस वाणीं--काव्यसं. १५ तुं वदनाचें--हे दोन शब्द काव्यसं. प्रतींत नाहींत. १६ ये--काव्यसं. १७ हा शब्द काव्यसं. प्रतींत नाहीं.

मजवरि जरि अंबे ! त्वत्कृपादृष्टि तिंबे,
तरि रस अविलंबें काव्यसाहित्य बिंबे ॥ ३ ॥

( शार्दूलविक्रीडित )

ज्ञाता श्रीगुरु रत्नपीठभुवनीं चिद्रत्न सिंव्हासनीं,[1]
हस्ताब्जीं वरदाभयें[2] प्रियतमा शांति क्षमा आसनीं ।
साळंकारें[3] उदार पुस्तक पुढें शिष्या प्रबोधीतसे,
वाक्यें तत्त्वमसीति विठ्ठलकवी साष्टांग वंदीतसे. ॥ ४ ॥

( भुजंगप्रयात )

भरद्वाज वाल्मीकिचें[4] काव्य शोधी,
विधाता स्वयें नारदातें प्रबोधी; ।
महादेव आख्यान सांगे भवानी,
रिझे वासुकी शेष तो चक्षुकानी[5] ॥ ५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

या ग्रंथीं प्रतिपाद्य सत्कविऋषी छंदादिनानाविधें,
सीता सादृश देवता भगवती जें[6] सर्वदा संनिधें, ।
गंबीजादिप्रशक्ति कीलकधरापुत्री प्रयोगांतरें
जाणावा[7] विनियोग, विठ्ठल म्हणे पद्यें जपा आदरें. ॥६॥

---

१ सिंहासनीं--काव्यसं. २ वरदाभयप्रियतमी--हस्तलि. ३ सालंकार--काव्यसं. ४ वाल्मिकिचें--हस्तलि. ५ चक्षुकानीं--काव्यसं. ६ ज्यां--काव्यसं. ७ जाणावाचि नियोग--सर्वसं.

मेघश्याम अनंगधाम चपळां[1] सीता भजावी बुधीं,
चौंहातीं वरदाभयें प्रतिधनुर्बाणीं[2] क्रमें आयुधीं, ।
आत्माराम समस्त काम पुरवी वाचे सदा गाइजे,
सालंकार उदार हास्य हृदयीं सद्विठ्ठलें ध्याइजें ॥ ७ ॥

यंत्रोत्धार[3] किजे, त्रिकोण लिहिजे, श्रीरामबिंदुस्थळीं[4],
मांडांवा, भरतादि दक्षिण दिसे[5] संस्थापिजे[6] मंडलीं, ।
शत्रुघ्ना श्रुतकीर्तियुक्त यजिजे वामांगभागोत्तमीं,
पूर्वें[7] लक्ष्मणउर्मिळा[8] दशदिशा दिक्पाळ मंत्रागर्भीं ॥ ८ ॥

( शिखरिणी )

न जाणें मी छंदें, विशदें[9] यमकें बंधरचना,
न जाणें मी काव्यें नवरस अलंकारसुचना, ।
विभक्ती मी कोशादिक न समजें नाटक निकें,
मऱ्हाटी[10] हे वाणी, नसति अभिधानें सुरसिकें. ॥ ९ ॥

मऱ्हाटे[11] होत्सातें चतुरें[12] जरि हें मान्य करिती,
मनाच्या उल्हासें रचिन तरि मी नाटकरिती, ।
टिका मूळोत्धारें[13] प्रथम धरिली[14] संस्कृत कथा,
सभेमध्यें श्रोते परिसतु महाराष्ट्रउलथा ॥१०॥

---

१ चपला-काव्यसं. २ प्रतिधनुर्बाणाक्रमें-हस्तालि. ३ यंत्रोद्धार-काव्यसं. ४ स्थळीं-काव्यसं. ५ दिशे-काव्यसं. ६ संस्थापिजे-काव्यसं. ७ पूर्वें-काव्यसं. ८ उन्मिळा-हस्तलि. ९ विषद-हस्तलि. १० मराठी-काव्यसं. ११ मराठे-काव्यसं; मराष्ट्रे-सर्वसं. १२ चतुरजनिं- काव्यसं. १३ मूळाधारें-काव्यसं. १४ रचिली-अन्यपाठ-हस्तलि.

( शार्दूलविक्रीडित )

होता पद्माक्ष राजा बहुत[1] करि तपें श्री सुता होय जेणें,
लक्ष्मी स्वप्नांत सांगे, 'हरि भजन करी' प्रार्थिला विष्णु तेणें; ।
भूपाळें याग केला, नृप सुर मिनली[2] मातुळंगी[3] निघाली,
देवां दैत्यां न लाभे, जनकजननि जी[4] संगरीं शांत जाली[5] ॥११॥

( वसंततिलका )

पद्मावती नगर उद्वस जालियानें[6]
यागीं प्रवेश करि वेदवती[7] भयानें,
गेलें *अरिष्ट मग ते करि वन्हिसेवा,
मार्गावया[8] मनिं भजे पति वासुदेवा. ॥ १२ ॥

कीतेक[9] मास दिन संक्रमले तयेसी,[10]
गेला दशानन पुढें शिवबोळंगेसी,[11] ।
जिंतूनि[12] वैश्रवण ये उपविष्ट यानीं,
तों देखिली पुरिति[13] उद्वस राजधानी ॥१३॥

राजा पुसे, प्रगट[14] सारण दूत[15] सांगे,
तेणें निशाचरपतीप्रति हर्ष जागे, ।

---

१ तप करित बहु--काव्यसं. २ मिनले--काव्यसं. ३ मातुलुंगीं--काव्यसं. ४ तैं--काव्यसं. ५ झाली--काव्यसं. ६ झालियानें--काव्यसं. ७ देववती--सर्वसं * समस्त-अन्यपाठ--काव्यसं. ८ भोगावया--काव्यसं. 'पावावया पति भजे मनिं वासुदेवा'--असा अन्यपाठ--काव्यसं. ९ कित्येक--काव्यसं. १० तयासी--काव्यसं. ११ दर्शनासी--काव्यसं. १२ चिंतूनि-काव्यसं. १३ पुरिंत-काव्यसं. १४ प्रकट--काव्यसं. १५ भूत--हस्तालि, सर्वसं.

आला तिर्ते वश करीन म्हणोनि[1] शानें[2]
बोले समर्पक सुधावचनें निदानें. ॥ १४ ॥

( भुजंगप्रयात )

दशग्रीव तीतें म्हणे ' चंचळाक्षी
शरच्चंद्रबिंबाननें ! यज्ञसाक्षी,[3] ।
कसी[4] येकली[5] कंठिसी रात्रिमानी,[6]
उठें चाल लंकेसि बैसे विमानीं ॥ १५ ॥

( वसंततिलका )

असी[7] सहस्र वनिता मज रावणासीं,
तूं होय त्यां मुखरणी[8] मणिभूषणासीं; ।
मंडोदरीप्रमुख[9] होतिल सर्व दासी
तूं वंद्य जेंवि कनक प्रिय पारदासी. ॥१६॥

( भुजंगप्रयात )

म्हणे काय पद्मालया रावणातें,
' अरे ! दुर्मदा नेणसी आपणातें, ।
न ईच्छी[10] कदा माझिया साभिळाशा,[11]
विषांची[12] तुला काय वाटे पिपाशा[13] ॥१७॥

१ म्हणोनि शानें--काव्यसं. २ निधानें--काव्यसं. ३ यक्षसाक्षी--काव्यसं. ४ कशी--काव्यसं. ५ एकली--काव्यसं. ६ रात्रिमानें--हस्तलि. ७ ऐशी--काव्यसं. ८ रणि--हस्तलि. ९ मंदोदरी--काव्यसं. १० इछी--हस्तलि. ११ आभिलाषा--काव्यसं. १२ विशाची--हस्तलि. १३ पिपासा--काव्यसं.

धराया दशग्रीव जों झेंप घाली,
असें वाक्य बोलोनि[1] यागीं निघाली ।
मखाग्नीस मंत्रोदकें शांत केलें,
तदा[2] शोधितां रत्न संप्राप्त झालें ॥१८॥

विमानीं[3] बसों घातली रत्नपेटी,
जवें जाय मंदोदरीलागि भेटी ।
दशग्रीव लंकापुरी शीघ्र सेवी,
रमारत्न देव्हार[4]चौकीस ठेवी ॥१९॥

पुढें कोण्हियेकी[5] दिनीं रात्रिमानीं[6],
प्रियायुक्तयेकांत[7]भोगावसानीं, ।
प्रसंगें निघाली कथा गोड लागे,
दशग्रीव मंदोदरीलागि सांगे. ॥ २० ॥

"कुबेरासि जिंतूनि येतां विमानीं,
पुढें वास म्यां देखिली राजधानी. ।
महीपाळ पद्माक्ष पद्मावतीचा,
तयाची सुता रूप[8]थावा रतीचा. ॥ २१ ॥

---

१ बोलुनि--हस्तालि. २ तदा रत्न संप्राप्त झालें निमोल्लें--काव्यसं.; तदा रत्न संप्राप्त जालें निमालें--हस्तलि. ३ विमानीं बसें घातिलें रत्न पेटीं--काव्यसं. ४ देव्हार--चौकींत--काव्यसं. ५ कोणिएके--काव्यसं. ६ राजमानी--हस्तालि. ७ एकांत--काव्यसं. ८ रूपरेखा--काव्यसं.

मखांतूनियां [1]मातुलंगी निघाली,
तयेतें भली वासना पाश घाली, ।
सुरां दानवां घोर संग्राम [2]जाला,
प्रसंगीं तया भूप युद्धीं निमाला. ॥ २२ ॥

पुढें ते [3]स्थळीं काळ कीते[4]क होती,
करी वन्हिसेवा प्रिया रत्न[5]ज्योती, ।
नव्हे वश्य ते अग्निकुंडीं निघाली,
तितें शोधितां रत्नसं[6]प्राप्ति [7]जाली ॥ २३ ॥

पुढें रत्ननिक्षेप पेटींत केलें,
[8]गृहा आणिलें काळ कित्ते[9]क गेले; ।
तुतें भूषणायोग्य तें रत्न आहे,
उठें [10]जायं देव्हारचौकीस पाहें. ॥ २४ ॥

निरीक्षावया राजपत्नी निघाली,
पदीं पादुका, चालिली हंसचाली, ।
गृहामाजि देव्हारचौकीस आली,
करीं घे, तदा पेटिका जाड्य [11]जाली. ॥ २५ ॥

---

१ मातुलुंगी–काव्यसं. २ झाला–काव्यसं. ३ स्थळीं–काव्यसं. ४ कित्येक–काव्यसं. ५ जोती–काव्यसं. ६ संप्राप्त–हस्तलि. ७ झाली–काव्यसं. ८ घरा–काव्यसं. ९ कित्येक–काव्यसं १० जाइं–काव्यसं. ११ झाली–काव्यसं.

( वसंततिलका )

मंदोदरी उचलितां नुचलेचि पेटी,
सांगावया परतली दशकंठभेटी, ।
विज्ञापना करि, म्हणे, ‘ तुम्हि विघ्न मोटें[1]
हें आणिलें निजगृहा, परि कर्म खोटें ॥२६॥

मातापिता सुहृद गोत्र जिव्यानि योगें,
[3]जाले हताहत सुरासुर, कर्मभोगें ।
आली परंतु इचि निर्गति शीघ्र देखा,
होणार ते अढळ भाविनि कर्मरेखा. ’ ॥२७॥

लंकेश विस्मय करी भयचित्त कांक्षी,
पेटी किमर्थ नुचले कमळायताक्षी ! ।
मी आणितों प्रियतमे ! म्हणतोसि कांये, ’
देवालयांत मग रावण शीघ्र जाये. ॥२८॥

( तोटक )

उचली दशकंधर त्या नुचले,
जड मांदुस[6] यत्न कदा न[7] चले; ।
मयजा मग काय म्हणे, ‘ नृपती !
अभिवंदुनि ईस करा विनती. ’ ॥२९॥

---

१ मोटें-काव्यसं. २ गोत--काव्यसं. ३ झाले--काव्यसं. ४ काय-काव्यसं.
५ जाय-काव्यसं, ६ म्यादुस--हस्तलि. ७नुचले--हस्तलि.

दशकंठ तितें प्रणिपात करी,
उघडी मणिमांदुस त्यां[1] उपरी; ।
अतिसुंदर त्यांत कुमारि असे,
समतोसि दुजी भुवनांत[2] नसे. ॥३०॥

( भुजंगप्रयात )

वर्षे पूर्ण षण्मास लंकेश[3] देखे,
तुळेना तिर्सी[4] पार्वती रूपरेखें, ।
विलोकूनि मंदोदरी स्तब्ध जाली,
पुन्हा मांदुसेमाजि साशंक घाली. ॥३१॥

म्हणे काय मंडोदरी[5] रावणातें,
'तुम्हीं विघ्न हें आणिलें आपणातें, ।
इला ये स्थळीं सर्वथा नेठवावे,
पवित्रा स्थळां आणखी पाठवावें.' ॥३२॥

नृपें दूत पाचारिले, त्यांसि सांगे,
'कुमारीस नेणें तुम्हालागि लागे, ।
तुम्हीं न्या इतें[6] शीघ्र वैदेहदेशीं,
महीमाजि निक्षेपिजे साक्षपेंशीं[7].' ॥३३॥

१या--काव्यसं. २ भुवनासि--हस्तलि., सर्वसं. ३ लंकेस--काव्यसं. ४ तिर्शी--काव्यसं. ५ मंदोदरी--काव्यसं. ६ इजे--हस्तलि. ७ साक्षपेंसी--हस्तलि.

( शिखरिणी )

हलू[1] जाली पेटी, गण उचालितां ते उचलिली,[2]
पुढें नेतां पंथीं घनिं[3] गगनिं गौ[4] काय वदली, ।
म्हणे आतां जाते पुनरपिहि[5] येईन कुमती !
तुझ्या तेव्हां वंशा[6] क्षय करिन लंकापुरपती ! " ॥ ३४ ॥

दशग्रीवें शंका हृदयकमळीं पूर्ण धरिली,
गणीं पेटी नेली, मग जनकदेशांत पुरिली ; ।
पुढें होती पेटी दिन बहुत भूमींत, उपरी,
*सभे आला आशीर्वचन[7] जनका ब्राह्मण करी. ॥ ३५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

विप्रातें नव भूमिदान जनकें संकल्पिलें त्या द्विजें,[8]
तासीं नांगर जुंपिला मनिं म्हणे, ' पेरीन नाना बिजें. '।
प्रारंभीं हलदांतिं[9] त्या अडकली पेटी समुत्पाटली,
देखे ब्राह्मण तो निघे प्रभुप्रती आणी, सभा दाटली. ॥ ३६ ॥

( वसंततिलका )

राजा म्हणे ' द्विजवरा ! क्षितिदान केलें.
तें घेइजे तरि पुराकृत पुण्य गेलें. ।

---

१ झाली—काव्यसं. २ उचलली--काव्यसं. ३ ध्वनि--काव्यसं. ४ गो--काव्यसं.
५ भि--काव्यसं. ६ वंश—हस्तलि. * सर्वे--सर्वसं. ७ आसिर्वचन—हस्तलि.
८ संकल्पुनी दे द्विजा --अन्यपाठ--काव्यसं. ९ हळदंत—हस्तलि., सर्वसं.

क्षेत्रीं धनादि तितुकें तुमचें दयाळा !
हें[1] आइकें,' द्विज म्हणे 'परिसे नृपाळा !' ॥३७॥

( भुजंगप्रयात )

'दिल्हें क्षेत्र तेव्हां न संकल्प केला,
तुझें[2] गुप्तवित्ता नसें मी भुकेला; ।
कृषी आमुची हें तुझें द्रव्य[3] राया !
धनाचा मला लोभ नाहीं पुरा या. ॥ ३८ ॥

महाथोर संकष्ट रायासि जालें,
प्रधानांसि राजा म्हणे ' विघ्न आलें ।
धनें[4] ब्राह्मणाचेनि आम्हांसि घेणें,
विचारूनि सांगा निकें होय जेणें.' ॥ ३९ ॥

( मालिनी )

जनक परम पुण्यश्लोक त्यातें प्रधानीं
दृढमति विनवीलें. 'आमुचें शब्द मानीं, ।
उघडुनि अवलोकी काय पेटींत आहे.'
तदनुमत[5] विचारीं भूपति स्वस्थ[6] राहे. ॥ ४० ॥

उघडिलि मग पेटी त्यांत पंचाब्दि[7] कन्या,
कुसुमधनुषमूर्ति ब्रह्मरूपा सुधन्या; ।

---

१ हें ऐकुनी--अन्यपाठ-काव्यसं. २ तुझ्या--काव्यसं. ३ देवराया-सर्वसं. ४ धना ब्राह्मणाच्या न आह्मासि घेणें-काव्यसं. ५ तदनुमति विचारें-हस्तलि. ६ स्वस्थ-काव्यसं. ७ पंचाब्धि--हस्तलि.

त्रिभुवनज[1]नित्याचें तें शिरोरत्न भासे,
जनक नयनपद्मीं चित्र देखोनि हांसे. ॥ ४१ ॥

( इंद्रवज्रा )

संतोषला ब्राह्मण देखिली सुता,
दे वेद[2] आशीर्वचनासि मागुता; ।
राजा म्हणे, 'हे दुहिता दिल्ही भवें,'
दानें द्विजातें करि भूप वैभवें. ॥ ४२ ॥

( स्वागता )

तोरणादि मखरें उभारिलीं,
गोधनें द्विजवरासि दीधलीं[3] ।
दुंदुभीप्रमुख वाजतीं तुरें,
शोभतीं[4] लखलखीत गोपुरें. ॥ ४३ ॥

( वसंततिलका )

राजा पवित्र जनकाहुनि कोण आहे?
ज्ञाता[5] दयाळु दुसरा उपमा न साहे ।
देही असोनि जन त्यासि म्हणे विदेही,
द्वारीं शुकादिक उभे सुर सिद्ध तेही. ॥ ४४ ॥

---

१ त्रिभुवन जनिताचे--काव्यसं. २ देव--काव्यसं. ३ वाटिलीं--काव्यसं. ४ शोभलीं--काव्यसं. ५ ज्ञानी--काव्यसं.

( भुजंगप्रयात )

दिसेंदीस संवर्धमानासि पावे,
सुलावण्यसिंधूसि तारुण्य धांवे ।
अकस्मात ये राम·षष्टावतारी,
महर्षीसवें नारद ब्रह्मचारी. ॥ ४५ ॥

( सवाई )

भाट अचाट पुढें गुण वर्णिति,
गौरविलें जनकें क्षितिपाळें,
होय महोत्सव त्या मिथुळापुरिं,
नांदति लोक सुखी चिरकाळें. ।

दुःख दरिद्र जरामरणादिक
रोग नसे सुकृती प्रतिपाळी,
नर्तन कीर्तन सौख्य घरोघरिं
नागरिकाप्रति नित्य दिवाळी. ॥ ४६ ॥

भार्गवराम तथा मुनि नारद
ते जनकाप्रति भेटिस आले,
बैसविले मुनि विष्टर देउनि
आदर देखुनि साधु निवाले[1] ।

---

१ निघाले--काव्यसं.

पूजन भोजन गंधविलेपन
वंदन सांग यथाविधि केलें,
षोडश त्यां उपचार करी
स्तुति भूप म्हणे 'निजभाग्य उदेलें.' ॥ ४७ ॥

( वसंततिलका )

संतोषला परशुराम म्हणे 'नृपाळा!
पाहों तुझी कुमरि लक्षणयुक्त बाळा'।
"आणा वदे" नृप म्हणे परिचारिकांसी,
तों ते सख्यांसहित खेळतसे विलासी.[1] ॥ ४८ ॥

( भुजंगप्रयात )

सख्या पांचसें त्यांसवें ते निघाली,
पुढें चाप देखोनियां स्तब्ध जाली[2]।
तिनें शीघ्र केलें धनुर्दंड घोडें,
वरी बैसवी नाचवी लाडकोडें.[3] ॥ ४९ ॥

( वसंततिलका )

देखोनियां परशुराम मनीं निवाला,
अंकावरी बसविली, शिकवी[4] नृपाळा;।
'हे तों नव्हे तव सुता, तुझ[5] आदिमाया
भाग्योदयें प्रगटली त्रिजगांत राया!' ॥ ५० ॥

---

१ विळासी–हस्तलि. २ झाली–काव्यसं. ३ सर्वसंग्रहप्रतींत या श्लोकाच्या पहिल्या दोन ओळींचा व्यत्यास केला आहे. ४ सिकवी–हस्तलि. ५ तुझी–काव्यसं., सर्वसं.

राजा म्हणे, ' न धरिजे मनिं कोप कांहीं,
अज्ञान बाळक इला गुण दोष नाहीं; ।
केलें इनें तव शरासन[1] वज्रघोडें,
क्रीडा करी तुजपुढें बहु लाडकोडें. ' ॥ ५१ ॥

( स्वागता )

परशुराम करी जनकीं[2] कृपा,
' धनुष[3] ठेविं ' म्हणे ' सदनीं नृपा ! ।
गुण शरासनिं[4] योजिल जो, इला
वरिल ' हा पण दारुण बोलिला. ॥ ५२॥

( वसंततिलका )

तो गेलिया जनक काय म्हणे प्रधाना,
सीतास्वयंवर किजे, वचनार्थ माना ।
तों ते पुरोहित वदंति ' करा अनुज्ञा.'
हें मानलें अमृतवाक्य विशेष सुज्ञा. ॥ ५३ ॥

( शार्दूलविक्रीडित )

पत्रें कुंकुमभांडितें लिहुनियां दूतां[5] दिल्हीं भूभुजें,
'आणा भूतळिंचे नरेंद्र तितुके ' सांगे[6] स्ववक्त्रांबुजें. ।

---

१ शरासनवज्रघोडें–काव्यसं. २ जनका–हस्तलि. ३ धनुष्य–हस्तलि. ४ शरासन–हस्तलि. ५ दुतां–हस्तलि. ६ संगें स्वगंत्रांबुजें.– काव्यसं., सर्वसं.

'स्वर्गीचे सुर सिद्ध सप्ततळिंचे शेषादि राजे मुनी,
विश्वामित्र समागमें द्विज रुषी[1] घेऊनियां[2] वंदुनी.' ॥५४॥

राजाज्ञा मुगुटीं[3] तुरंबुान गणीं गंतव्य केलें असें,
पत्रें कुंकुमभाडेतें तिहिं दिल्हीं ज्या ज्या स्थळीं[4] जो वसे; ।
गार्वी पुत्र नसेति यास्तव नय राजा अयोध्यापती,
आले त्या व्यतिरिक्त[5] सर्व नृपती ऐसी[6] कथा संम्मती[7].॥५५॥

लंकेशें शुकसारणांस[8] वसुधा पाहावया धाडिलें,
ते दोघेजण हिंडतीं तंव तिहीं आश्चर्य हें देखिलें; ।
तेंहीं[9] जाउनि रावणासि कथिलें तो चालिला आदरें,
बैसे पुष्पकवाहनीं[10] मग निघे निर्मूळ सीतास्वरें. ॥ ५६ ॥

तेजःपुंज विमान पुष्पक फुलीं वेष्टीत मुक्तावळी,
रत्नस्तंभ खणोखणीं घणघणा वाजेति घंटावळी, ।
बैसाया स्थळें[11] तें मनोमय पुरे रात्रौ मृगांकापरी,
भू स्त्री हारमणी दिवा दिनमणी उद्बोध जैसा करी.॥५७॥

( तोटक )

रघुनाथकथा निकें[12] आइकिजे,
भजकां सुखदायक, पाठ किजे, ।

---

१ ऋषी-काव्यसं २ घेवूनि या--काव्यसं. ३ मुकुटीं--काव्यसं. ४ स्थळीं--काव्यसं.
५ वितरुक्त-हस्तलि. ६ ऐशी--काव्यसं. ७ सन्मती-काव्यसं. ८ शारणास-हस्तलि.
९ तीहीं-काव्यसं. १० पुष्पकवाहिनी--हस्तलि. ११ स्थळ-काव्यसं. १२ बहु [illegible]-काव्यसं.

रसवृद्धि समृद्धि[1] धनासि करी,
अनुपम्य सुधार्णविंची लहरी. ॥५८॥

( वसंततिलका )

वाणी पवित्र रघुनाथचरित्र गातां,
तें आइका पतितपावन होय आतां. ।
हें पंडितासि विनती करणें न लागे,
'घ्या वो[2] ! सुगंध' मधुपाप्रति कोण सांगे? ॥५९॥

( शार्दूलविक्रीडित )

धान्यांचे[3] ढिग सप्त वेद वरुते त्री, या स्थळीं मांडणें
पूर्वी पुस्तक पूजणें शकुन पैं त्यानंतरें पाहणें, ।
तीं ठाईं तिनि[4] पोफळें वरि फुलें चिंतूनिया ठेवणें,
आदौ सर्ग तथा दशांकु[5] दशकिंचा श्लोकां[6] क्रमें देखणें. ॥६०॥

श्रीमज्जानकिचें स्वयंवर निकें[7] उत्पत्ति सांगीतली,
रामें[8] उद्धरिली शिळा[9] पदरजें जे बोलणों लागली, ।
वक्ता सत्कविराज विठ्ठल म्हणे सौभाग्यदायी कथा,
इच्छेतें पुरवील सर्ग पहिला श्लोकांर्थ[10] घ्या नान्यथा ॥ ६१ ॥

इति[11] श्रीजानकीस्वयंवर विठ्ठलदासकविकृतौ जानकीउत्पत्तिनाम प्रथमः सर्गः ॥ १ ॥

---

१ सुधारविंची--काव्यसं. २ हो--काव्यसं. ३ धान्याचे बहु ढीग सत्य वरुतें त्रीं त्यांतळीं मांडणें--काव्यसं. ४ तिन--काव्यसं. ५ दशा--काव्यसं. ६ श्लोक--काव्यसं. ७ कथा--काव्यसं. ८ मार्गी उद्धारेली शिळा रघुवरें तें बोललें--अन्यपाठ--काव्यसं. ९ शिला--काव्यसं. १० भावार्थ--अन्यपाठ--काव्यसं. ११ असा उल्लेख काव्यसंग्रह-प्रतींत प्रत्येक सर्गाच्या शेवटीं नाहीं.

# सर्ग दुसरा

( द्रुतविलंबित )

दशरथाप्रति जाउनि[1] कौशिकें[2],
वचन मागितलें पहिलें निकें, ।
' अजसुता ! रविवंशविभूषणा !
रघुविरास[3] दिजे मखरक्षणा. ' ॥ १ ॥

मग वशिष्ठ[4] म्हणे, ' अजनंदना !
पुरविजे मुनिची मनकामना. ' ।
नृपतिनें हृदयांत विचारिलें,
सिकविले[5] गुरुचें प्रतिपाळिलें. ॥ २ ॥

रघुपती दिधला मुनिकारणें
सह[6]सुमित्र दुजा अवधारणें, ।
मग नरेंद्र म्हणे ऋषि[7] कौशिका !
उभयतां प्रतिपाळ किजे निका. ' ॥३॥

त्रिजगमित्र मुनी मनिं तोषले,
मग तिघे वहनावरि बैसले. ।
रणतुरें करिती घनगर्जना,
कदानिं राघव मार्दिल दुर्जना. ' ॥४॥

---

१ येउनि--काव्यसं. २ कौतुकें--हस्तलि. ३ रघुपतीस--काव्यसं. ४ वसिष्ट--काव्यसं. ५ शिकविलें--काव्यसं. ६ सवें--हस्तलि. ७ रुषि--हस्तलि.

( शार्दूलविक्रीडित )

विश्वामित्र ऋषीश्वरें दशरथा प्रार्थूनि आराधिलें,
यागा रक्षण रामलक्ष्मण सवें तेणें मखा आणिलें. ।
शस्त्रास्त्रें उपदेशिलीं मुनिवरें रामा सुमित्राप्रती,
दोघे बंधु विराजमान सरिसें एकासनीं शोभती. ॥५॥

मार्गी मारुनि ताटिकेप्रति[1] शरें केला सुबाहू पुरा,
लंकाप्राप्ति मरीचिला करुनियां संरक्षिलें अध्वरा, ।
ते काळीं मिथिलेंद्रदूत जवळी सिद्धाश्रमा पातले,
केलें मस्तक नम्र, पत्र दिधलें, दोघे उभे ठाकले. ॥६॥

वाची कुंकुमपत्र कौशिकमुनी, रामें[2] स्वयें आइके,
तेते[3] अर्थ निरोपिला पृथिविचे भूपाळ येती निकें; ।
'स्वामीनें ऋषि सर्व घेउनि धनुर्यागा त्वरें येइजे,'
ते काळीं परमादरें मुनिवरें रामाप्रती बोलिजे. ॥७॥

'आम्हीं जात असों स्वयंवरसभा पाहावयाकारणें,
राजाज्ञा नसतां तुम्हांसि [4]मिथिळें नेऊं नये आपणें, ।
आतां जा शरयूतटाप्रति तुम्हीं, आम्हांसि आज्ञा दिजे,'
ऐसें उत्तर [5]आइकोनि विनंती[6] श्रीरामचंद्रें किजे. ॥ ८ ॥

---

१ ताटिका–हस्तलि. २ रामा–हस्तलि. ३ ते अर्थी मुनि रोविला–काव्यसं. ४ मिथुळें–हस्तलि. ५ आइकुनि–हस्तलि. ६ विनवी–हस्तलि.

( इंद्रवज्रा )

‘ भूमंडळीचे क्षितिपाळ येती,
ते या प्रसंगीं मुनि ! देखिजेति, ।
पाहूं चला कौतुक, बाध नाहीं,
राजा न कोपे अणुमात्र कांहीं.’ ॥ ९ ॥

ज्ञाता महर्षी हृदयीं विचारी,
‘ हा तारक ब्रह्म गुणावतारी, ।
होणार तें तें न टळे स्वसंगें,
रामासि आहे यश या प्रसंगें.’ ॥ १० ॥

( भुजंगप्रयात )

रथारूढ वेगीं तिथे स्वार [2]जाले,
[3]ऋषींचे थवे चालती भोंवताले, ।
पुढें वाजती दुंदुभी शंख भेरी,
अनेकें तुरें आणि नाना नफेरी. ॥११॥

( वसंततिलका )

कांताशिरीं सजळ कुंभ शुभ प्रयाणीं
होती पुढें शकुन वायस सव्यपाणी. ।
जाती [4]मयूर नकुळादि कुरंग [5]मागें
[6]तैसेंचि तास हरिणीगण वामभागें. ॥१२॥

१ तया–हस्तालि. २ झाले–काव्यसं. ३ रुषींचे–हस्तालि. ४ मयोर–हस्तालि. मागें–हस्तालि. ६ तैसेचि ते हरिणिचे गण वामभागे–अन्यपाठ–काव्यसं.

सौमित्र राम ऋषि भद्रदनासि आले,
देखोनियां विपिन रम्य निवांत जाले. ।
छायासुशीतळकुशोपवनीं निवाले,
केला रथ स्थिर[1] रघूत्तम[2] मंद चाले. ॥१३॥

वायू सुशीतळ सुगंधित मंद पावे[3]
तो लागतां तनुसे[4] सौख्य महा दुणावे. ।
होती कुहु कुहु सुधारव कोकिळांचे
उत्फुल्लले नव कळे अरुणोत्पळांचे. ॥१४॥

( मालिनी )

फुलित ललित वल्ली मालती पुष्पयाती
भ्रमरनिकर गुंजात्कारती मंद भाती, ।
फळति सकळ शाखीं राहिलो[5] राम देखा,
मिथिळपुरिस दूरी योजनें पंच लेखा. ॥१५॥

( वसंततिलका )

येकीकडे विपिन उध्वस राम देखे
तो त्या वनांत नवपल्लवता न देखे. ।
हें कींनिमित्य[6] रघुराज[7] पुसे मुनींद्रा,
संतोषला मुनि म्हणे, ' परिसे महींद्रा ! ॥१६॥

---

१ स्थिर--काव्यसं. २ रघोत्तम--हस्तलि ३ व्हावे--काव्यसं. ४ तनुशि--काव्यसं.
५ रोहिला--काव्यसं. ६ किंनिमित्त--काव्यसं. ७ रघुनाथ--काव्यसं.

( मालिनी )

उपहत वन, याचें भाग्य आतां उदेलें,
परिससि रघुनाथा ! भूत वर्तोनि गेलें ' ।
विपिनकथन विश्वामित्र रामा निरोपी,
त्रिभुवनपति ! गोष्टी होति अद्यापि गोपी. ॥१७॥

( वसंततिलका )

' हें तों अहिल्यावन[2] नाम याचें
रामा ! दिसे उद्वस गौतमाचें, ।
आहे तपस्छानक[3] शापजाळें,
विध्वंसिलें उद्धरिं शीघ्रकाळें. ' ॥ १८ ॥

( शिखरिणि )

' अहिल्या कोणाची ' रघुपति पुसे ' सद्गुरु ! मला,
कधीं सांगा कोणी कठिण तिजला शाप दिधला? ' ।
तया विश्वामित्रें कृतयुगकथा सांग कथिजे,
गुणीं आकर्णाया क्षणभरि निकें मानस दिजे. ॥ १९ ॥
अहिल्या[6] ब्रह्मयाची बुज रघुपती ! मानससुता
तिच्या सौंदर्यासी सुरयुवति सामान्य बहुता, ।
विरंचीनें केला पण कठिण, ' हे आत्मतनया,
प्रदक्षीणा भूची प्रथम करि जो देइन तया. ' ॥ २० ॥

---

१. गोष्टी--हस्तलि. २ अहल्यावन--काव्यसं. ३ तपस्थानक-काव्यसं. ४ शाप-जालें-हस्तलि. ५ अहल्या--काव्यसं. ६ अहल्या--काव्यसं. ७ माने न बहुधा-अन्यपाठ--काव्यसं. ८ प्रदक्षणा-काव्यसं. ९ भूमीची--सर्वसं.

( वसंततिलका )

इंद्रादि देव नर किन्नर दैत्य आले
येकापुढें प[1]ळति एक जवें निघाले. ।
[2]हें क्लस गौतमरुषीप्रति वाक्य जालें,
तो चालिला म[3]ानि पथीं श[4]कुनें निवालें. ॥ २१ ॥

( भुजंगप्रयात )

[5]उभैतोमुखी गौ पुढें प्राप्त ज[6]ाली,
म्हणे 'हे[7]च पृथ्वी' नमस्कार घाली. ।
करी सप्त आवर्तनें भोंवताला,
नमस्कारिलें, ब्रह्मधामासि आला. ॥ २२ ॥

( शिखरिणी )

विरंचीनें कन्या मुनिस दिधली नेमव[8]चनें.
पुढें आला वृत्रासुरमथन देखोनि नयनें. ।
म्हणे 'कोठे होतां ?' मग विरिचिनें[9] तथ्य कथिलें.
न चाले इंद्राचे परि विषमं[10] चित्तांत धरिलें. ॥ २३ ॥

( द्रुतविलंबित )

कपट जाणितलें कमळासनें,
मुनिस सांगितलें चतुराननें. ।

---

१ पळत--काव्यसं. २ हें कृत्य गौतमऋषीप्रति श्रुत झालें--काव्यसं. ३ मुनि--काव्यसं. ४ शकुनी--काव्यसं. ५ उभौतोमुखी--हस्तलि. ६ झाली--काव्यसं ७ हेचि--काव्यसं. ८ वेदवचनें-हस्तालि. ९ विखनसें--हस्तालि. विधिन-सर्वसं. १० कपट पोटांत धरिलें-अन्यपाठ-काव्यसं.

'क्षण इतें परतें न करीं कधीं,
ठकिरु इंद्र इला त्यजिसी[1] तधीं.' ॥ २४ ॥

बहुत वासर संक्रमिले[2] तिला,
शतमखें टपतां दिन साधिला; ।
परम पर्वणि सूर्यपरागिंची
विशद पुण्यकथा परिसा तिची. ॥ २५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

श्रीसूर्यग्रहणीं समेत रमणी[3] साधावया पर्वणी,
गेला वैतरणीस गौतममुनी स्नानास संतर्पणीं. ।
मोक्षार्ती गृहिणीस पाककरणीं धाडी पुढें ते क्षणीं,
होता तों तरुणीस इंद्र टपणी तो पातला अंगणीं. ॥२६॥

आला गौतमरूप घेउनि गृहामध्यें उभा ठाकला,
मागे तीस रती, धरी वणगटीं कामज्वरें दाहिलों.[4] ।
ते बोले, 'रति वर्ज दोष दिवसा शास्त्रार्थ हा ठाउका,
स्वामी! कैंवि तुम्हीं अधर्म करिता? नेंदी कदा भाउका.' ॥२७॥

तो बोले, 'मृगशावलोलनयने! सामर्थ्यवंता पुढें
दोषादोषविचार चार करिती नेणेति शास्त्रें मुढें[5]. ।

---

१ त्याजेशी--काव्यसं. २ संक्रमले--हस्तलि ३ तरणी--काव्यसं. ४ ध्यापिला--अन्यपाठ--काव्यसं. ५ मुढे !--काव्यसं.

कोपें भस्म करूं सके त्रिभुवना, त्या दोष कैं बांधती[1]?
शापानुग्रह मी समर्थ, मजला ब्रह्मेंद्र आराधिती. ॥ २८ ॥

स्वक्षेत्रीं स्वमनोदयें विचरता निर्दोष लोकीं असे,
आच्छादूं[2] रविबिंब काय दिवसा? हें पाहसी लालसे!।
पाडूं दारुण अंधकार, इतुका अत्याग्रहो[3] ना किजे.'
शास्त्रार्थी[4] तिस गोंविलें, मग तिनें संभोग त्यातें दिजे. ॥ २९ ॥

इंद्रत्वा प्रगटी रतांतसमयीं देवे सतीं दुर्गती,
कंटाळूनि थरारिली 'उठ' म्हणे 'पापात्मका[5]! दुर्मती!।
दोघां शापिल ये क्षणीं, कवण पैं वर्जी तपोवर्धना?
कापट्यें ठकिलें, कळंक मजला तां[6] लाविला दुर्जना!' ॥ ३० ॥

दोघांच्या सुरतप्रसंगसमयीं गुंफेसि आला मुनी,
तो जाणें परगामिनी, मग म्हणे सक्रोध बाहेरुनी।
पाचारी ऋषि, 'चोरटा कवण तूं? संभोगिली तां[7] सती.'
आशंका धरि पाकशासन, तया दूंषी[8] अहिल्या सती. ॥ ३१ ॥

'चांडाळा! निघ बाहिरी' झिडकिला; मार्जारवेशें[9] दडे.
जाला[10] कीटक इंद्रगोप सहसा दृष्टीस जातां पडे.।

---

१ बाधिती--काव्यसं. २ अछादुं--हस्तलि. ३ अत्यग्रहो--हस्तलि. ४ शास्त्रार्थे--हस्तलि. ५ पापात्मा--हस्तलि ६ त्वां--काव्यसं. ७ त्वां--काव्यसं. ८ दूसी--हस्तलि. ९ मार्जारवेषें--काव्यसं. १० झाला--काव्यसं.

झारीचें जळ सिंपिलें मग पुढें केला उभा चोरटा,
बोले त्याप्रति, 'घातकी विषयता संपादिली वोखटा.॥३२॥

जे ठायीं रमलासि[1] ते[2] तुज भगें होतीं सहस्रावधीं,
दोनी अंड झडो, तुझी लुति गळों, दुर्गंधि हो मंदधी !'।
आच्छादी[3] मुख दाखवी[4] पुनरपी तात्काळ हो शापिता
सर्वांगीं स्थिति[5] बाणली सुरपती उश्शाप[6] नेघे भितां. ॥३३॥

इंद्राचे युग[7] अंडदंड गळतां ऐरावतें झेलिले[8]
ते माथां धरितां शतक्रतु पळे[9], स्त्रीशीं ऋषी [10]बोलिले.।
'तूं कैशी रमतां म्हणेसि पळ तूं' दोघां ऋषी शापिती[11].
'कां लत्ताप्रहरें[12] तया न दिधलीं? होईं शिळा ये [13]क्षितीं.'॥३४॥

ते बोले, 'तुमचें स्वरूप धरिलें, शास्त्रार्थ वाखाणिला[14],
मी तों निष्कपटी, पदार्थ इतुका दैवें घडों आणिला[15].'।
उःशापा करुणानिधी मग मुनी जल्पे सुधासौरसीं,
'श्रीरामांघ्रिसरोजरेणु जडतां पूर्वस्थिती पावसी.' ॥३५॥

( उपजाति )

होता ऋषी गौतम पाठिमोरा; तात्काळ शापें मळरूप घोरा,।
वर्षें शिळा साठिसहस्र जाली, कुंडाग्निनें पर्णकुटी जळाली. ॥३६॥

---

१ रमला--काव्यसं. २ तर्सी--काव्यसं. ३ अच्छादी--हस्तलि. ४ दाविसी--हस्तलि. ५ स्थिति--काव्यसं. ६ उःशाप--काव्यसं. ७ युगदंगअंड--काव्यसं. ८ झेलिला--काव्यसं. ९ लपे--हस्तलि. १० बोलिला--काव्यसं. ११ ही ओळ काव्यसं. व सर्वसं. प्रतींत चवथी आहे. १२ लत्ताप्रहरीं--काव्यसं. १३ ही ओळ काव्यसं. प्रतींत तिसरी आहे. १४ वाखाणिले--हस्तलि. १५ आणिली--हस्तलि.

( स्वागता )

झाडिलें मग मृगासन तेणें, शापिलें विपिन यास्तव[1] एणें[2], ।
श्वापदें[3] पळति वृक्ष जळाले, कोरडे नदि सरोवर जालें[4]. ॥ ३७ ॥

( भुजंगप्रयात )

परित्यागिलीं रम्य नीडें पवित्रें,
तरू शुष्क जाले समूळाग्रपत्रें ।
न राहे वनामाजि भृंगी न मासी,
गतक्रोध वैराग्य ये गौतमासी. ॥ ३८ ॥

( शालिनी )

मेरुशृंगातें तपातें निघाला,
ऐसा शक्रें घातला त्यासि घाला. ।
पश्चात्तापें क्रोध शांत्यर्थ जाला,
तोयस्पर्शें अग्नि जैसा विझाला. ॥ ३९ ॥

( वसंततिलका )

शांतारसाजवळि वीर कदा न राहे,
सूर्योदयीं[5] तिमिर देखुनि काय राहे ? ।
धर्मापुढें दुरित राहिल हें घडेना,
श्री आलियावरि दरिद्र जसें उरेना. ॥ ४० ॥

---

१ त्यास्तव-हस्तालि. २ तेणें-हस्तालि. ३ स्वापदे-हस्तालि. ४ झाले-काव्यसं.
५ सूर्येदयो-सर्वसं.

( भुजंगप्रयात )

म्हणे, ' म्या कसा आपुला घात केला ?
शुचिस्नात आलों स्वगुरू भुकेला, ।
पुढें इंद्र येवोनि[1] [2]कापट्यवशें,
सती भोगिली लिंपिली पापलेशें. ॥ ४१ ॥

यदर्थी अहिल्येस तो[3] दोष नाहीं,
वृथा शापिली, म्यां न जाणोनि कांहीं, ।
नव्हे इंद्र सामान्य, देवाभिमानी,
न जाणोनि केली तपोपुण्यहानी[4]. ॥ ४२ ॥

( उपजाति )

कौमारदेहीं सुरतानुरागी,
चंद्राग्निगंधर्व तिघे विभागी, ।
येकेक[5] संवत्सर दोनि भोगी.
दुर्बोध याचा धरि कोण योगी ? ॥ ४३ ॥

मनश्चंद्रमा अर्यमा नेत्र ज्याचे,
मुखापासुनी भूत इंद्राग्नि त्याचे, ।
जगत्प्राण जो प्राण संपूर्ण गात्रीं
विराटस्वरूपीं हरी देहमात्रीं. ॥ ४४ ॥

---

१ येउनि--हस्तालि. २ कापट्यत्वेषें--काव्यसं. ३ संतोष नाहीं--काव्यसं. ४ हाणी--हस्तालि. ५ एकेक--काव्यसं.

होणार तें तों न टळे प्रमाणीं,
बोलोनि गेले मुनि वेदवाणी, ।
ब्रह्मादिकां भोग घडे अनिच्छा,
बळीयसी[1] केवळ ईश्वरेच्छा[2]. ॥ ४५ ॥

क्रोधें असा घात समस्त केला,
पुण्यक्षयो संग्रह सर्व गेला ' ।
तो क्रोध संदग्ध करावयातें
प्रस्थान[3] केलें मुनिनें तपातें. ॥ ४६ ॥

( शार्दूलविक्रीडित )

आत्माराम गुणाभिराम भगवान् श्रीराम आणोनियां,
विश्वामित्र कथा निरूपण करी, त्यातें म्हणे ' स्वामियां ! ।
पाहूं शीघ्र, चला शिला कवण ते कोणे स्थळीं[4] ते कसी[5] ? '
' ते पैं उद्धरसील ' कौशिक म्हणे ' उःश्याप[6] तूं जाणसी. ' ॥ ४७ ॥

विश्वामित्र म्हणे, ' शिळा पंसरिली[7] स्त्रीरूप वंशातळीं,
पादस्पर्श किजे ' रघूतम वदे ' शापील कोपानळीं. ' ।
सांगें कौशिक ' उध्दरी पदरजें निर्दोष आज्ञा असे. '
पादक्षालन आचमनादि करुनी रामांघ्रि लावीतसे. ॥ ४८ ॥

---

१ बळी असे--काव्यसं. २ ईश्वरिच्छा--हस्तलि. ३ प्रस्थान--काव्यसं. ४ स्थळी--काव्यसं. ५ कशी-काव्यसं. ६ उःशाप-काव्यसं. ७ पसरली--काव्यसं.

पाहे राम समेत कौशिकमुनी आश्चर्यता वाटली,
ते तात्काळ[1] पदाब्जरेणु जडतां पूर्वस्थिती[2] पावली. ।
श्रीरामांघ्रि नमूनि गौतमसती वंदी तपोवर्धना,
बोले, 'उद्धरिलें[3] तुझ्या पदरजें ठेवी पदीं मूर्धना.' ॥४९॥

( भुजंगप्रयात )

पुसे राम, 'तूं कोण ? होतीस कोठे ?'
म्हणे, 'मी अहल्या, सती भाग्य मोठें. ।
तुझीं देखिलीं दिव्य पादारविंदें,
जयाकारणें देव जाले[4] मिलिंदें[5]. ॥ ५० ॥

( शार्दूलविक्रीडित )

रामा ! कैवल्यधामा ! न कळसि निगमा नेति वामांगि रामा
जिव्हे श्रीरामनामावळि जपत उमाकांत चित्ताभिरामा ! ।
देसी[6] मोक्षार्थकामामृतपद परमानंद तूं पूर्णकामा
नाना अन्याय सामाविशि, तव महिमा जाणसी[7] तूंचि रामा !॥५१॥

कांता उद्धरिली म्हणोनि कळलें ज्ञानी ऋषी गौतमा,
आला शीघ्रगती उभा रघुपतीपासीं समीरोपमा. ।
जाली[8] भेटि परस्परें, स्तुति करी 'साकार ब्रह्म स्वयें,
तो तूं मूर्त[9] निरीक्षिलासि[10] नयनीं भाग्योदयें निश्चयें.' ॥५२॥

---

१ तत्काळ–काव्यसं. २ पूर्वस्थिती–काव्यसं. ३ उध्दरले--हस्तलि. ४ झाले--काव्यसं. ५ मिळिंदें–हस्तलि. ६ देशी -काव्यसं. ७ जाणशी–काव्यसं. * देशी धर्मार्थकामामृतपदमहमानंद तूं पूर्णकामा । नाना अन्याय सामाविशि तव गरिमा जाणसी तूंचि राम॥– अन्यपाठ--काव्यसं. ८ झाली--काव्यसं. ९ मूर्ति-हस्तलि. १० निरीक्षिलासि--हस्तलि.

( भुजंगप्रयात )

अहिल्यां[1] दिल्ही गौतमा वेदमंत्रीं,
विधानोक्त जे बोलिले कर्म तंत्रीं, ।
विरिंच्यादि[2] गीर्वाण तेथे मिळाले,
ऋषीकारणें प्रार्थिते सर्व जालें[3]. ॥ ५३ ॥

' महाराज ! इंद्रासि उश्शाप[4] दीजे,
समस्तां सुरामाजि तो मान्य कीजे, ।
न चालेति इंद्राविना यज्ञदानें,
कृपें यासि उश्यापें[5] दीजे विधानें. ' ॥ ५४ ॥

म्हणे, ' देवहो ! वासवालागिं आणा,
पुन्हा त्यासि उश्याप देईन जाणा. ' ।
समुद्रांतुनीं आणिला इंद्र देवीं,
वदे, ' वंद्य देवांत तूं सर्व सेवीं. ' ॥ ५५ ॥

भगांचे शरीरावरी नेत्र जाले[6],
ठसे मोरपिच्छांपरी[7] साक्षि चाले, ।
सहस्राक्ष तैंपासुनी इंद्र जाला,
दिल्हे अंड ऐरावताचे तयाला. ॥ ५६ ॥

---

१ अहल्या-काव्यसं. २ विरंच्यादि-हस्तलि. ३ झाले-काव्यसं. ४ उःशाप-काव्यसं.
५ उस्यापिजे यानिदानें-हस्तलि., उश्शापिजे याविदानें-सर्वसं. ६ झाले-काव्यसं.
७ परी-हस्तलि.

( वसंततिलका )

वंदूनि गौतमऋषीप्रति देव गेले,
गुंफे तपोधन निघे, सुखि सर्व जाले.[1] ।
येके रथीं ऋषि रघूत्तम बंधु बैसे,
ब्रम्हा[2] मुकुंद जगवंदनमूर्ति तैसे. ॥ ५७ ॥

वाल्मीकिची[3] प्रगट[4] संस्कृत गोड वाचा,
सीतास्वयंवरकथा उलथा तयाचा, ।
सर्ग द्वितीय रघुराजचरित्र वर्णी
वित्पन्न विठ्ठल म्हणे परिसोतु[5] कर्णी.* ॥ ५८ ॥

इति श्रीजानकीस्वयंवर विठ्ठलदासकृतौ अहिल्याउद्धरणोनाम
द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

---

१ झाले–काव्यसं. २ ब्रम्हा मुकुंद शिव वर्णिति कीर्ति तैसे--अन्यपाठ–काव्यसं.
३ वाल्मीकिचे–हस्तलि. ४ प्रकट–काव्यसं. ५ परिसोत--काव्यसं. * असा उल्लेख
काव्यसं. प्रतींत नाहीं.

# सर्ग तिसरा

( शार्दूलविक्रीडित )

कांहीं ' श्रीहनुमंतनाटककथा ' कांहीं ' रघूवंशि ' ची
कांहीं आदिकविप्रमेयरचना[1], कांहीं गिरा देशिची, ।
पद्यें सार्थक पादपूर्ति नलगे नाहींत गौणाक्षरें.*
चैत्रींचे नवरात्र रामनवमीपर्यंत गा आदरें. ॥ १ ॥

( धोदकवृत्त )

भद्रवनांतुनि शीघ्र निघाले,
स्यंदन वायुगती[2] बहु चाले; ।
भाट अचाट पुढें गुण गाती,
अन्य ऋषी रथवेष्टित जाती. ॥ २ ॥

( वसंततिलका )

श्रृंगार हास्य करुणारस दिव्यमूर्ति
येके स्छळीं वसाति सम्यक सौक्षिपूर्ति,[3] ।
तैसे तिघेजण रथावरि सानुरागें
सेनासमूह परिवेष्टित जाय मागें. ॥ ३ ॥

शोभायमान रथ सुंदर राघवाचा,
वर्णूं सके[4] चतुर कोण उदारवाचा ? ।

१ रचना–काव्यसं. * अल्पाक्षरें–सर्वसं. २ वाजवर्ते–हस्तलि. ३ पादपूर्ती–काव्यसं. ४ शके–काव्यसं.

वेगासि, कुंठित करी मळयानिळातें[1],
गाती पुढें सुरस[2] गायक मंगळातें. ॥ ४ ॥

( भुजंगप्रयात )

पुढें देखिली[3] जान्हवी श्रांतें[4] रामें,
जगज्जीवनें भर्गचित्ताभिरामें, ।
असा प्रश्न केला तदा कौशिकासीं[5],
निरोपी कथा तो रमानायकासी[5]. ॥ ५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

रामा ! पूर्वज जो तुझा सगर तो सूर्यांशिचा[6] बोलिजे,
त्यातें साठिसहस्र आत्मज, तिहीं यागाश्वमेधा किजे; ।
घोडा पृथ्विस[7] सोडिला भुजबळें गोत्रापती जिंकिले
पाताळा हय नें[8] शतक्रतु तया शोधावया चालिले. ॥६॥

आले बिंदुसरोवरा सगर तैं[9] घोडा तयां नादिसे,
केलें विघ्न मखाप्रती शतमखें, जाले [10]तुरंगें पिसे; ।
होतें बंधन त्या हयासि कपिलाचार्याचिये पृष्टिसी[11],
तेथें[12] जाउनी वारुसी लपविला नेणोचि तो तापसी. ॥७॥

---

१ मलयानिलातें--काव्यसं. २ सुरस मंगलगायनातें--काव्यसं. ३ देखिला--काव्यसं. ४ जान्हवीस्रोत--काव्यसं. ५ तें--हस्तालि. ६ हा शब्द हस्तलिखित प्रतींत गळला आहे. ७ पृथ्विसि--काव्यसं. ८ नेत शक्रहि--काव्यसं. ९ ते--हस्तालि. १० तुरंगीं--काव्यसं. ११ पृष्टिसी--हस्तालि. १२ राजे शोधिति दुर्गमें गिरिवनें त्यांच्या नये दृष्टिसी--हस्तालि.

( सवाई )

खाणितलें सगरीं धरणीतळ ‘ सागर ’ नाम तयांहुनि जालें.
धुंडित धुंडित ते विवरांतुनं[1] येति सर्वे दळ वेष्टित चाले. ।
श्यामलकर्ण तुरंगम देखति[3] श्रीकपिलाचार्य[4] समाधिसि[5] सांधी,
चोर असें मनिं भावुनि[6] त्यावरि ये[7]कसरें पडले अपराधी. ॥ ८ ॥

( भुजंगप्रयात )

असे[8] भंग केला समाधीस तेंहीं[9],
तयां शापिलें ‘ रे जळा याच देहीं ’ ।
अकस्मात नेत्रानळें दग्ध जाले[10],
पुढें त्यासि उश्याप[11] कांहीं न चाले[12]. ॥ ९ ॥

( स्रग्धरा )

कोण्ही वार्ता न सांगे सगरपति करीं नित्य चिंता सुतांची,
त्याचा नातू प्रतापी +समदश म्हणिजे तो करी शुद्धि त्याची; ।
धुंडाळी देश दुर्गें नगरें[13] उपवनें धुंडितां श्रांत झाला,
द्वीपीं खंडीं न देखे नकळत विवरद्वारें[14]मार्गीं रिघालो[15]. ॥१०॥

---

१ विवरेंकुग–हस्तलि २ आलें–हस्तलि. ३ देखुनि–काव्यसं. ४ कपिलाचार्य–हस्तलि. ५ समाधि समाधी–हस्तलि. ६ भाउनि–हस्तलि. ७ एकसरें–काव्यसं. ८ असो–काव्यसं. ९ तींहीं–काव्यसं. १० झाले–काव्यसं. ११ उःशाप–काव्यसं. १२ बोले–काव्यसं. + सुमवस–हस्तलि. १३ नि गड–हस्तलि. १४ विवरद्वार-मार्गें–हस्तलि. १५ निघाला–हस्तलि.

पाताळीं [1]प्रविशे मुनींद्र कपिलाचार्या पुढें देखिला,
पाहे पूर्वज त्यासमोरें[2] जळति, तो भाव त्या पूसिला; ।
तेणें अर्थ निरूपिला, मग तया वंदोनि[3] नानापरी,
उद्यापी सगरासि, नम्र विनती बद्धांजुळीनें[4] करी. ॥११॥

'माझे पूर्वज उद्धरीं, त्रिभुवनीं सत्कीर्ति नांदो[5] बरी,
शापानुग्रहिं[6] तूं समर्थ, करुणा वर्तो[7] तुझे अंतरीं ।
संतोषोनि मुनी म्हणे समदर्शा,[8] ' श्रीतीर्थचूडामणी,
आणी, न्हाणि तयां, महेशमुगुटीं मागोनि गंगोवणी.[9]' ॥१२॥

त्यानंतरें [10]समदर्शें तप उग्र केलें
त्याचें कळेवर पुरश्चरणांत गेलें. ।
वंशीं पुढें सुत भगीरथ धन्य जाला,
भागीरथीजळ शिवें दिधलें तयाला. ॥ १३ ॥

( शार्दूलविक्रीडित )

[11]ब्रम्ह्यानें [12]भरलें [13]कुमंडल जळें ब्रह्मांडसारोदकें,
दानांतीं *बळिच्या पदाब्ज बटुचें प्रक्षाळिलें बोधकें, ।
ती धारा धरिली शिवें, मग दिली[14] श्रीजान्हवी चालिली,
केले पूर्वज मुक्त, देवसरिता पूर्वांबुधीं लाविली. ॥ १४ ॥

---

१ करुनी प्रवेश--काव्यसं. २ त्यापुढें जळति तो भावें तया पुसिला--हस्तलि. ३ वंदूनि--काव्यसं. ४ बद्धांजलीनें--काव्यसं. ५ नांदे करी--हस्तलि. ६ शापानुग्रह--हस्तलि. ७ तुझ्या--काव्यसं. ८ सुमधस--हस्तलि. ९ गंगावनि--हस्तलि. १० सुमधसें--हस्तलि. ११ ब्रम्हेनें--हस्तलि. १२ भरिला--काव्यसं. १३ कमंडलु-काव्यसं. *बळिचें--हस्तलि. १४ दिल्ही--हस्तलि.

( वसंततिलका )

आख्यान[1] कौशिककथा परिपूर्ण जाली,[2]
साष्टांग राघव तितें प्रणिपात घाली. ।
आले तटासि तंव नीर गभीर वाहे,
श्रीराम नावकरियाप्रति शीघ्र बाहे. ॥ १५ ॥

( भुजंगप्रयात )

'अरे गुह्यका! नाविका[3]! नाव आणी,
त्वरें ऊतरीं जान्हवी खोल पाणी, ।
मुहूर्तीं[4] महा कार्य आहे प्रयाणीं,'
वदे कर्णधारा सुधातुल्य वाणी. ॥ १६ ॥

( मालिनी )

'पदकमळरजानें मुक्त पाशाणदेही[5]
ऋषिमहिषि[6] अहल्या पावली साक्षि[7] तेंही, ।
उपल युवति होती वस्ति विंध्याचळाची,
रघुपति! पुरवीली वासना तापसांची. ॥ १७ ॥

रघुपति! करवेना स्त्री दुजी दुर्बळातें,
अणुभरि[8] तरि नाहीं भेद काष्टोपळांतें[9]. ।

१ हे जाण--काव्यसं. २ झाली काव्यसं. ३ नावका--हस्तलि. ४ मुहूर्तें--हस्तलि. ५ पाषाणदेही--काव्यसं. ६ ऋषिमहिषी--काव्यसं. ७ साक्ष--काव्यसं. ८ अनुभरि--हस्तलि. ९ काष्ठोपळातें--हस्तलि.

धुविनें[1] चरणरेणू, तीर्थ घेईन जेव्हां,
बसविन मग नौकेमाजि देवासि तेव्हां.' ॥१८॥

( वसंततिलका )

यानंतरें उतरिजे परपार[2] रामें,
केलें स्वकर्म सवनादिक पूर्णकामें, ।
आरूढले तिघ[3] रथावरि, सैन्य मागें.
आले समीप मिथिळे पवनानुवेगें.[4] ॥ १९ ॥

जैसा रवीउदय पाणितळीं न झांके,
तैसें सुवर्णमणितेज दिशांस[5] फांके. ।
शृंगारिलें स्वपुटभेदन[6] भूमिपाळें,
येक्यां[7] क्षणावरि विराजति सप्त ताळें. ॥२०॥

' '[8]मी काय वर्णन करूं पुटभेदनासी ?
तें देखिल्या सकळ दुर्घट भेद नासी. ।
[9]जीवंत मुक्त सुकृती जन पौरवासी
ज्ञानी अभेद भजनी, गुण गौरवासी. ॥ २१ ॥
बाजार हाट-वटिया मढिलीं दुकानें,
वीथी चतुष्पथ विचित्र विराजमानें. ।

---

१ धुइन–हस्तलि. २ परिपाळि–हस्तलि. ३ तिघे–हस्तलि. ४ पवनानुरागें–हस्तलि. ५ दिशांत–काव्यसं. ६ स्वपुरभेदन–हस्तलि ७ एका–काव्यसं. ८ मी काय वर्णु–काव्यसं. ९ ज्ञानी अभेद भजनीं गुण गौरवासी । तेथे कदापि न कधीं जन पापवासी–काव्यसं.

देवालयादि मठ मंडप, पट्टशाळा,
श्रीगोपुरावरि महा उपचारशीळा. ॥२२॥

दिव्य स्थळें[2] भुमि[3] समार्जित कुंकुमानें,
देवालयें हरि[4]कथा बहु दीपदानें, ।
वृंदावनें तुळसिचीं बहु दीपमाळा
श्रीतोरणादि मखरें गुढिया विशाळा. ॥ २३ ॥

( शार्दूलविक्रीडित )

ठाईं ठाईं पुराणें श्रवण हरिकथा, नृत्य वाद्यें स्फुराणें,
वाचे श्रीराम गाणें जन उदिम करी नीतिशास्त्रप्रमाणें ।
नाहीं देशीं रहाणें, भय धरुनि पळे पाप लाजीरवाणें,
रामश्रीकृष्णनाणें जनपद मिरवी, मुक्त जीवंत जाणें. ॥ २४ ॥

विश्वामित्रसमागमें द्विजमुनी आले, वनीं राहिले,
दूतीं जाणविले वृतांत जनका, सामंत पाचारिले, ।
सामोरा नृप जाय त्या उपवना वेष्टीत सेना सर्वे,
वाद्यें वाजति सैन्यसिंधु सरिसा श्रृंगारिला वैभवें. ॥ २५ ॥

विश्वामित्र मुनी तपोधन महा जो सृष्टिकर्ता दुजा,
भेटीं त्या द्विज चालिले नगरिंचे हर्षे स्फुरेती भुजा; ।

---

१ विलसे विशाळा-काव्यसं. २ स्थळें-काव्यसं. ३ भुवि-हस्तलि. ४ करि-काव्यसं. ५ नीतिशास्त्रप्रमाणें-काव्यसं. ६ मुक्ति-काव्यसं. ७ उयाणें-काव्यसं. ८ उपवनीं-काव्यसं. ९ भेटाया-काव्यसं.

जाले शीघ्रगती पुरौकस पुढें हो लोचना पारणें,
वाजीवारण वाहनादि शिबिका बैसावयाकारणें. ॥२६॥

संन्यासी भट वैद्य ज्योतिपि[2] महा मौनी तडीतापडी,
श्रोत्री[3] पंडित सिद्ध साधक मुनी तीर्थाटणी कापडी, ।
श्रौतस्मार्तक साधु याज्ञिक[4] भले शास्त्रज्ञ जे बोलिले,
मंत्रोपासक[5] नाद्यगायक पुढें भेटावया चालिले. ॥ २७ ॥

( वसंततिलका )

सेटे[6] महाजन सराफ धनाढ्य चाटे,
वाणी वणिज[7] उदमी पुरपंथ दाटे, ।
धूळीरजें[8] सकळ धूसर विश्व भासे,
दूरूनि देखुनि मुनी जनकासि हांसे. ॥ २८ ॥

सहस्रावधी त्यापुढें वेत्रपाणी,
प्रतापोत्कटा वर्णिती भाट वाणी, ।
विदेही नमस्कार साष्टांग घाली,
पदस्पर्शनें चित्कळा येकि[9] जाली. ॥ २९ ॥

जगन्मित्र 'कल्याण कल्याण' बोले,
क्षमालिंगनें येक होऊनि ठेले, ।

---

१ झाले-काव्यसं. २ ज्योतिष-हस्तलि. ३ श्रौती-हस्तलि. ४ याज्ञिक-हस्तलि. ५ मंत्रोपासक-काव्यसं. ६ शेटे-काव्यसं. ७ वणज-हस्तलि. ८ धूळीरसें-काव्यसं. ९ एकि-काव्यसं.

नमस्कारिती जे सर्वें भूप आले,
दिशा दाटल्या, [1]भार भूगोळ हाले. ॥ ३० ॥

( शार्दूलविक्रीडित )

पुण्यश्लोक जनार्दनादि नळ जो धर्म प्रभू द्वापरीं,
त्रेतांतीं जनक क्षमापति असा नाहीं त्रिखंडांतरीं; ।
देहीं देह विदेह, वामनयना पाद स्तनें मर्दिती
श्रीगंधें, पद येकें[2] वर्न्हिहतें[3] तया पृथ्वीपती अर्जिती. ॥३१॥

( शिखारिणी )

समारंभें घोरें मिरवत निघाले वर्न्हिहुनीं,
[4]सर्वें राजा चाले इतर नृपती दंड धरुनी. ।
नमस्कारा येती नगरजनपत्न्या द्विज मुनी,
पुढें नाना वाद्यें जनपद निवारीत[5] नमुनी. ॥३२॥

सभास्थाना आले, मणिमय दिल्हे[6] विष्टर तया
तदा विश्वामित्रापुरत वसतां[7] बंधु उभयां, ।
दिसे राया दृष्टीं ' रघुवर परब्रह्म नटलें, '
नृपालोकां भासे सदन मदनाचें प्रगटलें. ॥३३॥

---

१ भाग--काव्यसं. २ एक--काव्यसं. ३ चिन्हित--काव्यसं. ४ तदीं त्यांच्या संगे--काव्यसं., तदीं तया संगे--सर्वसं. ५ निवारेत--हस्तलि. ६ दिले--काव्यसं. ७ वसता--काव्यसं.

( स्वागता )

श्यामसुंदर मनोहर भासे,
कासिलें कनक अंबर कासे, ।
मस्तकीं मुगुट, कौस्तुभ वक्षीं,
वांकि तोडर पदीं नृप लक्षी. ॥ ३४ ॥

( रथोद्धता )

क्षत्रियासि नरनाथ दीसती,
सज्जनांसि अवतार भासती, ।
कौशिकाप्रति पुसे धरापती,
'कोण हे उभय बंधु शोभती ?' ॥ ३५ ॥

( वसंततिलका )

तदुपरि मुनि सांगे, 'राज्य यांचें अयोध्यें,
कुमर दशरथाचे, वीर हे चंड योद्धे, ।
दिनकरकुळ यांचें, शिष्य होती वसिष्ठा,
करणि रघुपतीची आइकें, श्रीवरिष्ठा ! ॥ ३६ ॥

( स्वागता )

रक्षिला मख रघूत्तमें बरा,
ताटिका उडविली दिगंतरा, ।

---

१ वांकि नेपुर पदीं ननु लक्षी--हस्तलि.

मूळपत्र तुमचें विलोकिलें,
म्या तदा शुभ मुहूर्त साधिलें. ॥ ३७ ॥

चालतां विपिन दार्ट[1] लागलें,
ते स्छळीं नवल वर्तलें भलें, ।
शापिलें[2] निजकलत्र गौतमें,
तारिलें[3] पदरजें रघूत्तमें. ॥ ३८ ॥

( शार्दूलविक्रीडित )

घेतां नाम समस्त काम पुरवी श्रीराम तो हा असे,
आत्माराम मनोभिरामें[4] भगवान् सर्वांतरीं जो वसे. ।
राया ! तारक ब्रह्म चिद्घन तुतें भेटावया आणिला,
विष्णूचा अवतार सप्तम तुवां भाग्योदयें देखिला.॥३९॥

याचा बंधु सुमित्र, यासम सखा शेषावतारें[5] स्वयें,
दोघे वीर पराक्रमी त्रिभुवनामध्यें बळी निश्चयें, ।
लीलाविग्रहि, वेदनेतिमहिमा[6] प्रत्यक्ष तो हा स्वभू.[7]
ऐसें उत्तर आइकोनि हृदयीं संतोषला भूप्रभू. ॥ ४० ॥

( स्वागता )

रामरूप नयनीं विसांवलें,[10]
अंतरीं बहुत[9] हो ! ठसांवलें.[8] ।

---

१ एक–हस्तलि. २ शापिली–हस्तलि. ३ तारिली–हस्तलि. ४ गुणाभिराम–काव्यसं. ५ शेषावतारी–काव्यसं. ६ वेदनीतिमहिमा–काव्यसं. ७ तो–काव्यसं. ८ ठसावलें–हस्तलि. ९ सुख बहु–हस्तलि. १० विसावलें–हस्तलि.

तो म्हणे[1] जनक कार्य[2] आपणा,
' व्यर्थ मैं[3]यां धनुर्ष[4] योजिलें पणा. ॥ ४१ ॥

जानकीसि वर हा निका असे,
यासम त्रिभुवनीं दुजा नसे. ।
भागधेय[5] उदयो करी जरी,
मैथिली[6] तरि रघूत्तमा वरी. ' ॥ ४२ ॥

( शालिनी )

' राजे आले, आइका सावधानें, '
वक्ता सांगे भूपदेशाभिधानें, ।
वस्त्रें भिन्नें राजाचिन्हें पवित्रें,
नाना वर्णों आतपत्रें विचित्रें. ॥ ४३ ॥

( शार्दूलविक्रीडित )

छत्रें वर्तुळ रत्नदंड चवरें चंद्रोपमा साजतीं,
शार्दूळाकृति सिंह मत्स्य वदनें भारापुढें चालती, ।
झांके अंबर मेघडंबर तसें मार्तंडपत्रध्वजा,
वाद्यें वाजति, भाट गाति विरुदें, पाहे[7]ति पौर प्रजा. ॥४४॥

पृथ्वी[8]चे नरनाथ दिग्विजयि तें आले बळें वैभवें,
ते रायें नृप आणिले चमु[9]पुढें जाऊनियां[10] गौरवें, ।

१ वदे--काव्यसं. २ भूप--काव्यसं. ३ कां--हस्तालि. ४ धनुश--हस्तलि. ५ भाग्यध्येय-हस्तलि. ६ मैथुळी--हस्तलि. ७ पाहाति--काव्यसं. ८ पृथ्वीचे नरनाथ दिग्गज पाहा आले बळें वैभवें-हस्तलि. ९ सहचमु--काव्यसं. १० जावोनियां--काव्यसं.

आले दैत्यकुळादि राक्षस महा तेणें सभा ढेंसली[1],
स्वर्गी इंद्रसभेसि तुल्य दुसरी धात्रीवरी भासेली[2]. ॥ ४५ ॥

स्तंभीं पूतळिया करीं दिवटिया रम्याननना सुप्रिया,
हातीं आरतिया महा करविया हे चित्रलेखाक्रिया;।
मुक्तें चांदविया मृदासन तया मुक्तांचिया जाळिया,
रत्नें[3] त्यांवरि शोभति चवरियां खालीं मृदू गादिया. ॥ ४६ ॥

ज्यां ज्यां योग्य जसी स्थळें[4] तसितसीं त्या त्या दिल्हीं आसनें,
नाना कांचनरत्नसंसदिपुढें होती महागायनें;।
विश्वामित्र मुनीश्वरादि जनकें पृथ्वीपती पूजिले,
वाद्यें वाजति भाट गाति बिरुदें, सत्कार[5] त्या योजिले. ॥ ४७ ॥

( भुजंगप्रयात )

विमानें नभीं दाटलीं देवतांचीं[6],
महीमंडळीं वाहनें भूभुजांचीं[7],।
प्रसंगीं भुपांचीं निरोपीन नामें,
गुणज्ञीं[8] सभे आइकावी[9] ललामें. ॥ ४८ ॥

---

१ दाटली--काव्यसं. २ शोभली--काव्यसं. ३ रत्नें चाउरिया कळा कुसरिया लोडें मुडे गादिया-हस्तलि. ४ स्थळें--काव्यसं. ५ संस्कार-हस्तालि. ६ दैवतांचीं-काव्यसं. ७ नृपांचे-हस्तलि. ८ गुणाग्नी हस्तालि. ९ आयकावी--काव्यसं.

( उपजाति ]

वाग्देवते ! हरिकथा[1]नटि होय साचे,
+तू मूर्तिमंत रसनेवरि सज्ज[2] नाचे, ।
सीतास्वयंवरकथारस गोड लागे,
सर्ग तृतीय कवि विठ्ठलदास सांगे. ॥४९॥

*इति श्रीजानकीस्वयंवर महाराष्ट्रकाव्यकविकृतौ विठ्ठलदास-
कृतौ श्रीराममिथुळाप्रवेशो नाम तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

---

१ हरिकथे नटि--काव्यसं. + एकोनि सज्जनमनें अति हंस नाचे– अन्यपाठ–
काव्यसं. २ सज्जनांचे--काव्यसं. * असा उल्लेख काव्यसं. प्रतींत नाहीं.

# सर्ग चवथा

( मालिनी )

जनक मनिं विचारी चित्त कोठें गमेना,
कठिण धनुष वज्रातुल्य रामा नमेना; ।
भृगुपतिपणें चापा तो कदा लंघवेना,
म्हणउनि धरि राजा मौन्यमुद्रा, वदेना. ॥ १ ॥

अगुप नृप मिळाले, सार्वभौमाभिमानी,
त्रिदश दनुज आले लंकनाथाभिमानी, ।
'सदासिं धनुष आणा' प्रेरिले मंत्रियांतें;
मग सकळ निघाले चाप आणावयातें. ॥ २ ॥

( शार्दूलविक्रीडित )

दिग्मातंग जसे मदोन्मत तसे धूरेसि आटोपिले,
चौदासें मत बैल रानखुळगे सोळाशतें झुंपिलें, ।
जेठी लोटिति सा सहस्र धनुषा, सार्यासिं तें आणिलें,
दिक्चापासमतुल्य भूभुजसभे रंगांगणीं टाकिलें. ॥३॥

केली रंगसुरंग भूमि जनकें, संमार्जिली कुंकुमें,
गोपद्मावरि पंचरंग मिरवे श्रीस्वस्तिकें कौसुमें; ।

१ गुण–काव्यसं. २ मौनमुद्रा–काव्यसं. ३ आटोपिती–काव्यसं. ४ चौदाशें–काव्यसं. ५ झुंपिती काव्यसं. ६ लोटित–हस्तलि. ७ साहा–हस्तलि. ८ येतावता–हस्तलि. ९ गुणीं–हस्तलि. १० तरंग–हस्तलि. ११ कौसुमें–हस्तलि.

भूपूजाविधि वेदपूर्वक किजे अर्चूनियां भूभुजें,
तेथें कार्मुक ठेविलें मग म्हणें उद्वाहु वक्त्रांबुजें. ॥४॥

( मालिनी )

प्रगट जनक बोले, ' भूपती ! आइका हो !
विनवित सकळांतें मी उभारूनि बाहो, ।
भृगुपतिधनुषातें[1] ज्या चढे त्यासि शाली,
त्रिभुवनजयलक्ष्मी मैथिली[2] माळ घाली. ' ॥५॥

( शिखरिणी )

अजासर्पन्यायें नृप धनुष देखोनि विटले,
स्फुरद्रोमा आंगीं पुलकित गळद्बिंदु सुटले, ।
मृतच्छाया आली, अचुक भय पोटांत भरलें,
शरिरें प्रेतांचीं धरुनि म्हणती आयु सरलें[3]. ॥६॥

प्रधानीं[4] सर्वांतें नमुनि मग केली विनवणी,
' उठाना कां स्वामी ! धनुष उचलाया दृढपणीं, ।
प्रतापाचे मेरू बळकट महावीरें[5] धरणीं.
तुम्हीं आहां, पाहा सचकित न राहा नृपगणीं. ' ॥७॥

---

१ गुण चापा—काव्यसं. २ जानकी—काव्यसं. ३ पुरलें—हस्तलि, सर्वसं.
४ प्रधानें—काव्यसं. ५ महावीरीं—काव्यसं.

( शार्दूलविक्रीडित )

वृक्षाच्या लांब शाखा करचरण तसे, पर्वतातुल्य माथा,
दाढा तोंडें कराळें, सचकित नृपती देखती लक्ष नाथा, ।
मोठा आजानुबाहो रजनिचरपती बोलता काय झाला[1],
साकारें विराजे नवजलदतनू दर्प सर्वा नृपाला. ॥८॥

( वसंततिलका

' दुर्गा गणेश गुह नंदि *शिवासमेला
कैलास ज्या भुजबळें श्लथरूप केला, ।
तो मी धरीन पडतां नभ बाहुबाहें
कोदंड खंडिल[2] असा नृप कोण आहे ? ॥ ९ ॥

( शार्दूलविक्रीडित )

ज्यां नाहीं नृप जिंतिलों[3] पृथिविचा[4] तो कोण आला असे ?
माझा दर्प सुरेश्वरा, भय बहू शेषासि माझे असे[5]. ।
भूची घालिन मी घडी, उतरडी पाडीन मी स्वर्गिंच्या,
पाताळें उकलूनि बांधिन चिऱ्या[6] लंकेचिया दुर्गिच्या. ॥१०॥

विद्या, सत्कुळ, भाग्य, किर्ति, सकळी संपन्न मी भूतळीं,
दंडें[7] दंडिन यक्षणीं निजबळें कोदंड भूमंडळीं;[8] ।

1 झाला--काव्यसं. * शिव--काव्यसं. २ दंडिल--हस्तलि. ३ जिंकिला--काव्यसं.
४ रणभुमी--काव्यसं. ५ नसे--हस्तलि. ६ चऱ्या--काव्यसं. ७ दंडीं--काव्यसं.
८ खंडिन--काव्यसं. ९ भुजबळें--काव्यसं.

पाहा मत्पुरुषार्थ ' गर्जुनि उभा राहोनि तेथें करी,
तों सीता उपरीवरी सहसख्या[1] पाहे समा सुंदरी.॥११॥

( मालिनी )

उपरिवरि मृगाक्षी भूभुजातें निरीक्षी,
कर धरुनि सखीचा कोण कैसा परीक्षी; ।
' सहचरि ! मज दावी कीर्तिविख्यात राजे,
प्रगट गुण निरूपीं कोण कैसा विराजे. ' ॥१२॥

( शार्दूलविक्रीडित )

द्वीपें जंबु[2] पलाश शाल्मलि कुश क्रौंचादिचे भूपती,
शाकश्रृंगलिंचे स्वयंवरसभे आले महा दिक्पती; ।
खंडें चारण भस्म सिद्ध[3] चवथें नागादिकें वर्णिलीं,
गंधर्वेंद्र सुवर्ण ताम्र भरत श्रोत्रीं[4] समाकर्णिलीं. ॥१३॥

भूर्भुस्वर्मह[5] पैं जनस्तप तथा सत्यादि मेरूवरी,
पाताळें अतळादिकें वितळ मी वर्णीतसें वैखरी,
त्याखालें वितळादि पतळ महा, तेथें विराजे बळी
पुण्यश्लोक, तळातळीं भुवितळीं[6] पाताळ समावळी. ॥१४॥

सप्तौ इक्षु सुरा दधी पय मधु[8] क्षारांबुधी सप्तमा,
अष्टौ दिक्पति, सिद्ध, चारण, महा हाहा हुहू चंद्रमा, ।

---

१ समसख्या-हस्तलि. २ पुष्कर जंबु-काव्यसं; सवेसं. ३ सधि-हस्तलि.
४ श्रेणी-काव्यसं. ५ भूर्भुः स्वर्गजनस्तपोमह-काव्यसं. ६ भुमितळी-काव्यसं.
७ युक्ष-हस्तलि. ८ मधू-काव्यसं.

सद्विद्याधर यक्ष गुह्यक रवी पाहावया पातले
गंधर्वा[1]प्सरकिन्नरेंद्र गगनीं यानीं सुखें बैसले. ॥१५॥

राजे अंग कलिंग वंग मगध द्रावीड कर्नाटकी,
गौडश्चोल निषाद बर्बर महा काम्बोज बंगालकी, ।
काश्मीरादि विदर्भ गुर्जर तथा सौराष्ट्र तैलंगणी
कालिंगा शबरादि नैषध पुढें पाहे प्रभू कोंकणी. ॥१६॥

उज्जन्यादि पुलिंद कुंतल महाकौशल्य मल्यांकिचे,
राजे केरळ चोरळिष्टजई[2]चे टंकाण कैरातिचे ।
काशीराज कलिंद कैकय महाना[3]टादि नाटप्रभु
सिंहा[4]लादिक चैद्य जांगळ कुरू गांधार आंध्र स्वभू. ॥१७॥

पाहे तांम्रमुखादि शाम हबशी राजे फिरंगांणिचे,
आले कैकट[6] कच्छ आँरब रुमी राजे खुरासानिचे,
आले म्लेंच्छ पठाण कौलिक[8] महाराजे कनोजे भले,
आले डोंब गरीब भिल्ल चतुरे राजे सभे शोभले. ॥१८॥

आले लाट विराट मालव महाराष्ट्र प्रभू देशिंचे,
[10]गौडी काउर मारवाड नृपती नेपाळ पंचाळिंचे, ।
श्रीताम्रध्वज नीळकेतु मिनले, शोभा कसी ते दिसे ?
पाहे रावण राक्षसाधिप उभा मेरू जसा लालसें. ॥ १९ ॥

---

१ यानासनीं–हस्तलि. २ चोरली वृजइचे--काव्यसं. ३ महानव्यादि--काव्यसं. ४ सिंह्यल--हस्तलि. ५ पाहे--काव्यसं. ६ कैकय–हस्तलि. ७ ते अरुबह--काव्यसं. ८ पाहे--काव्यसं. ९ कैकड--काव्यसं, सर्वसं. १० गोंडी--सर्वसं. ११ आरीज्य आलें नसें–हस्तलि.

आले भूभुज सार्वभौम तितुके ज्याच्या भयें कांपतीं,
स्वर्गी निर्जर शक्रमुख्य अवघे ज्याच्या गृहीं[1] राबतीं,[2]
चौदा चौकडिया युगादिगण[3]ना छपन्न हे संपदा,
दर्पें कांपति ज्याचिया त्रिभुवनीं गर्वाभिमानी सदा. ॥२०॥

बंदीं निर्जर घातले, भुजबळें कैलास आंदोळिला,
ब्रम्ह्याचा पण[4]तू चहूं[5] श्रुतिवरी भाष्यार्थ जो बोलिला,
केला देशधडी कुबेर, हरिली लंका समुद्रोदरीं,
दाहा मौळि विसा भुजा, सखि म्हणे सीतेसि नम्रोत्तरीं. ॥२१॥

' अष्टौ भैरव कोतवाल सटवी बाळा[6]सि रक्षा करी,
चामुंडा परिचारिका अनुकुला स्त्रीरत्न[7] मंदोदरी,[8]
वायूनें[9] वरुणें समार्जन किजे, पंचांग सांगे विधी,
खंडेरायें[10] सभेसि दर्पण करीं, राबेति सिद्धी निधी. ॥२२॥

चंद्र च्छत्र धरी नव ग्रह उभे द्वाराचिया पायरीं[11]
सूर्य द्वारपदीं, वसंत सुमनें घाली पलंगावरी,
माळी वासव, पाक पावक करी, हेरंब राखे गुरें,
भांडारी अळकेश, यापरि किजे साम्राज्य लंकेश्वरें. ॥२३॥

रत्नस्तंभ सुवर्णभूमि नगरीं पाषाण चिंतामणी,
क्रीडा कल्पतरू अशोकविपिनीं दिव्यांगना नाचणीं, ।

१ पाहे--काव्यसं. २ घरीं--काव्यसं. ३ युगद्विगणना--काव्यसं. ४ पण तो--हस्तलि.
५ बहु--हस्तलि. ६ बाळाचि--काव्यसं. ७ श्रीरत्न--हस्तलि. ८ मंदोदरी--काव्यसं--
९ वायेनें--हस्तलि. १० खंडेराव--सर्वसं. ११ पाइरीं--काव्यसं.

दुर्गांचीं शिखरें जसी फणिफणा, द्वारें दिशांचीं मुखें,
सिंधूचें कटिसूत्र वेष्टित पुरीं लंकेश नांदे सुखें. ॥ २४ ॥

( वसंततिलका )

तो हा दशानन सभोसि[1] उभा विराजे,
हे सार्वभौम मशकासम त्यासि गाजे; '
देखोनियां धरणिजा भयभीत जाली[2],
वर्णीतसे सखि पुढें रविवंशशाली. ॥ २५ ॥

( शिखरिणी )

' अयोध्येचा राजा दशरथ महाख्याति जगतीं,
गभस्तीचे वंशीं नृपसुत निरीक्षीं रघुपती
असे केला[3] मार्गीं[3] मुनियुवतिउद्धार चरणें.
पुढें विश्वामित्राऋषिजवळि तो तां[4] वळखणें. ॥ २६ ॥

( स्रग्धरा )

माथां कोटीर साजें जडित फणिमणीतेज दिक्प्रांत माजे,
कर्णीं श्रीकुंडलीं[5] जे, मणि लखलखती ज्यासि चंद्रार्क लाजे; ।
नाना रत्नीं विराजे पदक हृदयिंचें. रावणालागि डाजे,
ब्रीदांचा घोष गाजे निबिड, पदयुगीं तोडरीं बद्ध राजे. ॥२७॥

---

१ सभेंत-काव्यसं. २ झाली-काव्यसं. ३ मार्गीं केला-काव्यसं. ४ त्वां-काव्यसं. ५ श्रीकुंडलें-हस्तलि.

( वसंततिलका )

भाळीं त्रिपुंड्र करवर्तुळ दंड दोन्ही,
सामुद्रिकीं सकळलक्षणयुक्त चिन्हीं, ।
आपादमस्तक रुळे नव वैजयंती,
कंठीं नवीन तुळसी स्रजे भाग्यवंती. ॥२८॥

( भुजंगप्रयात )

क्वणत्किंकिणी क्षुद्रघंटा नितंबीं,
महारत्नकांची निनादे विलंबी, ।
करीं चाप नाराच तो देख दृष्टीं,
शरीं अक्षयीं बांधला तूण पृष्टीं. ॥२९॥

[ स्वागता ]

इंद्रनीळमणि कीळ सांवळा,
कांति कोटिकुसुमेसु पूतळा, ।
कंकणें जडितयुक्त हस्तकीं,
रत्नपुंज अवतंस मस्तकीं. ॥ ३० ॥

निर्धनासि धन जेवि सांपडे,
जानकीस नयनीं तसा पडे, ।
अंतरीं मदनमूर्ति रंगली,
बाह्य दृष्टिस समाधि लागली. ॥ ३१ ॥

---

१ सामुद्रिकें–हस्तलि २ भग- हस्तलि. ३ पृष्टीं–हस्तलि. ४ कुसुमेश–काव्यसं.

देखती[1] विकळरूप धारणा,
घालिती सहचरी समीरणा, ।
बाह्य चंचल पदार्थ वर्जिले,
नेत्रपद्म उदकें समार्जिलें. ॥३२॥

( द्रुतविलंबित )

उपरि सावध होऊनि जानकी,
मग म्हण, ' परिसें विजये[2] ! सखी ।
रघुविराविण कांत मना नये,
त्वरित भेटवि तों[3] मजला सये ! ॥ ३३ ॥

कठिण कासवपृष्ठ[4] तसें धनू,
मदनमूर्ति रघूत्तम हा नेनू[5] ।
विजय होइल ? काय कळे मला,
अहह ! पित्या ! पण दारुण घातला. ॥ ३४ ॥

( सवाई )

राम दिसे सुकुमार निमासुर सुंदर नागर मन्मथगाभा,
हस्त सुकोमळ अंबुजशामळ[6] चांचरकुंतळ षट्पदशोभा, ।
वज्रशरासन त्यजनि शासन कवि घडे रघुनंदनहातें ?
रावण हें उचलील कदाचित तैं तनु टाकिन वाट पहातें.[7] ॥३५॥

---

१ देखतां-काव्यसं. २ विजये सुखदायकी--हस्तलि. ३ तु--हस्तलि. ४ पुष्टि-हस्तलि. ५ आननू-काव्यसं. ६ अंबुद-काव्यसं. ७ गाभा--हस्तलि, ओझा-सवसं.

(उपजाति)

येरीकडे रावण सिद्ध जाला,
कोदंड दंडें उचलावयाला. ।
अन्य प्रभू त्यासम कोण तोले ?
देखोनि सीता [1]मग काय बोले. ॥ ३६ ॥

(शार्दूलविक्रीडित)

'लंकेशा नुचलों शरासन' महीमातेसि सीता म्हणे,
अंबे ! मंगळमातरे ! सुखकरे ! तस्मै नमो ब्रह्मणे; ।
देवद्रोहक हा छळी क्षितितळीं, पाडीं उताणा वरी,
चक्रन्यायजवें उरावरि [2]भ्रमो कोदंड वज्रापरी.' ॥ ३७ ॥

विघ्नेशा ! करिं विघ्न चाप नुचळो लंकेश्वरा दुर्मदा,
भूतेशा ! न[3]वसीं त्रियंबक तुझें दुष्टा छळो सर्वदा; ।
चामुंडा नवकोटि येउनि बळें बैसोत बाणासनीं,
* देवी छप्पन कोटि भार धनुषीं घालोत कात्यायनी. ॥ ३८ ॥

शेषा ! येउनि भार घाल धनुषीं भूभार घेवोनियां,
इंद्रा ! निर्जरकुंजरासहित तूं आकर्षि येवोनियां; ।
लंकेशा छळि सत्यलोकरमणा ! ये आदिनारायणा !
कूर्मा ! तूं निज कूर्मचक्र फिरवीं त्रैलोक्यनारायणा ! ॥ ३९ ॥

---

१ स्तव--हस्तलि. २ भ्रमो गरगरा--हस्तलि. ३ नुचलो--काव्यसं. ४ दव्या-हस्तलि. *सर्वे येउनि भार या धनुषि त्या घालोत कात्यायनी--अन्यपाठ--काव्यसं; सर्वेसं. अन्यपाठ.

भैरुंडा भुवनेश्वरी भगवती ऐंद्री उमा षोडशी,
श्री बगळा बगळामुखी व्र तिथी येकादशी द्वादशी, ।
तारा पंचदशी सरस्वति ! महा आरूढ हंसावरी
सावित्री शचि काळरात्रि ! धनुषीं बैसोत धन्वंतरी, ॥ ४० ॥

अष्टौ भैरव आठ कोटि गणना वेताळ भूतावळी,
भूत प्रेत पिशाच विभ्रतितनू झोटिंग मुंजे बळी, ।
कूष्माडादिक पूतना दृढबळी श्रीशाकिनी डाकिनी,
क्रूरा क्रूरतरा धरा धनू महामारी तुम्हीं या दिनीं. ॥ ४१ ॥

( मालिनी )

नवस परशुरामा ! हें तुझें चाप आहे
विसभुज उचलीता मी न वांचेन पाहें, ।
धनुष जड करावें होसि षष्टावतारी,
तुजविण जडजीवाकारणें कोण तारी ? ॥४२॥

नगरजन मिळाले चित्त पाहावया पें
अभिनव मग तेहीं देखिलें रावणातें; ।
घनसर कळकुंचा स्तंभ लंबायमानें,
गगनिं सुरवरांची स्तब्ध झालीं विमानें. ॥ ३४ ॥

---

१ विसभुजिं–काव्यसं. २ भुभुज सकळि तेथे पाहती खालमानें–काव्यसं.

( शार्दूलविक्रीडित )

लंकेचा नृप कास घालुनि पुढें चापाकडे चालिला,
भूधूळीं भुज मर्दिले, च[1]मकला मूर्धा बळें तोलिला. ।
देखे त्र्यंबकचाप, कांप सुटला साटोप आरंभिला,
दावी भाव स[2]रोष राव[2]ण क[2]री धैर्यें उभा राहिला. ॥ ४४ ॥

( इंद्रवज्रा )

तें इंद्रवज्रासमतुल्य भासे,
लंकेश भूधूळि भुजांसि घासे, ।
स्पर्शें [3]महीनें बळहीन केलें,
कोदंड तोली तंव धैर्य गेलें. ॥ ८५ ॥

देशावरीं संचित फार केलें,
तें तस्करीं द्रव्य हिरोनि नेलें, ।
जाला तसा न्याय दशाननातें,
लज्जा नृपांची धिर दे मनातें. ॥ ४६ ॥

( शार्दूलविक्रीडित )

वोढी चाप विसां भुजीं न गवसे, तो मांडखुटी बसे,
जानू टेकुनि भूमिसी भुजबळें तोलूनि पाहातसे; ।

---

१ भुजबळें-काव्यसं. २ सितावरास सकाळीं--काव्यसं. ३ सिताच्या--काव्यसं.

हालेना तिळमात्र, या उपरि तें कोदंड आलिंगिलें[1],
पोटीं धापे[2] न माय कांपे[3] सुटला, गुल्फावरी आणिलें. ॥४७॥

( स्रग्धरा )

झोंबीं[4] लोंबीं[5] प्रतापें ग्रेयुनि विसभुजा[6] आणिलें जानुदेशीं,
टेंका पृथ्वीला त्याचा[7] शिथिल डळमळी नावरे साक्षपेंसी, ।
* सर्वांगीं स्वेद दाटे, धनुष उलथलें, वायु त्या साह्य जाला,
त्याच्या झोंकें उताणा क्षितिवरि पडला नाद धात्रीं विझाला. ॥४८॥

( शार्दूलविक्रीडित )

मेरूचा खचला कडा तडकला, भूगोल ढांसाळला[8],
सूर्याचा रथिंचा तुरंग चवला[9] ऐसा निधा दाटला, ।
नेणों मेघ गडाडिला, सभय तो लंकेश्वरा वर्तला,
सीतेचें[10] मनमोर तांडवनटें नाचे महा हर्षला. ॥ ४९ ॥

टाळी येकाचि पीटिली, जनपदीं, पौरांगना हांसती,
जालासे कलका महागलबला, नादें दिशा घूमती, ।
सीता हास्य करीतसे गदगदा[11], भीती प्रभू अंतरीं,
[12]आलें विघ्न निटिंबलें, साखि म्हणे ' श्रीरामचंद्रा वरी '. ॥५०॥

---

१ आळगिलें--हस्तलि. २ धाक--काव्यसं. ३ कंप--सर्वसं. ४ झालें तोलें --काव्यसं. ५ धरित--काव्यसं. ६ विसभुजीं--काव्यसं ७ ज्याचा--काव्यसं. * त्याच्या धाकें उताणा क्षितिवरि पडला ओरे तें सीत चड । त्रैलोकीं कोणी नाहीं हरिविण दुसरा सीतधारी प्रचंड--अन्यपाठ सर्वसं. ८ सांटावला--हस्तलि. ९ कचला--काव्यसं. १० सीतामानस फार--काव्यसं. ११ गुदगुदां-- हस्तलि. १२ झालें--काव्यसं.

जैसें वज्र हिमालयावरि पडे कोदंड तैसेंपरी.
मारें रावण खालता दडपला, मुद्रा जडे खेचरी ।
तोंडीं रक्तहि धूलि त्यात भरली, आरक्त जाली तनू.
चक्रन्याय उरोदरावरि फिरे, वज्रोपमा तें धनू. ॥ ५१ ॥

ज्या चापें त्रिपुरें विशाळ नगरें निर्दाळिलीं शंकरें,
तें क्रोधें दैत्यांधरें[3] उचालितां निर्विघ्न झालीं पुरें. ।
रक्ताच्या उलट्या वमे भडभडा प्राणात आरंभिला
तेव्हां त्याजवळीं प्रधानसमुहो देखोनि धाविन्नला. ॥ ५२ ॥

सामंतादि सहस्र चंडवविये बाणासना झोंबती,
कैंचा[9] रत्नकिरीट, भूतळवटीं माथे रिते लोंबतीं; ।
कोदंडाप्रति लोटिलें, उठविला लंकापती सारणें,
टाकी श्वास[11], घटोदकें मग मुखें प्रक्षाळिलीं रावणें. ॥ ५३ ॥

केला सावध सारणें, मग सभेमध्यें पुनः बैसला
झांकी रावण रावणें[13] निजमुखें श्लोकार्थ वाखाणिला, ।
जाली[14] लौकिक लाज मृत्यु चुकलें आदान विध्वंसिलें,
नेणों काय करील दुर्नय महाभूपा[15]मनीं बैसलें. ॥ ५४ ॥

---

१ तैशा तों काव्यसं; सर्वसं. २ धूमर--हस्तलि. ३ करिं घेउनी--काव्यसं, सर्वसं. ४ जालें स्त्ररें--हस्तलि. ५ आरंभिलें--हस्तलि. ६ निकरा--काव्यसं; सर्वसं. ७ पां धावले--हस्तलि. ८ सुमंतादि प्रधान--काव्यसं; सर्वसं ९ कचें--सर्वसं, काव्यसं. १० शीरें रितीं--काव्यसं. सर्वसं. ११ स्वास--हस्तलि. १२ निज--सर्वसं. १३ सुंदरें--काव्यसं; सर्वसं. १४ झाली लौकिक लाज मृत्यु चुकला दैवें असें जाहलें--काव्यसं; १५ महाराजा--काव्यसं, सर्वसं.

( वसंततिलका )

श्रीराम भंगिल धनू पुढिले प्रसंगीं
ते आइका प्रगट काव्यकथान र्गीं;।
सीतास्वयंवर मनोहर सर्ग चौथा,
तोडील विकूल म्हणों भवभोगवेथा. ॥५५॥

*इति श्रीजानकीस्वयंवर रावणमानभंगोनाम चतुर्थः सर्गः ॥४॥

---

१ रोग-हस्तालि * असा उल्लेख काव्यस प्रतीत नाहीं.

# सर्ग पांचवा

( भुजंगप्रयात )

दशग्रीव कांचावला मानभंगें,
महाकार्मुकें चूर्ण केलीं पतंगें, ।
सभेमाजि राजे भयाभीत जाले,
सुपर्णापुढें सर्प जैसे बुझाले. ॥ १ ॥

( मालिनी )

सदसिं जनकरायें काय विज्ञप्ति केली
दशवदनभुजांची शक्ति खुंटोनि गेली,
लववुनि शिवचापा ज्या चढे त्या उदारा;
त्रिभुवनजयलक्ष्मी मैथिली होय दारा. ॥ २ ॥

( वसंततिलका )

गांभीर्य धैर्य बहु वीर्य तुम्हांसि आहे,
यामाजि येकाहि नुठे पुरुषा न पाहे.
पृथ्वींत वीर दशकंधर काय होता,
तो भंगला गरुडदृष्टिं जसा कपोता. ॥ ३ ॥

---

१ कुंचावला--हस्तलि. २ झाले--काव्यसं. ३ मेथुली--हस्तलि. ४ येक न उठे--हस्तलि. ५ पुरुषा--हस्तलि. ६ वाहे--हस्तलि.

( शार्दूलविक्रीडित )

राजे स्तब्ध, भयासि लुब्ध अवघे, वाग्बंध चित्रोपमा,
प्रेतप्राय अधोमुखें न वदती जाणोनि त्यांची[1] क्षमा;
राजा बोलतसे, तटस्थ[2] नृपती टाकोनि संभाषणें,
' निःसंदेह मला गमे वर नसे श्रीजानकीकारणें. ॥४॥

' भूगोळीं जितुके महींद्र तितुके आले सभासंगमा,
कन्या हे कलधौतकोमलरुची[3] श्रीकीर्तिला मोद्यमा;
वोढीना टणकारिना[4] लवविना उत्थापिना येस्थळीं
कोण्हीही न धरी महाधनु करीं, निर्वीर उर्वीतळीं. ' ॥५॥

ऐसें उत्तर आइकोनि मुनिनें[5], रामाकडे पाहिलें,
' आज्ञा पूज्य ' समर्थ राघव म्हणे, तों लक्ष्मणें बोलिलें, ।
' जाला रावणमानभंग जनकें निर्वीरसें मानिलें.
हा तों शद्ब न साहवे रविकुळीं आम्हां उणें आणिलें. ' ॥६॥

आवेशें दृढ कास घालुनि म्हणे दोर्दंड मर्दूनियां,
' माझें कौतुक पाहणें नृपसभेमध्यें तुम्ही स्वामियां ! ।
मेरू मंद्र समुद्र चंद्र न गणी दासासि आज्ञा दिजे[6]
हें तों जीर्ण पिनाक काय गणना सामर्थ्य आलोकिजे[7]. ॥७॥

---

१ त्यांची-काव्यसं; सर्वसं. २ तटस्थ-काव्यसं; सर्वसं. ३ कलधौतसुंदरगुणी-काव्यसं; सर्वसं. ४ ठणकारिना-काव्यसं; सर्वसं. ५ ऋषिनें-काव्यसं; सर्वसं. ६ किजे-सर्वसं; काव्यसं. ७ वीलोकिजे-काव्यसं; सर्वसं.

( रथोद्धता )

राघवें, मधुर बोलिलें कसें, ' लक्ष्मणा ! क्षणभरीं उगा असे. ।
[1]कौशिकें मज समर्पिली पुढें, येकल्या जरि नव्हे तरी उठे. ॥८॥

( इंद्रवज्रा )

पाहे सुमित्रा ! उगलाचि बैसें,
निर्वीर उर्वीतळ होय कैसें, ।
आम्हांसि हा शब्द उणा[2] न साहे, '
' राजा मनीं विस्मित होय राहे. ' ॥ ९ ॥

( रथोद्धता )

घातली[3] सुदृढ कांस राघवें,
वंदिलें गुरुपदाब्ज लाघवें, ।
ठेविला वरद हस्त मूर्धनीं,
पाव तूं विजय चापमर्दनीं[4]. ॥ १० ॥

( द्रुतविलंबित )

जनकजा मिरवे उपरीवरी,
सहचरी वसनांचळ सांवरी, ।
सखि म्हणे, ' रघुवीर उभा असे,
धनुप भंगिल संशय हो[5] नसे. ' ॥ ११ ॥

---

१ कौशिकें मज समर्पिलें जरी । एकल्या नच चरे उठें तरी ॥ काव्यसं. सर्वसं.
२ कदा--हस्तलि. ३ घातलें--हस्तलि. ४ मर्दुनीं--काव्यसं, सर्वसं. ५ हा--काव्यसं, सर्वसं.

( शार्दूलविक्रीडित )

सीतां[१] भूसि म्हणे, ' *उमाणि धनुषा रामासि साह्ये[२] करीं, ' ।
शेषा ! लोटि शरासनासि, तपना ! वोढीं सहस्रांकरीं, ।
शंभू ! कार्मुक आवरीं दशभुजीं, पृष्ठोसि[३] कूर्मा ! धरीं,
चापा दिग्गज हो ! धरा, विधि ! तुंवा[४] होई हळू तें करीं.॥१२॥

( वसंततिलका )

तीर्थें व्रतें जप पुरश्चरणादि दानें,
उद्यापनादि हवनें द्विजभुक्तमानें, ।
साह्ये[५] करो, सुकृत पुण्य[६] असेल मातें,
भंगो शरासन [७]शिवें रघुवीरहातें. ॥१३॥

ऐसें[८] म्हणोनि उपरीवरि पंकजाक्षी,
पाहे, सख्यांत उभि, तारक ब्रह्म लक्षी, ।
नाना तिणें नवसिले सुर भूमिसाक्षी,
भंगावया धनुष उद्यत राम कांक्षी. ॥१४॥

---

१ तीं भूमीसि–काव्यसं; सर्वसं. * उमानिधनुषा !—काव्यसं; सर्वसं. २ साह्या–काव्यसं; सर्वसं. ३ पृष्ठिस–हस्तलि. ४ धनु आठां भुजीं उत्धरीं–हस्तलि. ५ साह्या-काव्यसं; सर्वसं. ६ पूर्विल—काव्यसं; सर्वसं. ७ खरें--काव्यसं; सर्वसं. ८ नाना तिणें नवासिले सुर भुमिसाक्षी । भंगावया धनुष ऊदित सर्व साक्षी ॥ श्रीमूर्ति ते उभि अये भुपर्तांत देखा । त्याच्या स्वरूपिं दुसरा करि कोण लेखा ?॥–काव्यसं; सर्वसं.

( शार्दूलविक्रीडित )

केयूरांगद कुंडलें, मणगटीं जांबूनदें कंकणें,
वांकी तोडर गर्जती घनरवें पादांबुजीं भूषणें; ।
सीताचित्तमयूर नर्तन[1] करी, श्रीराम सर्वांपढें,
धीरोदात्त[2] उभा, प्रतापमहिमा नेणोति शास्त्रें मुढें. ॥१५॥

राजे मानव देव दानव सभे, नृत्यांगना नाचती,
वाद्यांचे घनघोष होयँ[3], अवघे रामाकडे पाहतीं; ।
नाना तें चतुरंग सैन्य परिधीं योद्धें[4] उभे ठाकले,
विप्राचे जयशब्द[5] होति अवघे[6] चित्रोपमा थोकले. ॥१६॥

भाळीं लाउनि तर्जनी भुजलता भूपांउनें[7] मर्दिल्या,
झाला[8] भांबडभूत भूषणमणी, विद्युल्लता वर्जिल्या; ।
तेजःपुंज कटाक्ष, कंजचरणीं झुंकारती नेपुरें,
कांची किंकिणि घंटिका लघुकटीं, ब्रीदें पदीं[9] मेदुरें. ॥ १७ ॥

उल्हासें चमकोनि जाय, धनुषापांशीं[10] उभा राहिला[11],
सांगातें अवघे पुरोहित, पुढें श्रीराम तो येकला; ।
कोदंडासि सभेसमोर उजवें घालोनियां वंदिलें,
दोर्दंडें उचलूनि[12] ज्या[12] चढविलें, कर्णांत तें वोढिलें. ॥ १८ ॥

---

१ नृत्य करि तो–काव्यसं; सर्वसं. २ धीरोदार–काव्यसं; सर्वसं. ३ होति–काव्यसं, सर्वसं. ४ पाहों–काव्यसं; सर्वसं. ५ जयकार–हस्तलि. ६ उरले–हस्तलि. ७ भूपांसुनि–काव्यसं, सर्वसं. ८ ज्याला भूषण सुंदरें अतिमणी–काव्यसं. सर्वसं. ९ अतीसुंदरें–काव्यसं; सर्वसं. १० धनुशापासीं–हस्तलि. ११ ठाकला–हस्तलि. १२ उचलोनियां–काव्यसं; सर्वसं.

रामानें[1] सहवर्तमान मुनिच्या कोदंड उच्चालिलें[2],
राजे आणि विदेहसंशयाधिया संयुक्त आस्फाळिलें; ।
सीताचित्तसमेत वोढुनि भृगूपुत्रादि सोहंकृती[3],
त्यांचा[4] दुर्मद गर्व भंगुनि धनुर्भृत्त्यक्तसर्वाकृती. ॥१९॥
घोषें चाप कडाडिलें रघुपती कोदंडें[5] वोढी बळें,
तेव्हां कोटि तडाडिलें[6] घन, भिजा कोदंडकोलाहळें; ।
दिग्मातंग थरारिले रविरथीं उच्चैश्रवादग्भुले,
सीमा साडिति सिंधु, मस्तक तुकीं शंभू स्वयें आपुलें ।२०।[7]
कांपे[8] शेष, उलंडिलीं उडुगणें, हेलावला वारिधी,
राजे विस्मित, राम सस्मित उभा, जो शौर्य[9] तेजोनिधी; ।
विश्वामित्र सुमित्र मित्र, अवघे भूपाळ मारू कुरू;
लंकेशा जनकादि, त्यांत विजयी कोदंडदीक्षागुरू. ॥२१॥
निक्षेत्री[10] क्षितिचक्र येकविसदां केलें बळें भार्गवें,
युद्धीं राक्षस दुष्ट दैत्य वधिले चापाचिया आर्जवें; ।
तें पापें धनुषासि थोर[11] घडलीं प्रायश्चिता योजिलें,
देह श्रीरघुनाथ[12]पाणिकमळीं तीर्थीं परीत्याजिलें[13] ॥ २२ ॥

---

१ रामाच्या--हस्तलि. २ उच्चालिलें--काव्यसं, सर्वसं. ३ सोहंकृती-हस्तलि. ४ तीसी-हस्तलि. ५ दोर्दंड-हस्तलि. ६ कडाडिले--काव्यसं, सर्वसं. ७ सीमा सांडिति सिंधू मस्तक तुकी शंभु स्वयें आपुलें । ते सर्व भुप रामशक्ति नयनीं देखोनि वेडावले ॥ --काव्यसं, सर्वसं. ८ कोपे--काव्यसं. सर्वसं. ९ सूर्य--हस्तलि. १० निक्षत्री-काव्यसं, सर्वसं. ११ घोर--काव्यसं; सर्वसं. १२ श्रीरघुराज--हस्तलि. १३ परित्यागिलें--काव्यसं, सर्वसं.

पुष्पें निर्जर वर्षले, ' जय जय श्रीराम [1]गर्जीनले,
स्वर्गीं वाजति देवदुंदुभि तुरें [2]भूलोकें संतोषले; ।
निर्घोषें [3]दुमदूमिल्या नभ दिशा संपूर्ण जाल्या रवें;
सीतेच्या स्फुरती भुजा रघुविरा भेटावया [4]गौरवें. ॥ २३॥

( शिखरिणी )

निशाणाच्या घाईं ध्वनित विरुदाइत विजयी,
ऋषी विश्वामित्रादिक सुखि सुमित्रादि विषयी; ।
पुढें जाले राजे रघुपति विराजे तदुपरी,
उभी पाहे सीता, [5]मुदितें गवसीता सहचरी. ॥ २४ ॥
पुढें आला बाहो पसरुनि [6]तदा कौशिकमुनी,
[7]तयातें वंदूनी रघुविर वदे नम्रवचनीं, ।
म्हणे, ' स्वामी [8]जाला विजय [9]धनुषापासुनि मला,
गुरूआशिर्वादें सकळ भवसंताप [10]शमला. ॥ २५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

सौमित्रा परिरंभिलें रघुविरें राजे यथानुक्रमें,
अधोन्मीलित नेत्र रावण दिसे जो चेवला विक्रमें; ।
श्रोत्रीं साधु महानुभाव अवघीं श्रीराम [11]आलिंगिला,
रत्नें कांचनपर्येळीं प्रणयिनीं [12]काकुस्छ वोवाळिला. ॥२६॥

---

१ गर्जिन्नले—काव्यसं; सर्वसं. २ भूर्लोक—काव्यसं, सर्वसं. ३ बहु गर्जल्या—काव्यसं; सर्वसं. ४ आदरें—काव्यसं; सर्वसं. ५ प्रमुदित धराया धनुकरीं--काव्यसं; सर्वसं. ६ महा—हस्तालि. ७ प्रमोदें आंळगी रघुपति पदांभोरु नमुनि—हस्तालि. ८ झाला—काव्यसं; सर्वसं. ९ धनुशा—हस्तालि. १० हरला—काव्यसं, सर्वसं. ११ आळांगिला—हस्तालि. १२काकुस्थ—काव्यसं; सर्वसं.

( शिखरिणी )

सभेमध्यें नेला रघुविर समस्तीं नृपवरीं,
दिसे जैसा मेरू मणिमयमहाशैलें[1] निकरीं[2]; ।
विमानें देवांचीं निबिड दिसतीं दिव्य गगनीं,
[3]दिल्हीं दानें भूपें सकळ सुर देखोत नयनीं. ॥ २७ ॥

( शार्दूलविक्रीडित )

रंभा उर्वसि मेनिका नृपसभे इत्यादि देवांगना,
आल्या नृत्य करावयासि सरिसें गंधर्वेही[4] गायना; ।
[5]भाटाचे गण गर्जती, जनक दे सत्कार त्यांकारणें,
[6]झालें राम निरीक्षितां सुरवरां नेत्रांबुजा[7] पारणें. ॥ २८ ॥

( भुजंगप्रयात )

प्रधानासि सांगीतलें भूमिपाळें,
' तुम्ही जानकी आणिजे शीघ्रकाळें, ' ।
नृपातें तिहीं मूर्धनीं नम्र केलें,
सर्वे सैन्य आणावयालागिं गेले. ॥ २९ ॥

सहस्रावधी धांवले वेत्रपाणी,
पुढें बोलती हर्षपीयूष[8] वाणी. ।

---

१ शैल्य–हस्तलि. २ शिखरीं–काव्यसं; सर्वसं. ३ कैसा आकर्षीतो सित रघुपती पाहुं नयनीं–काव्यसं; सर्वसं. ४ गंधर्व सद्गायना–हस्तलि. ५ भाटादी गुण वर्णिती–काव्यसं; सर्वसं. ६ जाला–हस्तलि. ७ नेत्रांबुजीं–हस्तलि. ८ होतसे पीयुषातुल्य–काव्यसं; सर्वसं.

'धनू भंगिलें रामचंद्रें प्रतापें,
तुम्हांलागि पाचारिलें शीघ्र बापें. ॥ ३० ॥

( शार्दूलविक्रीडित )

द्वारीं मत्त मतंगिणी उभि असे शृंगार वेगीं करा,
माळा घेउनियां करीं तुम्हि चला श्रीरामचंद्रा वरा.' ।
ऐसें उत्तर आइकोनि हृदयीं आनंदली जानकी,
ते काळीं रसनायिका शिकविती सीतेप्रती साधकी.॥ ३१ ॥

* ( द्वादशरासीन्यास )

भूकन्याकुचकुंभ कर्कश महा देखोनि लाजे करी,
भ्रूचापें, नयनासि मीन न तुळे, पावे कटी केसरी; ।
चंद्रास्या अळिकुंतळा मृगदृशा लज्जा पडे मन्मथा,
ते तों मुख्य अजा वृषध्वजसखा त्याची प्रिया नान्यथा.॥ ३२॥

कुंबग्रीवा, कृशांगी, त्रिवळिस उपमा कामसोपान साजे,
रंभास्तंभोरुकांडें, अनुपम चरणीं नूपुरीं घोष गाजे.
रत्नें कीं दंतपंक्ती, श्रुतियुत पुतळ्या ज्यांसि चंद्रार्क लाजे,
भांगीं सेंदूररेखा, मृगमद निडळीं, मुक्त नाकीं विराजे. ॥ ३३॥

---

१ द्वारी उन्मत हस्तिणी--काव्यसं; सर्वसं. २ मंतोषली--काव्यसं, सर्वसं. ३ रसनायकासि करिती सीते प्रती साधकीं--हस्तलि * असा उल्लेख काव्यसं, प्रतीं [illegible] घोळ गाजे--हस्तलि. ७ सिंदूर--हस्तलि.

( स्रग्धरा )

सीतेची लांब वेणी नवक[1]नकमणीं, साम्य साजे त्रिवेणी,
ल्याली संपूर्ण लेणी, बैत करिती झणी नेत्र देखोनि एणी; ।
केयुरें पोतिपाणी तळयुग चरणीं रक्त, बिंबोष्ट खाणी;
कंठी माळा पुराणी, स्तविति कवि गुणी गौरवा मंद्वाणी. ।३४।

( शार्दूलविक्रीडित )

आंगीं चंदन चर्चिला परिमळा[3], कांसे पटू कासिला,
ल्यालि दाटित कंचुकी, मणि[6] पुरा मूर्धालकीं गुंफिला; ।
रत्नें शोभति कंकणें मणगटीं, पंचांगुळीं मुद्रिका,
नेत्रीं अंजन घातलें मग दिसे जैशी शरच्चंद्रिका. ॥ ३५ ॥

( शिखरिणी )

विरोद्या पोल्हारें अनवट झणाणीत विजयीं,
पदांगुष्टीं लेण रुणझणित ल्याली गुणमयी; ।
सुगंधें सौगंधें नग कनक जांबूनद अजा
विराजे श्रीसीता, मग मुकुर पाहे जनकजा. ॥ ३६ ॥

सुपक्का पानाच्या मग हडपिणी देति विडिया,
उभी राहे सीता सखि पसरिती पायघडिया; ।
पुढें आले मंत्री स्तुति करिति, ' माते ! अवरजे !
करीं घेई[10] माळा, करिणिवरि बैसे जनकजे !' ॥३७॥

---

१ नगकनकमणी–हस्तलि. २ कटिस्थळ हरिणीसाम्य लावण्य खाणी–काव्यसं; सर्वसं. ३ परिमळें–हस्तलि. ४ काशे–हस्तलि. ५ काशिला--हस्तलि. ६ मणिकरा–मध्यें हिरा गुंफिला--काव्यसं. सर्वसं. ७ वोपिति–हस्तलि. ८ पसरिती भुमीं–काव्यसं, सर्वसं. ९ अवनिजे–काव्यसं. सर्वसं. १० माळा घेई–काव्यसं, सर्वसं.

म्हणे माता सीतेप्रति मधुर पीयूषवचनीं,
'तुझ्या योगें आम्हीं त्रिभुवनिं महाधन्य जननी ! ।
वरी श्रीरामातें उशिर न लवीं, वेळ बरवी;
म्हणों लाभस्तेषां, अभिजित मुहूर्तोदय रवी.' ॥३८॥

निघाली पद्माक्षी घवघवित शृंगारसरिता,
सख्या[1] संभारेशीं स्तुति करिति आनंदभरिता, ।
पदें मंदें टाकी गजगमनगा मंजुगतिनें[2],
महाद्वारीं केलें प्रगट निजरूपा मग तिनें. ॥३९॥

विद्या देति येकी, उशिर व्यजनें[3] येकि विजिती;
उभ्या येकें[4] हातीं जडित पिकदान्या[5] मिरवती; ।
लघूवस्त्रें येकीं मुखमुहुरबिंदूसि पुसतीं,
सख्या येकी तीर्सी[6] बहुमधुरशब्दें रिझविती. ॥४०॥

पुढें शृंगारेंसी *माणिचवरडोलायुत बरी,
[8]उभी सीतेपासीं करिणि मग आधोरण करी; ।
प्रवशे सोपानें उपरि मिरवे आसनपदीं,
प्रभा फांके तेणें, लखलखित भूगोळ अगदा. ॥४१॥

---

१ जिच्या सौंदर्याची सुरयुवति सामान्य बहुता- काव्यसं; सर्वसं. २ मज्जगतिनें--हस्तलि. ३ विजिणें--हस्तलि. ४ एकीं--काव्यसं. सर्वसं. ५ पिकदानी--हस्तलि. ६ संगें--हस्तलि. ७ तिर्सी--हस्तलि. * माणिचवर ढालीयुत--काव्यसं. ८ म्हणे सीते पासीं, 'करिणिवर आरोहण करी;'--काव्यसं; सर्वसं.

समारंभे सेनागवासित विराजे जनकजा,
पुढें नाना वाद्यें प्रमुदित निघाली कमळजा; ।
सभास्छाना आली करिणिवरि बैसोनि विजयी,
करांभोजीं माळा, नृपजनकबाळा गुणमयी. ॥४२॥

( शार्दूलविक्रीडित )

श्रोत्री वैदिक वैद्य पंडित मुनी येहीं[1] सभा दाटली,
राजेमानवरक्ष[2]दानवचमू दाहीं दिशां[3] आटली[4], ।
नादें अंबर कोंदलें दुमदुमी आल्हाद सर्वां[5] मनीं,
आटाळ्या उपऱ्यावरी जग उभे पाहावया लोचनीं. ॥४३॥

देवाचे जय[6]शब्द होति गगनीं भूदेव धात्रीतळीं,
विश्वामित्रऋषेश्वरादिक मुनी होते सभामंडळीं, ।
श्रोत्री वैदिक शांतिपाठ म्हणती देवांगना नाचती,
गंधर्वा[7]प्सर गायनें अनुपमें स्वस्त्यायनें वांचिती[8]. ॥४४॥

मागें हस्तिणिये अमात्य सरिसे मदें पदें चालती,
हातीं कांचनरत्नदंड सरळे पंथीं पुढें धावती; ।
दूतीं ढाळिति[9] चामरें, मणगटीं झुंकारिती कांकणें,
सीतेला मग दाखवी[10] सहचरी श्रीराम तो पाहणें. ॥४५॥

---

१ ईहीं–काव्यसं. २ यक्ष–काव्यसं. सर्वसं. ३ दाहीं दिशीं–काव्यसं; सर्वसं. ४ शोभली–काव्यसं; सर्वसं. ५ जन मिळे–काव्यसं. सर्वसं. ६ जयकार–हस्तलि. ७ गंधर्वेश्वर–हस्तलि. ८ गर्जती–काव्यसं. सर्वसं. ९ वारिति–काव्यसं; सर्वसं. १० दाविती–काव्यसं, सर्वसं.

( शिखरिणी )

पुढें विश्वामित्राजवळि जगदात्मा रघुपती
महामूर्ध्निस्थानीं मुकुट मणितेजें झळकती; ।
नवा कासे पीतांबर किंणकिणीयुक्त रसना [1]
पदांभोजीं नादाकुळित बिरुदें शत्रुशमना. ॥ ४६ ॥

( शार्दूलविक्रीडित )

सीता श्रीरघुवीर धीर, नयनीं देखोनि आनंदली,
हातीं घेउनि माळ बाळहरिणीनेत्रा, पुढें पातली; ।
देवर्षी नृप सूर्य साक्ष धरणी लोकीं सभा दाटली,
हर्षें ते समईं रघूत्तमगळा माळा निकीं घातली. ॥४७॥

( शिखरिणी )

सुलग्नीं माध्यान्हीं अभिजित पतंगें गवशिला, [2]
महीजेनें तेव्हां रघुविर निजांगें परिणिला; [3] ।
नृपप्रीया रत्नें रघुपतिस ओवाळिति धनें,
विमानीं संतोषें त्रिदशगण वर्षति सुमनें. ॥ ४८ ॥

( शार्दूलविक्रीडित )

वाद्यें वाजति, नाचती सुरसती, गंधर्व आलापिती,
स्वर्गीं गर्जति देव, दुंदुभि तुरें भूपाळ आलोकिती; [4] ।

---

१ कटितटीं--काव्यसं; सर्वसं. २ गवशिली--हस्तलि. ३ परिणिली--हस्तलि.
४ ही ओळ काव्यसं; व सर्वसं. प्रतींत नाहीं.

आ[1]शीर्वाद मुनींद्र देति अवघे, मंत्राक्षता घालिती,
भा[2]टां गौरविलें सभोसि जनकें सूर्यांश जे वानि[3]ती. ॥ ४९ ॥

( मालिनी )

खगपति भुजगाची जेविं पाडी दुखंडें,
शिवधनु रघुनाथें भंगिलें तेविं दंडें;
परिणिलि भूमिकन्या कीर्ति त्रै[4]लोकिं झाली
व[5]दनिं दशमुखाच्या काळिमाकांति[6] आली. ॥५०॥

नृपति जनकभूपें पूजिले सानुरागें,
बहुत विनित जा[7]ला, कीर्ति वर्णी विभागें;
दशमुख अपमानें शीघ्र लंके निघाला,
धरणिपतिसमूहो त्यावरि स्वार जाला. ॥५१॥

जनक दशरथातें मूळ योजी प्रधाना,
लिखित लिहि[8]तें विश्वामित्र लग्नार्थ माना; ।
कथ[9]न पुढिलें ऐसें, पंचमः सर्ग जाला.
अभय वरद दे[10]णें पंडितीं विठ्ठलाला. ॥५२॥

* इति श्रीजानकीस्वयंवर महाराष्ट्रकाव्य विठ्ठलदासकविकृतौ
श्रीरामधनुर्भंगोनाम पंचमःसर्गः ॥ ५ ॥

---

१ ही ओळ काव्यसं, व सर्वसं. प्रतींत दुसरी आहे. २ ही ओळ काव्यसं; व सर्वसं. प्रतींत तिसरी असून, ' त्यातें द्रव्य अपार देत नृप तो राजे सभे पाहती ' ही त्या दोनी प्रतींत चवथी ओळ आहे. ३ वर्णिती--काव्यसं; सर्वसं. ४ लोकत्र--हस्तालि. ५ दशवदनमुखासी--काव्यसं; सर्वसं. ६ स्पष्ट-- काव्यसं; सर्वसं. ७ झाला--काव्यसं; सर्वसं. ८ लिहलें--हस्तालि. ९ पुढिल कथन--काव्यसं; सर्वसं. १० देतें--काव्यसं; सर्वसं. * असा उल्लेख काव्यसं; सर्वसं. प्रतींत नाहीं.

# सर्ग सहावा

( शिखरिणी )

धनुर्यागाप्रांतीं नृप सकल गेले स्वनगरा,
म्हणे विश्वामित्रापति जनकराजा ' मुनिवरा; ।
स्वहस्तें गोसावी ! लिखित अजपुत्रासि लिहिजे,
प्रधाना प्रेरावें निजकुळ तुम्हीं सार्थक किजे. ' ॥१॥

[ मंदाक्रांता ]

विश्वामित्रें लिखित लिहिलें बुद्धिमंतें स्वहस्तें,
[1]पूर्वारंभा प्रभुर्ति [2]सकळें भूतकर्में प्रशस्तें; ।
प्रज्ञावंतें कुशळ दिधलें आपुलें पत्र रायें
' वार्ता सांगें नृपदशरथालागिं आणा उपायें. ' ॥२॥

( वसंततिलका )

गेले प्रधान तिसरे व[3]सती अयोध्ये,
से[4]नासमूह सरिसे बळिवंत योद्धे; ।
वंदूनिया दशरथाप्रति पत्र देती,
वाक्यें समर्पक सुधावचनें [5]वदेती. ॥३॥

---

१ पूर्वारंभीं–काव्यसं; सर्वसं. २ सकळीं–काव्यसं, सर्वसं. ३ मजले–काव्यसं, सर्वसं, ४ वेष्टीत सैन्य–हस्तलि. ५ वदे तीं–काव्यसं; सर्वसं.

( मालिनी )

नृपतिदशरथातें प्रार्थिलें राजमंत्रीं
'विनवाणे जनकाची वाचिजे सांग पत्रीं;'।
मग लिखित वसिष्ठें वाचिलें हर्षमानें
अजसुत निजचित्तें आइकें सावधानें. ॥ ४ ॥

( शिखरिणी )

ऋषी विश्वामित्रें प्रणमुनि वसिष्ठासि पहिलें,
पुढें आशीर्वादें नृपदशरथा पत्र लिहिलें. ॥
'यशोदारांमध्यें त्रिभुवनिं तुझी कीर्ति मिरवे
तुझे राया! दोघे कुमर सुखि आहेति[1] बरवे. ॥५॥

( भुजंगप्रयात )

तुम्हांपासुनी स्वाश्रमा स्वार झालों,
दिसां चौंचे[2] सिद्धाश्रमालागिं आलों;।
पथीं राघवें ताटका[3] मुक्त केली,
अशी कीर्ति लोकत्रयामाजिं गेली. ॥६॥

पुढें याग संरक्षिला सप्तरात्रें,
सुबाहू निमाला तिळप्राय गात्रें;।

---

१ आहेत--काव्यसं. सर्वसं. २ चौत--हस्तलि. ३ ताटिका--हस्तलि. ४ जालि--हस्तलि.

मरीची पिसारोन[1] लंकेसि गेला,
अहिल्येसि उद्धार मार्गांत केला. ॥ ७ ॥

( मालिनी )

तदुपरि जनकाचें मूळ आम्हांसि आलें,
मिथुळपुरिसि गेलों थोर आश्चर्य झालें[2]; ।
रघुविरकरतीर्थीं त्यागिलें देह चापें,
परिणिलि[3] मग सीता[4] रामचंद्रप्रतापें ॥ ८ ॥

धनुषदमनिं[5] जाली जानकी रामभार्या;
म्हणउनि तुम्हिं यावें सर्वथा लग्नकार्या;
विधियुत परिणावी मैथुळी लग्नदानीं '
दशरथ हरिखेला, घाव घाली निशाणीं. ॥ ९ ॥

( भुजंगप्रयात )

सुमंतासि पाचारिलें भूमिपाळें,
म्हणे, ' सैन्य पालाणिजे शीघ्रकाळें. ।
नृपाज्ञेसि वंदूनि माथां महंतें,
चमू सिद्ध केली प्रधानें सुमंतें. ॥ १० ॥

अरब्बी इराखी[6] हरी पंचरंगी,
विराजेति कच्छी प्रयाणप्रसंगीं, ।

---

१ पिसारेन–हस्तलि. २ झालें–काव्यसं. सर्वसं. ३ प्रणिलि–काव्यसं. सर्वसं. ४ सीता ते–काव्यसं; सर्वसं. ५ दमुनि–काव्यसं, सर्वसं. ६ इराणी–काव्यसं; सर्वसं.

महाधीर गंभीर ते घोरें[1] आंगें,
बळें धावेतां[2] टाकिती वायु मागें. ॥ ११ ॥

( शार्दूलविक्रीडित )

भांडारें बहु फोडिलीं दशरथें जे[3] जीर्ण संपादिलीं,
द्रव्यें बाहिर आणिलीं मग रथीं अश्वीं गजीं लें[4]।दिलीं; ।
रत्नें फार अमोलिकें नपवरें दिव्यांबरें घेतलीं,
हर्षे भूप, न सांठवे त्रिभुवनीं वाद्यें रवें मातलीं. ॥ १२ ॥

मार्कंडेय वसिष्ट कश्यप ऋषी हे चालिले गौरवें,
जाबाली मुनि वामदेव बहुधा कात्यायनादि स्वयें, ।
भूपाळें नरवाहनीं बसविले, जे सृष्टिकर्ते दुजे
श्रोत्री साधु महानुभाव सरिसे जे स्वाधिकारी पुजे. ॥ १३ ॥

घोडेही शत चालिले, दुलदुलें शृंगारिले साजिरे,
ज्यांचें गर्जन आइकोनि हृदयीं भूगोळ नादे विरे; ।
मुक्तें मंडित पाखरा मखमली पृष्ठीवरी साजती,
मोहाळी सिरताज साज सडका कंडे[5] पटे राजती. ॥ १४ ॥

वाजी बोर[6] चितोड नीळ तुरकी श्रीपंचकल्याण जे,
सारंगे जरदे कुमाइत महा देखोनि राजा भजे; ।

---

१ घोष–हस्तलि. २ धावना–हस्तलि. ३ जीं–काव्यसं; सर्वसं. ४ लाधिली–हस्तलि. ५ कांडे–काव्यसं; सर्वसं. ६ बोराच तोंड–काव्यसं; बोरचि तोंळनीळ–सर्वसं.

पायीं तोडर गर्जती, नभ खुरीं झेपावती चालिले,
नाना ते पुंट[1] पर्वती, नृपतिनें जिंतूनियां आणिले. ॥१५॥

लांगूळें, पद, कुक्षिभाग दुघडीं लाक्षा रजें रंगिले,
तोंडी रत्नखचीन, जीन वरुते, दोहींकडे तंगिले, ।
दांडी कान समान मान, धवळे नेणों दुधें धूतले,
जे आपावरि चालतां नभखुरीं नाहींत पैं रूतले. ॥१६॥

पृष्ठीं राउत आयुधें मिरवतीं, शस्त्रें अलंकारले,
माथां टोप, शरीरबंध कवचें सेनेपुढें [2]थारले, ।
पायांचे गण चालिले, असिलता झेलीत ते हस्तकीं,
माजीं सारसनें, भुजासि चवरें, नाना तुरे मस्तकीं. ॥१७॥

हस्ती मस्त दुरस्त झूलत[3] उभे सिंदूर सोंडे[4]वरी,
अंग स्थूळ, विशाळ शूळदशनी ऐरावताचे परी; ।
पृष्ठीं कांचनरत्नमंडित[5] निकें[6] चौंढोलें[7], चित्रांबरी;
ते[8] शाष्टयायन पुष्करीं, गुढिरले द्वीपांतरींचे करी. ॥ १८ ॥

( भुजंगप्रयात )

प्रभू संपदाशीळ तो श्रावणारी,
निघाल्या रथाच्या सहस्रादि हारी, ।

---

१ द्विट पर्वती–काव्यसं, सर्वसं. २ स्छारले–हस्तलि. ३ झुल्लत–काव्यसं; सर्वसं. ४ सोंडीवरी–हस्तलि. ५ कांचनमंडिते–काव्यसं; सर्वसं ६ अतिनिकें– काव्यसं; सर्वसं. ७ चौढाल–काव्यसं; सर्वसं. ८ षष्टोद्दायन पुष्करीं गुदरिलें–काव्यसं.

पताका ध्वजीं शोभती चित्रवर्णा,
असे नित्य वास्तव्य तेथे सुपर्णा. ॥ १९ ॥

जरी हा प्रभू सर्वदा सिद्ध मंत्रें,
तरी राजचिन्हें धरावीं स्वतंत्रें; ।
महासिंह शार्दूल मच्छादि [1]तुंडें,
विशाळाक्ष [2]त्यांचे जसीं वन्हिकुंडें ॥ २० ॥

( स्वागता )

मेघडंबर दिगंबर साजे, आतपत्र शिरिं[3] येक विराजे, ।
सुंदरें बहुविधें रविपत्रें, देखिलें दशरथासि जगत्रें. ॥ २१ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

यंत्रें उष्ट्रपृष्ठिं वेष्टित गजीं सेनामुखीं चालती,
पायींचे[4] म्हणती, ' तुरंगम किती आम्हांपुढें धावती.' ।
वाद्यांचा[5] घन घोष होय बिरुदें वेताळ वाखाणिती,
दे सत्कार उदार धीर नृपती, शक्रादि ज्यातें भितीं. ॥२२॥

( शिखरिणी )

गजस्कंधीं येकाहुनि अधिक येक[6] प्रभु[7] रथीं,
विमानीं देवर्षी[8], इतर नरयानीं पुरपती; ।

---

१ दंडें--काव्यसं; सर्वसं. २ त्याचे--हस्तलि. ३ तन्हि-हस्तलि. ४ पायांचीं--काव्यसं; सर्वसं. ५ वाद्यांचे बहुघोष-काव्यसं; सर्वसं ६ एका--काव्यसं; सर्वसं. ७ प्रभुरथीं-काव्यसं; सर्वसं. ८ देवासी-काव्यसं; सर्वसं.

समारंभे राजा दशरथ निघे जाय मिथुळे,
असे आला चौथे वसतिस, पहाया जन मिळे. ॥२३॥

[ भुजंगप्रयात ]

तुतारे नगारे तुरे शंख भेरी,
मृदंगादि वीणे दमामे नफेरी; ।
डफांचे झणत्कार शृंगें बुरंगें,
किती चौंडुकें झल्लरी वेणु रंगें. ॥ २४ ॥

[ मालिनी )

दशरथ नृप आला [3]आपुल्या वैभवेंसीं,
जनपद चमु [4]पाहों पातली[5] [6]गौरवेसीं, ।
जनक मग निघाला त्यासि भेटावया[7]सी,
सरिसि सकळ सेना नोपमा द्या[8]वयासी. ॥२५॥

( शार्दूलविक्रीडित )

वाद्यें चंड घडै घडै घडकती धों धों दमामे वळें,
भेरींचे भबुका[9]र मंगळ[10]तुरें संलग्न दोन्हीं दळें; ॥
यंत्रांचे भडमार होत, धुळिनें मार्तंड आच्छादिला,
पायाचे गण धावती चमुपुढें पं[11]थं [12]प्रंजीं दाटला. ॥ २६ ॥

---

१ चौकडी--काव्यसं; सर्वसं. २ वेगुतुंगें-हस्तलि. ३ आपुले--काव्यसं; सर्वसं. ४ पाह्या-हस्तलि. ५ पातले-हस्तलि. ६ गौरवासी--हस्तलि. ७ भेटावयातें--काव्यसं; सर्वसं. ८ द्यावयातें--काव्यसं; सर्वसं. ९ भभकार--हस्तलि. १० शंखगजरें--काव्यसं; सर्वसं. ११ पंथा--काव्यसं; सर्वसं. १२ तर्दीं--काव्यसं; सर्वसं.

( शिखरिणी )

सुवर्णाचे अंदू लखलखित, सिंदूर[1] वदनीं
घणाणीती[2] घंटा[3] मणि झळकती इंदुदर्शनीं[4]. ।
गळद्दंडस्थानीं[5] मदगळित[6] दानोदक[7] झरे,
महावंत स्कंधीं गज[8] चवरढोलाश्रित बरे. ॥ २७ ॥

( भुजंगप्रयात )

रथाची निघाली असंभाव्य थाटें[9],
विराजेति[10] दोन्ही दळें येक[11] वाटें; ।
निनादेति[12] घोषें, रथें[13] चक्रवाटी[14],
पथीं वाहिनी[15] चक्रभूमीस[16] दाटी[17]. ॥ २८ ॥

संबद्ध भार मिथुळेंद्र करूनि शानें[18],
राजा निघे चमुपुढें तगटी निशानें. ।

---

१ सेंदूरवदनीं--काव्यसं; सर्वसं. २ घणाणीते--हस्तलि. ३ घंटामणि--काव्यसं; सर्वसं. ४ बंधदर्शनीं--हस्तलि. ५ गल्द्दंडस्थानीं--काव्यसं; सर्वसं. ६ मदगालित--काव्यसं; सर्वसं. ७ दानोदन--हस्तलि. ८ गजचवरडोलोश्रित--काव्यसं. सर्वसं. ९ थाटी--काव्यसं; सर्वसं. १० विराजीत--काव्यसं; सर्वसं. ११ एकवाटी--काव्यसं. सर्वसं; १२ निनादीत--काव्यसं; सर्वसं. १३ रथीं--काव्यसं; सर्वसं. १४ लोटी--काव्यसं; सर्वसं. १५ पादिनी--काव्यसं; सर्वसं. १६ पंथभूमीसि--काव्यसं; सर्वसं. १७ दाटी--काव्यसं; सर्वसं. १८ सानें--काव्यसं; सर्वसं.

शृंगारिले तुरग कोतल[1] दिव्यदेही,
भेटावया दशरथाप्रति ये विदेही. ॥ २९ ॥

( द्रुतविलंबित )

कटक[2] ऊतरलें पुरबाहिरीं
उभविले पटकूट[3] जसे गिरी, ।
नियम जानवसासि तयेस्थळीं[4]
स्थळ[5] सुशोभित रम्य वनस्थळी[6]. ॥ ३० ॥

( शिखरिणी )

समारंभें आला जनक मग भेटे दशरथा,
तयाँसंगें[7] भेटी जगतिपतिच्या येति चळथा; ।
वसिष्ठा[8] साष्टांगीं नमुनि मुनिला क्षेम दिधलें,
सभे[9] जालें तें तें कथन अनुसंधान कथिलें. ॥ ३१ ॥

( शार्दूलविक्रीडित )

भूपाळें भरत[10] स्वनेत्रकमळीं श्रीरामसा दोखिला,
सौमित्रासमरूप भासत पुढें[11] शत्रुघ्न तो रेखिला[12]. ।

---

१ कुंतल–काव्यसं; सर्वसं. २ उतरलें कटके–हस्तलि. ३ पटकूळ–हस्तलि. ४ स्थळीं–काव्यसं; सर्वसं. ५ स्थळ–काव्यसं; सर्वसं. ६ स्थळी–काव्यसं; सर्वसं. ७ तया मागें भेटी त्रिभुवनपती पितृसि तथा–काव्यसं; सर्वसं. ८ वसिष्ठासी–तेव्हां नमुनि मुनिला क्षेम दिधली–काव्यसं; सर्वसं. ९ सभे आले तीं तीं कथिन अभिधानें ति सकळीं–काव्यसं; सर्वसं. १० भरता–काव्यसं; सर्वसं. ११ असे–हस्तलि. १२ दोखिला–काव्यसं, सर्वसं.

राजा विस्मित होय तेचि समई भेटावयाकारणें,
विश्वामित्र सुमित्र राघव तिथे आले सभे पाहुणे. ॥३२॥

'विश्वामित्रमुनी!' 'शिशू कवण हे,' राजा पुसे 'सांवळे',
'कैकेपासुनि पुत्र हे दशरथा' सांगे ऋषी 'जावळे,'
'कौसल्यात्मज राम, लक्ष्मण तथा माता सुमित्रासती;
ऐसें उत्तर आइकोनि मुनिसी बोले पुन्हा भूपती. ॥३३॥

'सीता राज्य हरावयासि सिथुकें आला सुधन्वा पणें,
त्यातें मारुनि राज्य घेउनि दिल्हे म्यां बांधवाकारणें; ।
तो मद्बंधु सखा कुशध्वज वसे राजा सँकाशीपुरीं,
* कन्या दोनि तयासि, त्या असति हो बंधूद्वया अंतुरी. ॥३४॥

मांडव्या श्रुतकीर्ति येकें भरता शत्रुघ्न त्या दूसरी
सौमित्राप्रति उर्मिळा, क्षितिसुता श्रीरामचंद्रा वरी; '।
मार्कंडेय वशिष्ट कश्यप नृपापांसी सभे भीतरी,
'निर्धारा शुभलग्नवेळ,' जँनकें विज्ञापिजे यापरी. ॥ ३५ ॥

( स्रग्विणी )

उत्तरा फाल्गुनी तारका ते दिनीं,
लग्न निर्धारिलें मध्यमे यामिनीं. ।

---

१ त्याचि–काव्यसं; सर्वसं. २ विश्वामित्रमुनीश्वरा 'कवण हे'– काव्यसं; सर्वसं. ३ कैकेपासुनि--काव्यसं; सर्वसं. ४ ऋषी--हस्तलि ५ तथा--हस्तलि. ६ ऋषिचें--हस्तलि. ७ श्रीपूर्णकाशीपुरी--हस्तलि * ही ओळ हस्तलिखितांत गळली आहे. ८ एकि--काव्यसं; सर्वसं. ९ या--काव्यसं सर्वसं. १० जनका--काव्यसं; सर्वसं.

सूर्यवंशावळी श्रीवसिष्टें मुखें,
वर्णिली आइका भूपती सन्मुखें. ॥ ३६ ॥

( शार्दूलविक्रीडित )

'सूर्यापासुनियां मनु प्रथम जो[1] इक्ष्वाकु सर्वोदिजे,[2]
पृथ्वी हे पृथुपासुनी तदुपरी उत्तानपादादि जे, ।
तत्पुत्र ध्रुव धुंधुमार परिसा राजे रवींवंशिचे,
मांधाता मुचकुंद पूर्वज हरिश्चंद्रादि या देशिचे. ॥३७॥

( शिखरिणी )

पुढें जाला[3] रुक्मांगद कुमर धर्मांगद तथा,
[4]प्रतापी अव्रर्धी मग सगर जाणा भगिरथा, ।
ककुत्स्था[5]पासूनि दिलिपनृपतीचा सुत रघू,
अजाचा हा पाहा दशरथ महाख्या[6]त अलघू. ॥ ३८॥

[7]अहिल्येचा ज्येष्ठात्मज मुनि शतानंद विनवी,
उपाध्या तो सांगे जनककुळविस्तारपदवी; ।
निमी राजा त्यांचा[8] मिथुलपुरविख्याताचि महा,
विदेही वैदेहीजनक अभिमानी जनक हा.' ॥३९॥

---

१ तो--काव्यसं; सर्वसं. २ त्या बोलिजे--काव्यसं; सर्वसं. ३ झाला--काव्यसं; सर्वसं. ४ प्रतापें--हस्तलि. ५ ककुस्था -काव्यसं; सर्वसं. ६ महारव्याति--हस्तलि. ७ अहिल्याचा-- हस्तलि. ८ त्याच्या--काव्यसं; सर्वसं.

( शार्दूलविक्रीडित )

ते काळीं भरतासि[1] मातुळ सखा आला असे पाहणें,
लग्ना राहविलें तया दशरथें यूधाजिताकारणें[2]; ।
आले गोत्रज[3] इष्ट मित्र समई लग्नासि पाचारिले,
केलों[4] गौरव त्यासि मंटप दिल्हे, स्छानांतरीं राहिले. ।४०॥

केला लग्नविचार सार जनकें घेऊनि आज्ञा फुलें,
आलासे निजमंडपासि, मिरवी सौभाग्य[5] तें आपुलें; ।
सीता भूमिसुता स्वयंवरकथा श्लोकार्थ वाचा[6] निका,
वर्णी विठ्ठल सर्ग षष्टम[7], पुढें विद्वांस हो आइका. ॥४१॥

* इति श्रीजानकीस्वयंवर विठ्ठलदासकविकृतौ लग्न-
निर्धारनाम षष्टमः सर्गः ॥ ६ ॥

---

१ भरता प्रमातुळ--हस्तलि. २ युधाजिताकारणें--हस्तलि. ३ गोत्रिज--हस्तलि. ४ केले--काव्यसं; सर्वसं. ५ सौभाग्यता-हस्तलि. ६ वाची-हस्तलि. ७ सप्तम-काव्यसं; सर्वसं. * असा उल्लेख काव्यसं. व सर्वसं. प्रतींत नाहीं.

# सर्ग सातवा

( शार्दूलविक्रीडित )

पूर्वी वेदवती, तया उपरि ते पद्मा धरानंदिनी;
सीता श्रीमिथुळाधिराजतनया[1] साक्षात मंदाकिनी[2]. ।
कालिंदी तरि[3] ऊर्मिळा, जनक तो क्षेत्र प्रयागोपमा,
दोंमध्यें कविची सरस्वती वसे योगें[4] त्रिवेणीसमा. ॥ १ ॥

( वसंततिलका )

पुण्याहवाचन करी नृप वेदमंत्रें[5]
तैसांचि तो विधि किजे अजराजपुत्रें, ।
दोंमंडपीं हळदि लाविली वोहरातें,
गर्जेति मंगळ तुरें सुख निर्जरातें. ॥ २ ॥

( शार्दूलविक्रीडित )

नांदीश्राद्धविधान देवक नृपें संस्छापिलें[6] मंटपीं[7].
* गोदानें वसनें धनें जनक दे रत्नें द्विजां साक्षपीं ।
त्यापेक्षां[8] धन वेचिलें दशरथें उत्साह आरंभिला,
जेथें श्रीरघुवीर तारक परब्रह्म[9] स्वयें वोळला[10]. ॥ ३ ॥

१ श्रीमिथिलादिराजतनया–हस्तलि. २ मंदाकिनीसंगमी–हस्तलि. ३ तिरिं–काव्यसं; सर्वसं. ४ योगी--हस्तलि. ५ सूत्रें--हस्तलि. ६ संस्थापिलें--काव्यसं; सर्वसं. ७ मंडपीं--काव्यसं; सर्वसं. * ही ओळ हस्तलि. प्रतीत गळली आहे, ८ यापेक्षां-हस्तलि. ९ भवाब्रम्हा--काव्यसं; सर्वसं. १० बोलिला--काव्यसं; सर्वसं.

( मालिनी )

तदुपरि जनकाची पट्टराणी सुमेधा
रघुपतिपदपद्मीं तीस अत्यंत मेधा;
मिरवत वनलक्ष्मी जाय जैसी निकुंजा,
रुखवत गं[1]जरेंसी सांग सीमंतपूजा. ॥ ४ ॥

( वसंततिलका )

अन्यांगनांसि [2]वहनें दि[2]धलीं अपारें,
यानासमान शिबिका युत राजभारें, ।
शोभायमान जनकप्रमदा निघाली
गर्जेति माट[3] पटु[4] चाटु[5] अचाट[6] शाली; ॥५॥

( शार्दूलविक्रीडित )

उल्हासें वरमंडपा[7] नृप निघे संगें सुमेधा सती,
आले बांधव सोयरे दशरथें सन्मान केला अती; ।
नाना ते पटकूट[8] मंटप सभे बैसावया आसनें,
[9]तेथें श्रेष्ठ वरिष्ट विष्टरपदीं, होतीं पुढें गायनें. ॥६॥

[ स्रग्धरा ]

चारी चौरंग चौघां जनक नृप करी रामसौमित्रपूजा
अर्ची तैसाचि कुश[10]ध्वज वर भरता युक्त शत्रुघ्न दूजा, ।

---

१ गजरानें- हस्तलि. २ दिधली वहनें-काव्यसं; सर्वसं. ३ माटु-काव्यसं; सर्वसं. ४ चटु-हस्तलि. ५ चाठ -हस्तलि ६ अचाटु-काव्यसं; सर्वसं. ७ वरमंडपीं काव्यसं; सर्वसं. ८ पटकूळ-हस्तलि. ९ तेथें श्रेष्ठ वसिष्ट कौशिक गुरू होती पुढें गायनें--काव्यसं; सर्वसं. १० कौश--हस्तलि.

रत्नाळंकार वस्त्रें विधियुत दिधलीं, पूजिलया दिव्यमूर्ती
वेदीं ऋ[1]ग्वेद तैसा रघुविर, सुहृदांमाजि सप्रेम कीर्ती[2]. ॥ ७ ॥

( धोदक )

तेलवणादिक भोजन नेलें, तें जनकें सुहृदार्पण केलें, ।
माँ[3]वळला दिन याँ[4]मिनि लग्ना चालविले वर सत्वर लग्ना. ॥८॥

( मालिनी )

मग दशरथराजा पुत्रलग्ना निघाला,
द्विजमुनिजनसंगें वाहनारूढ जालाँ[5]. ।
चपल तुरगयानीं नोवरे शोभतातीं,
बहु गजर तुरांचे भाट वाखाणताती. ॥ ९ ॥

( वसंततिलका )

टेंभे[6] हिलाल दिवट्या शरदिंदुज्योती
दारू नळे तुबक अंबुदनाद होती; ।
पंथीं पुरौकस निरीक्षिति सर्व पाहीं
चालावयासि धरणीप्रति पैसँ[7] नाहीं. ॥ १० ॥

---

१ रुग्वेद–हस्तलि. २ मूर्ति–हस्तलि. ३ मालवला–हस्तलि. ४ पद्मिणि–काव्यसं; सर्वसं. ५ झाला–काव्यसं; सर्वसं. ६ पेटे–काव्यसं; सर्वसं. ७ मार्ग–काव्यसं; सर्वसं.

[ शार्दूलविक्रीडित ]

वेश्या आणि पतिव्रता त्रिभुवनीं रूपागळी पिंगळा,
ते नाचे रघुनायकापुढति[1] हो ! कुंदेंदु[2] तो चांगला; ।
संन्याशाप्रति लागतां[3] मग ढका दंडें[4] तया हाणिती;
'आम्हांलागुनि कां विटाळ करितां,' त्या मस्करीं[5] हासतीं ।११।

नाहीं वृत्ति निमग्न तोंवरि कदा संन्यास घेवों[6] नये,
कर्मीं जोंवरि बद्ध तोंवरि कसें सायुज्य हातासि ये.[7] ।
मेल्या मुक्ति घडेल काय न घडे या संशयीं जो पडे
दोषादोष विटाळ त्याप्रति, कदां श्रीराम ना सांपडे. ॥१२॥

( वंसततिलका )

मिरवत मग आले मंडपातें निवाडें,
तंव नृपवरदासीं लिप्त केलीं कवाडें. ।
उचित बहु तयातें वोपिलें,[8] प्रेम दाटे
प्रमुदित मग तेंहीं[9] मुक्त केलीं कपाटें. ॥ १३ ॥

[ भुजंगप्रयात ]

वऱ्हाडी सभामंटपामाजि[10] आले,
विचित्रासनीं बैसते सर्व जाले,[11]

---

१ रघुनायका हरिपुढें--हस्तलि. २ इंदिंदिरे--हस्तलि. ३ चालतां--हस्तलि. ४ दंडा-हस्तलि. ५ मस्कऱ्या--काव्यसं; सर्वसं; ६ घेऊं--हस्तलि. ७ कर्मबंध विरुद्ध तोंवरि कसी सायुज्य हातास ये--हस्तलि. ८ दीधलें--काव्यसं. ९ त्यांहीं-काव्यसं; सर्वसं. १० सभामंडपीं सर्व--काव्यसं; सर्वसं. ११ झाले--काव्यसं; सर्वसं.

पुढें नोवऱ्या आणिल्या मंटपासी,
अयोध्यापती सांग पूजी तयांसी. ॥ १४॥

( वसंततिलका )

दशरथ फळ वस्त्रें भूषणें दिव्य वाहे
जनक मग वरातें पूजिता होय, पाहें; ।
विधियुत मधुपर्कालागिं संपादिलेसें
उभयकुळ उपाध्ये त्यांसि संतोषिलेसें.[1] ॥ १५ ॥

( शार्दूलविक्रीडित )

लग्नाची घटिका [2]प्रतिष्ठितजळीं आरंभिली तांतडी
वस्त्रें नेसविलीं चहूं वधुवरा संलग्न आली घडी. ।
मध्यें अंतपटासनादि[3] गणिकीं दोहींकडे काढिलीं
होती मंगळ मंत्र लग्नसमयीं तूष्णी सभा राहिली. ॥१६

मंगळाष्टकें

मत्तेभानन षट्पदाकुलगलद्गंडांत दानोदकें,
* हस्तीं पाश वराभयांकुशपदा, संहृष्ट जो मोदकें; ।
कांची वस्त्र कटीं, त्रिनेत्र निडळीं[4] चंद्रार्ध[5], कंठीं फणी,
ऐसा मंगलमूर्ति तो सुरगणीं कुर्यात् सदा मंगलम्. ॥१७॥

---

१ संतोषिलेशें–हस्तलि. २ प्रातिष्ठिलि—काव्यसं; सर्वसं. ३ अंत्रपटासिनादि गणिका--हस्तलि. * ही ओळ हस्तलि. प्रतींत गळली आहे. ४ निढळीं–काव्यसं; सर्वसं. ५ चंद्रार्क--काव्यसं; सर्वसं.

वैकुंठीं उपविष्ट रत्नसदनीं सिंहासनीं श्रीहरी
कंठीं कौस्तुभ, आयुधें चहुकरीं, तेणें रिपू संहरी[1], ।
[2]रत्नज्योति विभूषणें, स्तुतिकथा गंधर्व आलापनें,
गाँती[3] नारद तुंबरादि लपनें, कुर्यात् सदा मंगलम्. ॥ १८ ॥

वामांगीं नगजा, कुमार सहजा वामान्य[4]भागीं दुजा
आस्यें पंच, गजाजिनांबरें[5] तिजा, दिग्गुप्त[6] दाँहा[7] भुजा; ।
गंगा मूर्ध्नि[8], अजानुबाहु सहजानंदें पुरारी भजा,
भाळीं नक्तप, जाश्वनीळ मनुजा कुर्यात् सदा मंगलम्. ॥१९॥

ज्याचा स्यंदन येकचक्र, भुजगीं वेष्टीत रज्जू दृढें[10]
सप्ताश्वीं युत, सारथी अरुण तो, गंधर्व गाती पुढें. ।
छायेसीं सहवर्तमान असिजे श्रीसूर्यनारायणें,
कीजे स्वस्ति[11] वधूवराप्रति, म्हणे कुर्यात् सदा मंगलम्. ॥ २० ॥

देवर्षी सनकः सनंदन पिते[12] गंधर्व हाहा हुहू,
नाना किन्नर यक्ष किंपुरुष ते रक्षोगणादी बहू, ।
सद्विद्याधर गुह्यकाप्सर मुनी पैशाचें[13] भूमंडळीं,
ब्रह्मा विष्णु महेश शेष[14] सकळीं कुर्यात् सदा मंगलम्. ॥२१॥ *

---

१ संव्हरी-हस्तलि. २ रत्नें द्योतानि भूषणें-हस्तलि. ३ लक्ष्मीयुक्त मुरारि तो वधुवरां-काव्यसं; सर्वसं. ४ वामन्य-हस्तलि. ५ गजासिनांबर-हस्तलि. ६ दिग्तृप्ति-हस्तलि. ७ दाही--काव्यसं; सर्वसं. ८ मौनि--काव्यसं. ९ हरा त्या--काव्यसं; सर्वसं. १० पुढें--हस्तलि. ११ स्वस्ठ-हस्तलि. १२ पिता-हस्तलि. १३ ऐसाचि-हस्तलि. १४ देव--काव्यसं; सर्वसं * हा श्लोक काव्यसं. व सर्वसं. प्रतींत २२ वा दिला आहे.

कौमारी कमलालया[1] कमलजा कामेश्वरी कालिका[2],
काली कौमुदि काळरात्रि कमळा कात्यायनी कौळिका; ।
कल्याणी कलिकल्मषापहरिणी कारुण्यकल्लोलिनी,
वंदी विठ्ठल सत्कवी प्रतिदिनीं, कुर्यात् सदा मंगलम्. ॥२२॥

आतां सावध सावधान घटिका संपूर्ण आली भरूं,
भावें सद्गुरुतें भजा, गलबला कोण्ही नका हो! करूं, ।
चिंतावें कुळदेवतांसि[3] हृदयीं[4] येकाग्रचित्तें बसा,
वेदीच्या कलशांसि[5] सादर असा, कुर्यात्[6] सदा मंगलम्. ॥२३॥

लक्ष्मीकांतपदारविंदभजनीं निष्ठा असों[7] द्या बरी,
पूर्णांशें[8] घडि सावधान समई राहोत वाजंतरी, ।
आधीं नोवरि अक्षता वरशिरीं[9] घालनि रामा वरू[10],
सोडा अंत्रपटा म्हणे कुळगुरू, कुर्यात् सदा मंगलम्. ॥२४॥

ॐ[11] पुण्यें चवघीं वधू चहुं वरां दिव्याक्षता घालिती
श्रीरामासहवर्तमान नवरे जोयांसि[12] वीराजती; ।
वाद्यें वाजति, विप्र मंत्र म्हणती, प्राचीमुखी[13] नोवरे,
चारी पश्चिमादिग्मुखी[14] नवरिया, ब्रह्मांड हर्षें भरे. ॥२५॥

---

१ कमलात्मजा–काव्यसं; सर्वसं. २ कालिमा–हस्तलि. ३ कुळदेवतेसि--काव्यसं; सर्वसं. ४ हृदयें–काव्यसं; सर्वसं. ५ कळसासि–हस्तलि; ६ कुर्वंतु काव्यसं; सर्वसं. ७ वो–काव्यसं; सर्वसं. ८ झाली पूर्ण घडी, वसानसमयीं–काव्यसं; सर्वसं. ९ वरि शिरीं–काव्यसं; सर्वसं. १० वरी--हस्तलि. ११ ओं पुण्या म्हणुनी चहूं वधुवरीं--काव्यसं; सर्वसं १२ वेद्याप्रती या रिती-- हस्तलि. १३ प्राचीन्मुखें--हस्तलि. १४ पाश्चिमादिग्मुखें–हस्तलि.

त्रीसूत्रीं सुतंवोनि[1] सूत्रवलयें त्या वोहरा बांधिलीं[2],
आंबा[3] सिंपुनि[4] आणिलीं वधुवरें, वेदीवरी बैसलीं, ।
पैं पाणिग्रहणादि सप्तपदिचे होमांसि[5] संपादिलें,
वामांगीं मग नोवऱ्या बसविल्या, द्रव्य[6] द्विजा वाटिलें. ॥२६॥

( द्वादशरासोपर )[7]

नौतु आदिस, अंतकेतनतनु, युग्मध्वजप्रीतिमान्,
तो एकादशकर्णरावणरिपुः दिःकुंडलें दीप्तिमान्; ।
चौपृष्टीसम अष्टकीटनवमें केलें त्रिधा पंचमें,
भूषष्टीयुत वेदिकेवरि तिजें शोभे, नसे सप्तमें. ॥ २७ ॥

श्रीरामें जनकाप्रती विनविलें ' आम्हांसि आज्ञा दिजे, '
प्रार्थी भूप ' चतुर्थहोम करणें , ' रामें पुन्हा बोलिजे, ।
' आहे कार्य विशेष याहुनि पुढें येथे नव्हे राहणें,'
बोले भूभुज[8], ' भोजनोत्तर तुम्हीं प्रस्थान[9] कीजे म्हणे. ' ॥२८॥

काश्मीरोदक सारिलें सकळिका[10] संपादिलीं भोजनें[11].
रांगोळ्या मणिपर्यळी अडणियां, विस्तीर्ण पीठासनें; ।
राजे पंक्तिस बैसले द्विज मुनी, वाढी सुमेधा सती,
अष्टौ[12] सिद्धिहि वाढिति नवजणी दीपांसि ओवाळती. ॥२९॥

---

१ सुतऊन–हस्तलि २ बांधली--हस्तलि. ३ अंबा--हस्तलि. ४ [illegible]--काव्यसं; सर्वसं. ५ होमादि–हस्तलि. ६ द्रव्यें–हस्तलि. ७ राशी द्वादश त्या परा नतु अदी युग्मध्वज प्रीतिमान् । तें एकादशपर्ण कुंडल शुभा फांके तदा दीप्तिमान् ॥ चौषष्टीसम अष्टमी नव मतें केळी त्रिधा पंचमें । भूषष्टी युतवे विवेकरित (?) ते शोभे नसे सप्तमे. ॥–काव्यसं; सर्वसं. ८ भूपति--काव्यसं; सर्वसं. ९ प्रस्थान--काव्यसं; सर्वसं. १० सकळिकीं– काव्यसं; सर्वसं. ११ मज्जनें--काव्यसं; सर्वसं. १२ आंठां राधिति वागती नवजणी दीपावळी राजिती--हस्तलि.

शाखा वाढिति सैंधवादिक मिरे विस्तारिलीं रायतीं,
सांबारीं परमान्न भात भरिला त्या वोगराळ्यां प्रती;
पक्कान्नादि वरान्न पापड वडे क्षीरी मधू शर्करा,
सद्यस्तप्त घृतें पयोदधि मधू कोशिंबिरी निर्भरा. ॥३०॥

दिव्यान्नें घृतपाचितें बहुविधें संपूर्ण विस्तारिलीं,
स्वादिष्टें उदकें भरून कळशीं, आपोशनें सारिलीं, ।
राजर्षी द्विज जेविती प्रतिपदीं तारतम्य राजा करी,
जाले तृप्त समस्त त्या उपरि ते आले सभेभीतरीं. ॥३१॥

( वसंततिलका )

गंधाक्षता सुमन चंदन धूप दावी
अर्पी त्रयोदशगुणी नवरंग लावी.
संपादिलें सकल अरणिपूजनातें,
राजा अजात्मज निघे पुटभेदनातें. ॥३२॥

[ शिखरिणी ]

गजस्कंधीं चारी नवचवरडोलीं वधुवरें,
पुंढें वाद्यें, मार्गीं अपशकुन जाला अवसरें, ।

---

१ वोगराळा सवीं--हस्तलि. २ क्षीरें--हस्तलि. ३ संतृप्ताब्ज दर्भपयोळ्चषकीं कोशिंबिरी निर्भरा-- हस्तलि. ४ सेविती--हस्तलि. ५ झाले--काव्यसं; सर्वसं. ६ या--काव्यसं; सर्वसं. ७ भूप--काव्यसं; सर्वसं. ८ त्रयोदशगुणे--हस्तलि. ९ ढाली--हस्तलि. १० पुढें वाद्यें नाना अपशकुन झाले अवसरें--काव्यसं; सर्वसं.

तदा[1] विश्वामित्राप्रति दशरथें चिन्ह पुसिलें,
भविष्याचें प्रत्योत्तरें[2] मुनिवरें त्यांसि कथिलें[3]. ॥३३॥

[ शार्दूलविक्रीडित ]

हातीं कार्मुक सज्ज[4], वेद वदनीं, ठीतूण पृष्ठीवरी,
तो[5] ' शापादपि ' ही ' शरादपि ' तपी, क्षत्र्यांतरी केसरी, ।
भस्मोध्दूलित मौलिं[6], लांछन उरीं रुद्राक्षमाळा[7] धरी,
माजिष्टांबर ब्रह्मदंड रसना व्याघ्राजिनें[8] उत्तरीं. ॥३४॥

( स्वागता )

राघवें धनुषदंड भंगिला, भार्गवें परम कोप मानिला. ।
पातला रघुविरा जिणावया, राघवार्हित पावले भया. ॥३५॥

( शिखरिणी )

म्हणे, ' काकुंस्था ! रे[10] ' तनुनयनें[11]वेळा भुजबळीं
धरित्री निक्षत्री करुनि[12] विजयी मी द्विजकुळीं. ।
प्रतापें म्या केलें असुर[13]रुधिरें तर्पण रणीं
तुसीं झुंजों[14] आलों शिवधनुषभंगप्रकरणीं. ॥ ३६ ॥

---

१ तया--काव्यसं; सर्वसं; २ प्रत्युत्तर--काव्यसं; सर्वसं. ३ दिधले--काव्यसं; सर्वसं. ४ वेदशास्त्र वदनीं--काव्यसं; अन्यपाठ. ५ ही ओळ हस्तलि. प्रतींत गळली आहे. ६ मौंज- हस्तलि. ७ आंगीं--हस्तलि. ८ व्याघ्रांजनें--हस्तलि. ९ मानिती--काव्यसं; सर्वसं. १० रे काकुस्छा--हस्तलि. ११ नयनतनुवेळा काव्यसं; सर्वसं. १२ रिपुदळण केलें रिपुकुळें--हस्तलि. १३ विमत--हस्तलि. १४ झुंजा--हस्तलि.

[ शार्दूलविक्रीडित ]

माळीं विस्तृत[1] कंकपिच्छ शर ते सोडी, भुजातें तुळी,
बाणें बाण निवारिले रघुविरें घालूनि गोधांगुळी; ।
देखे विक्रम आगळा मग म्हणे, ' तूं कोण रे ! झूंजसी[2] ? '
त्यातें उत्तर दे रघूत्तम वदे, ' सर्वज्ञ तूं जाणसी. ॥३७॥

क्षत्री मी रविवंशिचा, कुळगुरू आम्हां वशिष्ठा असे,
दिव्यास्त्रं उपदेशिलीं मुनिवरें श्रीकौशिकें तापसें. ।
आम्हीं ब्राह्मणभक्त शस्त्र न धरूं, आज्ञा[3] गुरूची असे,
मूर्ध्नी छेदि ' म्हणोनि मस्तक पुढें श्रीराम लोटीतसे.॥३८॥

' स्वामीसीं वदतो यथार्थ न घडे संग्रामवार्ता कदा,
देवा ! तूंजपुढें हिणें नृपकुळें दीनासमानें सदा. ।
आम्हां येकगुणीं[4] धनुर्बळ असे ' बोले गिरा कोंवळी,
' स्वामीचें बळ आगळें नवगुणी[5] यज्ञोपवीतें बळी. ' ॥३९॥

( शिखरिणी )

रिता देखे भाता, धनुष नुसतें पैं लडबडी,
न चाले रामासीं मग फरशपाणी[6] हडबडी, ।
म्हणे ' आतां मोडी ' म्हणुनि दिधलें वैष्णव धनु,
' बळें प्रौढी[7] दावी भज[8] समरभूमीप्रति ननू. ' ॥४०॥

---

१ विश्रुत–हस्तलि. २ जूझसी--हस्तलि. ३ आम्रा–हस्तालि. ४ एकगुणें--काव्यसं; सर्वसं. ५ नवगुणें--काव्यसं; सर्वसं. ६ परशुपाणी-काव्यसं; सर्वसं. ७ बळप्रौढी–काव्यसं; सर्वसं. ८ मग--काव्यसं; सर्वसं.

धनू[1] भंगावें तों कर फरशरामें[2] गवासेला,
समाधानें रामें हृदयकमळीं राम धरिला.।
म्हणे, 'घेई रामा उचित दिधलें वैष्णव धनु'
दिल्ही आज्ञा[3] गेले मिरवत अयोध्येप्रति नमू.॥४१॥

( शार्दूलविक्रीडित )

वस्त्रें कापडिलीं दुकानमखरें, उंचाविलीं[4] तोरणें,
स्वानंदें गुढिया ध्वजा उभविल्या दृष्टी फिटे पारणें.।
चौबारें[5] बिदि रुंद हाट[6]वटिया वृंदावनीं[7] देवळीं[8]
शास्त्रें वेद पुराण गायन कथा होती अयोध्यास्थळीं[9].॥४२॥

( शिखरिणी )

विराजे[10] श्रृंगारे अमृतनगरी पुण्यकरणी,
सडे काश्मीराचे बहु उधळिले रंग धरणीं.।
महाद्वारीं मूर्ती कलश जलपूर्णस्थित[11] बरे,
समारंभें[12] गेले मिरवत गृहा दिव्य नवरे.॥४३॥

---

१ धनुर्भंगावें–काव्यसं; सर्वसं. २ परशुरामें--काव्यसं; सर्वसं. ३ आम्हा–हस्तालि. ४ उंचावली--काव्यसं; सर्वसं. ५ चौहाटी--काव्यसं; सर्वसं. ६ हाट-वटियीं--काव्यसं; सर्वसं. ७ वृंदावना--हस्तालि. ८ देवुळीं–काव्यसं; सर्वसं. ९ अयोध्येस्थळीं--काव्यसं; सर्वसं. १० काव्यसं; व सर्वसं, प्रतींत या श्लोकाच्या पहिल्या दोन ओळींच्या क्रमांत व्यत्यास झाला आहे. ११ जलपूर्णस्थिति--काव्यसं; सर्वसं. १२ दधी दूर्वांकूरीं भरुनि वरुते कुंभ दुसरे ॥–काव्यसं; सर्वसं.

सुमित्रा कौसल्या भरत[1]जननी हास्यवे[2]दनें
महालक्ष्मी केली, गृ[3]हभरुनि घेती सुनयनें; ।
सुना चौघी, चारीं सुत, जवळि आनंदभरिता,
द्विजां देती दानें, कविवर करी पूर्ण चरिता. ॥ ४४ ॥

( शार्दूलविक्रीडित )

शत्रुघ्ना भरतासि मातुळगृहा युद्धा[4]जितें नेइजे
भेदायासि पितामहासि नगरा त्या कैकया जाइजे; ।
रामा राज्य समर्पिलें दशरथें वृद्धामतें योजिलें[5],
वाल्मीकोदित बाळकांड इतुकें रामायणीं वाचिलें. ॥४५॥ *

ऋग्वेदोत्तम आश्वलायन म[6]हाशाखा कवीची असे,
वस्तीचें स्थळ बीड [7]त्या तळवटीं गौरीपुरीं पैं वसे; ।
जाणा कौशिक गोत्र नित्य भजणें श्रीराघवा[8]कारणें,
सीतेचें रचिलें स्वयंवर, जना कल्याण हो ! मी म्हणें.।४६।

---

१ भरथ–हस्तलि. २ हास्यवदना–काव्यसं; सर्वसं. ३ गृह भरुनियां सूख नयना–काव्यसं; सर्वसं. ४ युद्धाजिता–हस्तलि. ५ योजिजें–काव्यसं; सर्वसं. * शत्रुघ्ना–भरतासि मातुळ गृहीं युद्धाजितें नेइजे । रामा राज्य समर्पिलें दशरथें वृध्दामतें योजिजे; ॥ वाल्मीकिकृत ' बालकांड ' इतुकें रामयाणीं वाचिलें । त्याचा अर्थ पहा विचारुनि निका श्लोकार्थ वाखाणिलें. ॥ (४५)– काव्यसं; सर्वसं ६ मुनी–हस्तलि. ७ त्यासि– काव्यसं; सर्वसं. ८ श्रीविठ्ठलकारणें–हस्तलि.

स्वस्ति श्रीनृपशालिवाहन शके नव्याण्णवू पंधरा,
अब्दीं पिंगळ चैत्र शुद्ध नवमी श्लोकांक संख्या धरा;।
त्रीपट्कें[1] त्रय सर्ग सप्त रचना संपूर्ण जाली कथा,
वक्ता सत्कविराज विठ्ठल म्हणे दोषें[2] क्षमा नान्यथा. ॥४७॥

इति श्रीमज्जानकीस्वयंवर विठ्ठलदासकविकृतौ श्रीराम अयोध्याप्रवेशो नाम सप्तमः सर्गः ॥७॥ समाप्तोऽयं.

॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

---

१ शिवनेत्रश्लोक--काव्यसं; सर्वसं. २ दोषा--काव्यसं; सर्वसं. * असा शेवटीं उल्लेख काव्यसं; व सर्वसं. प्रतींत नाहीं.

# शुद्धिपत्र

मूळांतील श्लोकावर वृत्तनामें देतांना हस्तलिखित प्रतीवर विसंबून राहिल्यामुळें, कांहीं श्लोकांचीं वृत्तनामें चुकीचीं पडलीं आहेत, तीं खालीं दिल्याप्रमाणें शुद्ध करून घ्यावीं: —

| सर्ग | श्लोक | चुकीचें वृत्तनाम | शुद्ध वृत्तनाम |
|---|---|---|---|
| १ | ४२ | इंद्रवज्रा. | इंद्रवंशा |
| २ | ३६ | उपजाति | इंद्रवज्रा |
| २ | ४३ | ,, | ,, |
| २ | ५१ | शार्दूलविक्रीडित | स्रग्धरा |
| २ | ५२ | × | शार्दूलविक्रीडित |
| ३ | ११ व १२ | स्रग्धरा | ,, |
| ३ | १३ | × | वसंततिलका |
| ३ | २४ | शार्दूलविक्रीडित | स्रग्धरा |
| ३ | २५ | × | शार्दूलविक्रीडित |
| ३ | २९–३० | वसंततिलका | भुजंगप्रयात |
| ३ | ३६ | ,, | मालिनी |
| ३ | ४७ | शार्दूलविक्रीडित | स्रग्धरा |
| ४ | ३६ | उपजाति | इंद्रवज्रा |
| ५ | ३३ | शार्दूलविक्रीडित | स्रग्धरा |
| ७ | १३ | वसंततिलका | मालिनी |
| ७ | १५ | ,, | ,, |

विठ्ठल बीडकरकृत

# सीता स्वयंवर

टीपा व स्पष्टीकरण.

# सर्ग पहिला



आपला ग्रंथ निर्विघ्नपणें सिद्धीस जावा यासाठीं कवि पहिल्या दोन श्लोकांत श्रीगणपतीस, तिसऱ्या श्लोकांत श्रीजगदंबेस व चवथ्या श्लोकांत श्रीगुरूस वंदन करीत आहे. विघ्नविघातप्रीत्यर्थ समुचित इष्टदेवतेचें स्तवन करण्याची मोठमोठ्या कवींची पूर्वापार पद्धतीच येथें विठ्ठलानें अवलंबिली असून, 'आशीर्नमस्क्रियावस्तुनिर्देशो वाऽपि तन्मुखम्' या ग्रंथप्रारंभाचा संप्रदाय त्यानेंही येथें चालवून, संस्कृत महाकवींचें अनुकरण केलें आहे. **श्लोक १. श्रीगणनायक**—गणपतीच्या हाताखालीं कांहीं गण अथवा क्षुद्रदेवता आहेत, त्यांचा तो नायक आहे म्हणून त्याला गणनायक म्हटलें आहे. **सिद्धिविनायक**—अणिमा, लघिमा इत्यादि ज्या आठ महासिद्धि किंवा दैवी शक्ती आहेत, त्यांचा देखील गणपती हा नायक आहे, म्हणून त्याला सिद्धिविनायक म्हटलें आहे. **स्फूर्तिवरप्रद**—स्फूर्ति व वर देणारा. गजानन हा विद्येचा पुरस्कर्ता असल्यामुळें, कवींना काव्य रचण्यास तो स्फूर्ति देतो, तसाच तो आपल्या भक्तांना वरही देणारा आहे. **जान्हविचा ह्रद**—गंगेचा डोह. गंगा नदीचा डोह जसा शुभ्र व विस्तृत आहे, तसाच गणपतिदेखील गौरवर्ण व पुष्ट असल्यानें त्याला गंगेच्या डोहाची उपमा दिली आहे. **सितच्छद इ.**—सितच्छद=हंस. हंसासारख्या शुभ्र कांतीनें जो परिपूर्ण आहे. गणपतीच्या गौरवर्ण शरीराचेंच हें वर्णन आहे. **तुंदिल**—विस्तृत उदराचा, मोठ्या पोटाचा. **शुंड अखंडित इ०** सोंडेनें अविच्छिन्नपणें दंडिले आहेत दंदी, वैरी ज्यानें असा. **दंदी**—वैरी, वादी, भांडखोर. ज्यानें आपल्या व भक्तांच्या वैऱ्यांना आपल्या सोंडेनें सतत झोडपून काढलें आहे असा. **कोकनदासन**=तांबडें कमल हेंच ज्याचें आसन आहे असा.

**मूषकवाहन**–उंदीर हें ज्याचें वाहन आहे असा. **विश्वविमोहन**–जगाला भुलविणारा. **श्लोक २.** विठ्ठल कवि येथें रामाची कीर्ति गाण्यासाटीं गणपतीजवळ बुद्धि मागत आहे. ‘बुद्धि दे रघुनायका’ अशी रामदास ज्याप्रमाणें मागणी करतात, तसाच हा प्रकार आहे. **पूर्तीं**–पुरती, पुरेशी. **ते मी इ०**—रामाची सुखदायक कीर्ति मी माझ्या गाण्यांत गाईन. ज्या कीर्तीची साक्ष पुराणांतरीं येते, ती मी गातांना माझ्या वाणींत अद्‌भुतरस आणीन, रामकथा मी अद्‌भुतरसांत वर्णन करीन. **बोधीं इ०** - कवि गणपतीला म्हणतो, ‘तूं लोकांच्या मनाची समजूत घाल. गणपति हा बुद्धीचा अधिष्ठाता असल्यानें, लोकांच्या बुद्धीला तोच प्रेरणा देणारा आहे असा अर्थ. **तु वदनाचें**– तूं कवीच्या मुखाला व काव्यरसांना अलंकृत करणारा आहेस. गणपति हा कविवाणीला स्फूर्ति देणारा असल्यानें तो कवीच्या मुखाचा अलंकारच होय. तसेंच गणपतीच्या प्रसादानेंच काव्यात रसनिष्पत्ति होत असल्यानें, सर्व रसांचाही तो अलंकार आहे. **विघ्नें इ.**—म्हणून कवि म्हणतो कीं, ‘सर्व विघ्नें हरण करून या अवतारांत मला तार,’ व हें लक्षांत ठेव. **अवधारणें** – ध्यानांत, स्मरणांत ठेवणें. **श्लोक ३**—कवि आतां जगदंबेला नमन करतो. **प्रणामित**—नमित आहे. **कल्पवल्ली इ०**- इच्छिलेली वस्तु देणाऱ्या वेलींचा समुदाय. **कदंब**– समुदाय. जगदंबा ही भक्ताला इच्छिलेली वस्तु देणारी असल्यानें, तिला कल्पवल्लीचा समूह म्हटलें आहे. **विसंबे**— विसंबणें, विसरणें. कवि तुला विसरत नाहीं. **झळंबे**–बुडतें, चिकटतें. जगदंबेबद्दलचें प्रेम कवीच्या मनांत उत्पन्न होतें. **तिंबे**—तिंबणें–ओली होणें. पहा–“राउळ आपुली वस्त्रें तींबु नेदीतीची–” गोविंदप्रभुचरित्र–२११. ‘हे अंबे! माझ्यावर जर तुझी कृपादृष्टि आर्द्र झाली, तर तात्काळ रसनिष्पत्ति होऊन माझें काव्यसाहित्य श्रोत्यांच्या मनावर ठसेल.’ येथें ‘ब’ या अक्षरानें अनुप्रास साधला आहे. **श्लोक ४.** या श्लोकात आपल्या गुरूला वंदन करतांना कवि त्याचें वर्णन करीत आहे.

**रत्नपीठभुवनीं**–रत्नाचें पीठ जेथें आहे, अशा वैभवसंपन्न भुवनांत. **चिद्रत्न** इ०–ज्ञानरूपीं रत्नाच्या सिंहासनावर विराजमान झालेले. श्रीगुरु हे ज्ञानसंपन्न असल्यामुळें, त्यांना ज्ञानाचेंच अधिष्ठान असणार. चिद्रत्न-ज्ञानरत्न. पहा–' आणि मुखांतरीं आइकिजे । ऐसें कायिसें हें ओझें । मी चिद्रत्न तुझें । असतां हातीं ॥–ज्ञानेश्वरी १८।२८२. **हस्ताब्जीं** इ०-ज्याचीं दोन करकमलें अनुक्रमें वर देणारीं व अभय देणारीं आहेत. जो मुक्त-हस्तानें आपल्या शिष्यांना वर व अभय देतो. **प्रियतमा** इ०—जो प्रियतम अशा शांति व क्षमा यांच्या आसनावर बसला आहे. क्षमा व शांति हे गुणच ज्याचे अधिष्ठान आहेत. पहा—" धैर्य यस्य पिता क्षमा च जननी शांतिश्चिरं गेहिनी । " **सालंकार**–ज्ञान व शांतिक्षमादि गुणांनीं जो (गुरु) मंडित आहे. जो आपल्या शिष्याला ' तत्त्वमसि ' या महावाक्याचा उपदेश करीत आहे. तें ब्रह्म तूं आहेस, असा आत्मापरमात्म्यैक्याचा जो आपल्या शिष्याला उपदेश करीत आहे. अशा अध्यात्मिक गुरूला विठ्ठल कवीनें वंदन केलें आहे. **श्लोक** ५. आपण ज्या वाल्मीकिरामायणांतील सीतास्वयंवराचा कथाभाग वर्णन करणार आहे, त्या वाल्मीकीच्या कृतीचें महत्त्व कवि येथें सांगत आहे. वाल्मीकीरामायणाचा महिमा असा कीं, सप्तऋषींपैकीं एक अशा भरद्वाजानें देखील त्याचा शोध करावा. ज्याचें विवेचन खुद्द ब्रह्मदेवानें नारदाला केलें आहे. शिवाय शंकर देखील रामाचे भक्त असल्यानें, जें वाल्मीकीरामायण शंकरानें आपल्या प्रियपत्नी पार्वतीस सांगितलें आहे, व ज्याच्या श्रवणानें शेष वासुकीही आनंदित झाला आहे. **चक्षुकानीं**–डोळे हेच ज्याचे कान असा वासुकी. सर्प डोळ्यांनींच ऐकतात म्हणून येथें वासुकीला चक्षुकानी म्हटलें आहे. अशा या महान् ग्रंथांतील कथा-भाग विठ्ठल वर्णन करणार आहे असा भावार्थ. **भरद्वाज**—हा वाल्मीकी ऋषीचा शिष्य होता, म्हणून वाल्मीकीचें रामायणकाव्य त्यानें शोधलें, असें या श्लोकांत म्हटलें आहे. **श्लोक** ६—प्रत्येक जाप्य मंत्राला

ऋषि, छंद, देवता, बीजाक्षर, शक्तिकीलक अशी योजना मंत्रशास्त्रांत केलेली असते. विठ्ठलही या क्रमास अनुसरून आपल्या प्रतिपाद्य ग्रंथास तशी योजना ( विनियोग ) दर्शवीत आहे. येथें 'सीतास्वयंवर' या ग्रंथास सत्कवि जो वाल्मीकि तोच ऋषि; या ग्रंथांत जीं अनेकविध वृत्तें योजिलीं आहेत ते छंद; इतर वैदिक मंत्रांना जशा देवता असतात, तशीच येथें सीता ही देवता असून, तिचें या ग्रंथाला सदैव सांनिध्य लाभलें आहे. इतर मंत्रांना त्यांच्या 'गं' सारख्या बीजाक्षरांच्या किंवा आद्याक्षरांच्या शक्तीचा खिळा (कीलक) जसा लाभलेला असतो, त्याप्रमाणें येथेंही या ग्रंथाला धरापुत्री सीता हीच कीलक किंवा मुख्य खिळा होऊन बसली आहे. या ग्रंथाची जशी ती देवता आहे, तशी ती या ग्रंथाच्या बीजाक्षरशक्तीचें मुख्य केंद्र होय. अशी ही योजना तुम्हीं समजावी व त्याप्रमाणें आपल्या ग्रंथांतील श्लोकांचा आदरपूर्वक जप करावा, असें विठ्ठलाचें म्हणणें आहे. कोणत्याही मंत्राचा जप करतांना ऋषि, छंद, देवतादिकांची जशी योजना केलेली असते, तशी येथें करून विठ्ठल आपला ग्रंथ वैदिक मंत्राप्रमाणेंच कसा जाप्य व पठणीय आहे, हें पर्यायानें सांगत आहे. **गंबीजादि** इ.–'गं' या आद्याक्षरांत सांठविलेल्या शक्तीचा खिळा, मुख्य खुंटी. इतर मंत्रांना जसा हा आद्याक्षराचा कीलक असतो, तसा या ग्रंथाला सीता हाच कीलक आहे, असा कवीचा अभिप्राय. **विनियोग**–योजना, व्यवस्था. **प्रयोगांतरें**—अन्य रीतीनें, अन्य पद्धतीनें. विठ्ठल म्हणतो कीं, इतर मंत्रांत जशी योजना असते, त्याहून अन्य पद्धतीनें ही योजना येथें आपण केली आहे, ती वाचकांनीं समजून घ्यावी.

**श्लोक ७**—या श्लोकांत कवि, राम व सीता यांचें ध्यान करीत आहे. राम हा मेघाप्रमाणें शामल असून मदनाचें आश्रयस्थान आहे. **अनंगधाम**–मदनाचें घर. सीता ही विद्युल्लता आहे. चपला–वीज. रामाला मेघ म्हटल्यावर सीतेकडे विजेचें नातें ओघानेंच आलें. पहा– 'वीज मेघाशीं ते घालि माळा'–शारदा नाटक. मेघाप्रमाणें शामल व

मदनाचें आश्रयस्थान असा राम व विद्युल्लतेप्रमाणें भासणारी सीता यांचें शहाण्या लोकांनीं भजन करावें. त्याचप्रमाणें जो आत्माराम, वर व अभय देणाऱ्या आपल्या चार हातांत क्रमानें घेतलेल्या धनुष्यबाणादि आयुधांनीं युक्त आहे, व जो भक्तांच्या सर्व इच्छा पुरवितो, शिवाय जो अलंकारयुक्त असून ज्याच्या मुखावर प्रसन्न हास्य झळकत आहे, अशा रामाचें गुणगान विठ्ठल कवि वाणीनें करतो व त्याचें हृदयांत ध्यान करतो.

**श्लोक ८**—मागील ६ व्या श्लोकांत जसा मंत्रशास्त्राचा उल्लेख आला आहे, तसाच येथें यंत्रशास्त्राचा उल्लेख आला आहे. कोणत्याही देवतेच्या मंत्राची आराधना करतांना त्या देवतेचें एक विशिष्ट आकृतीचें यंत्र असतें. अशा यंत्रांच्या आकृती भूमितींतील सिद्धांतांच्या आकृतीसारख्या असतात. महालक्ष्मीच्या आराधनेला जसें श्रीयंत्र असतें तसेंच येथें राममंत्राच्या आराधनेसाठीं योजलेल्या श्रीरामयंत्राची त्रिकोणाकृति कल्पिली आहे. **यंत्रोद्धार**—हें रामयंत्र कसें काढावें तें सांगतात. **त्रिकोण**—त्रिकोण काढून त्यांत मध्यभागीं दिलेल्या बिंदूच्या ठिकाणीं श्रीरामाची स्थापना करावी. या त्रिकोणाच्या दक्षिण म्हणजे उजवे बाजूस भरतादिकांची स्थापना करावी. या त्रिकोणाच्या डावीकडे म्हणजे उत्तरेस, शत्रुघ्न व त्याची पत्नी श्रुतकीर्ति यांची पूजा करावी. त्याचप्रमाणें या त्रिकोणाच्या पायथ्यास म्हणजे पूर्वेस, लक्ष्मण व त्याची पत्नी ऊर्मिला यांची स्थापना करून त्यांची पूजा करावी, व दशदिशांना त्या त्या दिक्पालांची स्थापना करावी. **मंत्रागमीं**--श्रीराममंत्राच्या अनुष्ठानप्रसंगीं, वरीलप्रमाणें यंत्रलेखन करून त्याच्या निरनिराळ्या दिशांना रामबंधूंची त्यांच्या पत्नीसह व इतर दिशांना त्या त्या दिक्पालाची स्थापना करावी, असा आदेश दिला आहे **दिक्पाल**-पूर्वेचा इंद्र, अग्नेयीचा अग्नि, दक्षिणेचा यम, नैऋत्येचा नैऋत, पश्चिमेचा वरुण, वायव्येचा वायु, उत्तरेचा सोम, ईशान्येचा ईशान, उर्ध्वदिशेचा ब्रह्मा, व अधर दिशेचा अनंत.

**श्लोक ९**—या श्लोकांत विठ्ठल कवि आपणास छंदशास्त्र, व्याकरणशास्त्र, साहित्यशास्त्र इत्यादिकांचें ज्ञान जें कवित्वाला अत्यावश्यक असतें, तें

आपणास नाहीं असें विनयानें सांगत आहे. वास्तविक विठ्ठल कवीला असें प्रत्येक शास्त्राचें थोडें थोडें ज्ञान आहे असेंच दिसून येईल. **छंदें**—निरनिराळीं वृत्तें. **यमकें**—शब्दालंकार. **बंधरचना**—कमलबंध, गोमूत्रिकाबंध, मुरजबंध इत्यादि अक्षररचनेनें साधलेल्या विशिष्ट आकृती. **नवरस**—शृंगार, वीर, करुण, रौद्र, हास्य, भयानक, बीभत्स, अद्‌भुत व शांत असे नवरस. **अलंकार**—उपमारूपकादि अर्थालंकार. **मऱ्हाटी इ.**—माझ्या ग्रंथाची भाषा मराठी असून तेथील शब्द रसाळ नाहींत. **अभिधानें**—शब्द. कवीनें विनयानें आपलें अज्ञान दर्शविलें असलें, तरी त्याला मराठी भाषेचा अभिमान आहे. आपल्याला रसाळ शब्द येत नसले, तरी आपली भाषा मराठी आहे हें लक्षांत ठेवावें असा कवीचा अभिप्राय. **श्लोक १०**— " मराठी भाषा जाणणाऱ्या चतुर लोकांनीं माझें हें काव्य जर मान्य केलें, तर मनाच्या उल्हासानें त्याची मी रचना करीन. " कवीला रसिकांच्या मान्यतेची अपेक्षा असून, ती मिळाल्यास उल्हासानें आपण काव्यरचना करूं असें तो सांगतो. **टिका मूळातधारें** इ.—प्रस्तुत मराठी अनुवाद मूळ संस्कृत कथाभागाबरहुकूम असून, त्याला रामायणांतील संस्कृत कथेचा आधार घेतलेला आहे. **उलथा**—संस्कार. मूळ संस्कृत ग्रंथाचा हा मराठी तर्जुमा श्रोते सभेमध्यें ऐकोत.

**श्लोक ११.** येथून सीतेच्या पूर्वावतार कथेला प्रारंभ होतो. पद्मावतीच्या पद्माक्ष राजानें लक्ष्मी आपल्या पोटीं यावी यासाठीं मोठें तप केलें. पण लक्ष्मीनें यासाठीं हरिभजन करण्यास सांगितल्यावरून त्यानें विष्णूची आराधना केली व तत्प्रीत्यर्थ एक यज्ञ केला. त्या यज्ञाला राजे व देव जमा झाले असतां, त्यांतून महाळुंगाच्या रूपानें वेदवती ( लक्ष्मी ) निघाली. ती देवदानवांच्या हातीं लागली नाहीं. पण त्या यज्ञांत वेदवतीचे आईबापही मरण पावले. **मातुळंगी**—म्हाळुंगीचें झाड व फळ. **संगर**—यज्ञ. **श्लोक १२**—वेदवती ही लक्ष्मीअंशानें अवतरली होती

व तिच्यासाठीं देवदानवांत जें युद्ध झालें, त्यानें तें पद्मावतीनगर उद्ध्वस्त झालें होतें. अशा भयाण परिस्थितींत वेदवतीनें कांहीं काळ यज्ञांत प्रवेश केला होता. पण मग हें देवदानवांच्या युद्धाचें अरिष्ट नाहींसें झाल्यावर, वेदवतीनें विष्णु आपणास पति मिळावा म्हणून अग्निसेवा आरंभिली.

**वेदवती**—वृषध्वज जनकाचा पुत्र रथध्वज, यांस धर्मध्वज व कुशध्वज असे दोन पुत्र असून, कुशध्वजास मालावती नामक पत्नीपासून लक्ष्मीच्या अंशानें एक कन्या झाली. तिनें जन्मतांच वेदध्वनि केला म्हणून तिला वेदवती हें नांव मिळालें ही कन्या विष्णूस द्यावयाची ठरवून कुशध्वज तिला मागणी घालणाऱ्या इतरांना नकार देत असे. पुढें शंभु नांवाच्या असुरानें तिला मागणी घातली असतां, कुशध्वजानें ठरल्याप्रमाणें नकार देतांच, शंभूनें त्याला मारून पलायन केलें. त्यामुळें वेदवतीच्या आईनें वेदवतीचें आपल्यामागें काय होईल याचा कांहींच विचार न करतां, पतीच्या मृत देहाबरोबर सहगमन केलें. यानंतर वेदवतीनें आपल्या माता-पितरांच्या मरणोत्तर पुष्करतीर्थी जाऊन तेथें तप आरंभिलें. या गोष्टीस बरेच दिवस लोटले असतां, आकाशवाणी झाली कीं, ‘ तूं पुढील जन्मीं विष्णुपत्नी होशील. ’ यामुळें आनंदित होऊन ती तेथून गंधमादन पर्वतावर येऊन राहिली. पुढें रावण फिरत फिरत तिच्या आश्रमास आला असतां, हिनें त्याचें उत्तम आदरातिथ्य केलें. रावणानें तिची पृच्छा करून तिच्या तपाचें कारण विचारलें असतां, वेदवतीनें आपलें सर्व वृत्त त्याला निवेदन केलें. यावर रावण तिला ‘ तूं मला वर ’ असें म्हणाला. पण तें त्याचें भाषण तिनें अमान्य केल्यावरून, रावण तिला बलात्कारानें ओढूं लागला. तेव्हां हिनें त्याचें स्तंभन करून त्यांस असा शाप दिला कीं, ‘ तूं पुढें माझ्याच हरणानें पुत्रबांधवासहित नष्ट होशील. ’ इतकें झाल्यावर रावण तेथून निघून लंकेस गेला व वेदवतीनें आपला देह योगाग्नीनें दग्ध करून टाकला. हीच वेदवती दुसऱ्या जन्मीं सीता होऊन रामाची स्त्री झाली असतां, रावणानें हिचें

हरण करून आपला नाश करून घेतला. ( ही कथा वाल्मीकिरामायण उत्तरकांड स. १७ व देवीभागवत स्कंद ९ अ. १५—१६ यांत आली आहे—भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश ). पण वेदवतीचा हा वृत्तांत व विठ्ठलानें वर्णन केलेला तिचा वृत्तांत यांत थोडा फरक आहे. पद्मावती नगर उध्वस्त झाल्यामुळें, भयानें वेदवतीनें यज्ञांत प्रवेश केला असें विठ्ठल सांगतो, तर तिनें रावणाच्या मागणीनंतर आपला देह योगाग्नीनें जाळून घेतला असें रामायणांत वर्णन आहे. **गेलें अरिष्ट**—देवदानवांच्या तिच्या मागच्या ससे-मिऱ्याचें अरिष्ट संपल्यावर वेदवतीनें अग्निसेवा केली. **श्लोक १३**—अशा-रितीनें दिवस व महिने गेल्यावर, रावण शिवाच्या आराधनेनें त्याचा वर मिळवून व कुबेराला जिंकून त्याच्याच पुष्पक विमानांतून परत येत असतांना, त्यानें वाटेंत ती पद्मावती नांवाची राजधानी उध्वस्त झालेली पाहिली. **वोळग**—सेवा. **वैश्रवण** – कुबेर. **पुरिति** – पुरती, सर्व, निखालस.

**श्लोक १४—राजा**—रावण. **सारण**—रावणाचा दूत. सारणानें रावणाला वेदवतीचा सर्व वृत्तांत सांगितला. **म्हणोनिशानें** -' म्हणूनशान ' हा ' म्हणून ' या अर्थी गांवढळ शब्दप्रयोग असून, तो खेडवळ लोकांच्या बोलण्यांत अद्याप आढळतो. **निदानें**—शेवटचीं, निश्चित. रावण वेदवतीला गोड गोड, समर्पक पण स्पष्टार्थसूचक भाषण बोलला. **श्लोक १५**-रावण वेदव-तीला काय बोलला तें यांत सांगितलें आहे. **चंचलाक्षी**—चंचल आहेत डोळे जिचे अशी. हें सौंदर्याचें लक्षण आहे. पहा--' इंद्र म्हणे गे चंद्रवदनें चंद्रहार घे चंचलनयने !'--अमृतराय-- कटाव. **शरच्चंद्रबिंबाननें**--शरद् ऋतूंतील चंद्राच्या बिंबाप्रमाणें धवधवित मुख आहे अशी तूं. **यज्ञसाक्षी**-- यज्ञालाच केवळ साक्षी ठेवून, बाकी कोणाचें सांनिध्य नसतां. **रात्रिमानी**--रात्रीचें प्रमाण, रात्रीची वेळ. रात्रि-व-मानी हे वेगळे शब्द घेतल्यास ' मानी ' याचा अर्थ ' हे मानी -स्त्रिये ' असा -करतां येईल. **श्लोक १६**-- रावण वेदवतीस म्हणतो, "मला ऐंशी हजार बायका आहेत, त्यांत तूं मुख्य होशील

म्हणजे तुला मुख्य करीन." **मणिभूषणासीं** - मणिभूषणासहित, रत्नभूषणांनीं मंडित होत्साती तूं सर्वांत मुख्य होशील. **मंडोदरी**-- रावणाची पत्नी. 'मंडोदरी आदिकरून ज्या मला स्त्रिया आहेत, त्या तुझ्या दासी होऊन तूं त्यांना वंद्य होशील. ज्याप्रमाणें पाऱ्याला सोनें प्रिय असतें, त्याप्रमाणें तूं त्याना वंद्य होशील.'

**मुखरणी** – मुख्य, प्रमुख, पुढारी. पहा – 'मुखरणि सखियांची सर्व संमर्द वारी –' सामराज, रुक्मिणीहरण ३|६९. **पारद** – पारा. सोन्यावर पारा तात्काल चढतो, म्हणून पाऱ्याला सोनें प्रिय आहे असें येथें म्हटलें आहे. **श्लोक १७. पद्मालया** – वेदवतीच्यारूपानें अवतरलेली लक्ष्मी. कारण वेदवती ही लक्ष्मीचा अंश होती, हें मागें सांगितलेंच आहे. **न इच्छी** इ० – माझा अभिलाष धरूं नको. **विषाची** इ० – तुला विषाची कां तहान लागली आहे! वेदवतीच्या म्हणण्याचा आशय असा कीं, आपला कोणी अभिलाष धरणें म्हणजे विषाची परीक्षा पाहण्यासारखेंच असून तें पर्यायानें मृत्यूला आमंत्रणच होय. तूं जर माझा अभिलाष धरशील तर नाहक मरशील. **श्लोक १८** – वेदवती याप्रमाणें निर्वाणीचें बोलली, तरी रावणानें तिला धरण्यासाठीं झेंप टाकलीच. पण वरील श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें वाक्य बोलून वेदवतीनें यज्ञांत प्रवेश केला. तिच्यासाठीं रावणानें यज्ञाचा अग्नि मंत्रोदकानें विझविला. पण वेदवती त्याच्या हातीं न लागतां, एक रत्न मात्र त्याला तेथें यज्ञकुंडांत सांपडलें. **श्लोक १९** – विमानांत बसत असतांना रावणानें ती रत्नपेटी विमानांत घातली, व तो मंदोदरीच्या भेटीसाठीं वेगानें निघाला. **रमारत्न** – रमासंबंधीचें रत्न. वेदवतीनें यज्ञांत प्रवेश केल्यावर, ती रावणाला सांपडली नाहीं, तिच्याबद्दल एक रत्न सांपडलें. वेदवती ही लक्ष्मीच होती म्हणून तिच्या यज्ञप्रवेशानंतर यज्ञकुंडांत सांपडलेल्या रत्नाला रमारत्न म्हटलें आहे.

**देव्हारचौकी**—देवघरांतील चौरंग. पहा— 'मग देव्हार चौकिये बीजे केलें । उद्धवदेवेसीं'—उद्धवगीता – ५७. रावणानें तें रमारत्न

आपल्या देवघरांतल्या चौरंगावर ठेवलें. **श्लोक २० – प्रियायुक्त** इ.- प्रियेसहित एकांतीं उपभोग घेऊन झाल्यावर, रावणानें आपली पत्नी मंदोदरी इजला वेदवतीची सर्व कथा सांगितली. **श्लोक २१-२४ – यांत** रावणानें मंदोदरीला सांगितलेल्या हकीकतीचा सारांश आला आहे. **श्लोक २१. रूपयावा** – रूपाचा डौल. पहा – तथापि यावा इस फार यावा – रुक्मिणीहरण – २।५४. वेदवती म्हणजे मूर्तिमंत रतीच्या रूपाचा डौलच. तिचें रूपवैभव रतीच्या रूपाप्रमाणें होतें असा भाव. **श्लोक २२.** वेदवती यज्ञांतून म्हाळुंगीच्यारूपानें निघाली. **तयेतें** इ० – तिला अनेकांच्या वासनेनें पाश घातले. अनेकांनीं तिच्यासाठीं अभिलाष धरला. तिच्यासाठीं देवदानवांत युद्ध होऊन, त्यांत वेदवतीचा पिता पद्माक्षराजा कामास आला. **श्लोक २३.** पुढें पुष्कळ काळ लोटल्यावर रत्नाप्रमाणें अंगकांति असणाऱ्या त्या वेदवतीनें अग्निसेवा केली. ती कोणालाच वश झाली नाहीं, तशी ती आपणालाही वश झाली नाहीं, असें रावण सांगतो. वेदवतीनें अग्निकुंडांत प्रवेश केला व तिचा शोध करतांना एक रत्न मात्र आपल्या हातीं आलें, असें रावणाचें मंदोदरीस निवेदन.

**श्लोक २४**— पुढें रावण मंदोदरीला सांगतो कीं, "तें रत्न पेटींत घालून लंकेस आणल्यालाही पुष्कळ काळ लोटला. आतां तें रत्न तुझ्या अलंकाराला योग्य आहे. तर देवघरांत जाऊन चौरंगावर ठेवलेलें तें तूं पहा." **श्लोक २५**—रावणाच्या सांगण्यावरून मंदोदरी तें रत्न पहावयास निघाली. आपला पति जिला भुलला, त्या सुंदर स्त्रीसंबंधींचें रत्न पहावयास तिला कुतूहल असणें साहजिक आहे. **राजपत्नी**—रावणपत्नी मंदोदरी. **हंसचाली**—हंसाच्या चालीनें किंवा गतीनें. सुंदर स्त्रियांच्या चालण्यास गजाच्या किंवा हंसाच्या चालीची नेहमीं उपमा देतात. पहा—लीलारसें हें सदनांत वागे । पाठीं इचे हंससमूह लागे. ॥–रु. ह.–२।५५. हंस ! प्रयच्छ मे कांता, गतिरस्यास्त्वया हृता–विक्रमोर्वशीय. **करीं घे** इ. – मंदो-

दरीनें ती रत्नपेटी हातांत घेतली, पण ती लगेच जड झाली. **श्लोक २६**— आपल्याला ती रत्नपेटी उचलत नाहीं हें सांगण्यास मंदोदरी रावणाकडे परत आली. **दशकंठभेटी**—रावणाच्या भेटीला. 'पेटी एकदम जड होणें यांत कांहीं चेटुक आहे, व असलें पेटीचें हें अरिष्ट तुम्हीं घरीं आणलंत, यावरून आपलं कर्मच खोटं" असं मंदोदरी रावणास म्हणते. **श्लोक २७**— मंदोदरी पुढें म्हणते, "ज्या राजकन्येच्या पायांत तिचे आईबाप, गणगोत मृत झाले, इतकेंच काय पण देवदानव देखील पराभूत झाले, ती आमच्या कर्मभोगानें आमच्या घरीं आली, तरी ती एकदां बाहेर कशी जाईल तें पहा." रत्नरूपानें आलेली ही राजकन्या पुनः आपल्या पतीस कदाचित् मोह घालील अशी भीति मंडोदरीला वाटत होती, म्हणूनच तिला बाहेर घालविण्याबद्दल ती रावणाला विनवीत आहे.

**कर्मभोगें**--पूर्वकर्माच्या भोगामुळें. याचा संबंध 'आली' या क्रियापदाकडे घ्यावा. **निर्गति**--बहिर्गमन, बाहेर जाणें. **कर्मरेखा** – पुढील कर्माची रेघ. काळ्या दगडावरची रेघ जशी पुसली जात नाहीं, तशी पुढें घडणाऱ्या कर्माची रेघ देखील अढळ अशीच आहे. यापुढें आपल्या दैवांत जें घडावयाचें आहे, तें घडणारच असा भाव. **भाविनी** – पुढें होणारी. **श्लोक २८** – रावणाला मंदोदरीनें कळविलेल्या घटनेचा विस्मय वाटला. **भयचित्त**–भयानें व्यापलेलें आहे चित्त ज्याचें. **कांक्षी**—संशयी. "ती रत्नपेटी तुला कां उचलली नाहीं" असें रावण मंदोदरीला विचारतो. **कमलायताक्षी** – कमलाप्रमाणें विस्तृत आहेत डोळे जिचे अशी मंदोदरी. **मी आणितो इ०**–रावण स्वतःच ती रत्नपेटी आणण्यास जातो. **म्हणतेसि काये** – तूं काय म्हणतेस? **श्लोक. २९**—**दशकंधर** – रावण. **मांदुस**– पेटी. **मयजा** – मय दानवाची मुलगी, मंदोदरी. मंदोदरी रावणाला म्हणाली, "तुम्ही या पेटीला वंदन करून उघडण्याबद्दल तिला विनंति करा." **श्लोक ३०**—**समतेसि इ०**—ज्या कुमारीसारखी तुलनेला जगांत दुसरी नाहींच.

श्लोक ३१ – रावणानें त्या पेटींत सहा महिन्यांची कन्या पाहिली. **तुलेना** – तिच्या अंगलटाशीं पार्वतीची देखील तुलना होण्यासारखी नव्हती. **रूपरेखा** – अंगलट. **श्लोक ३२** – आपल्या घरीं ही कन्या येणें म्हणजे मोठें विघ्न होय असें मंदोदरीला वाटतें. म्हणून तिला दुसऱ्या कोणत्या तरी जागीं पाठविण्याबद्दल ती रावणाला सांगतें. **श्लोक ३३—तुम्हाळागि लागे**–तुम्हालाच नेणें प्राप्त आहे. कुमारीला नेण्याचें काम तुम्हालाच करावें लागेल. **निक्षेपिजे** – ठेवा. तुम्ही इला काळजीपूर्वक भूमींत पुरून ठेवा. **श्लोक ३४** – यानंतर ती पेटी हलकी झाली, व रावणाच्या दूतांनीं ती उचलतांच ती त्यांना उचलली. **हळू होणें** – हलकी होणें. पहा – विधीनें तशा त्या तुळू पाहिजेल्या । इयेशीं हळू जाहल्या उंच गेल्या ॥–रघुनाथपंडित – दमयंतीस्वयंवर १६३. **गण** – गणांनीं, दूतांनीं. ती पेटी नेली जात असतांना मेघयुक्त आकाशांत जी आकाशवाणी झाली, ती या श्लोकाच्या द्वितीयार्धात दिली आहे. **गी** – वाणी, गिरा. त्या पेटींतली कन्याच आकाशवाणीनें रावणाला संबोधून बोलली. **पुनरपिहि इ०** – "मी आतां विदेह देशाला जातें. पण मी पुनः सतिच्यारूपानें येईन तेव्हां हे दुष्टा! रावणा! तुझ्या वंशाचा नाश करीन" अशी पुढील घटनेची सूचना तिनें रावणाला दिली.

**श्लोक ३५**—रावणाला या आकाशवाणीनें भय वाटलें. **शंका**–भय. **हृदयकमळीं**—मनांत. ती पेटी पुढें पुष्कळ दिवस भूमींत गुप्त होती, पण यानंतर ती प्रकट होण्याचा योगायोग कसा आला, तें या श्लोकाच्या शेवटच्या ओळींत व पुढील ५।७ श्लोकांत सांगितलें आहे. **उपरी**—त्यानंतर. एक ब्राह्मण जनकाच्या दरबारीं येऊन त्यानें राजाला आशीर्वाद दिला व राजानेंही मग त्या ब्राह्मणाला भूमिदान केलें. 'भूमिलाभो परो मतः' अशी पूर्वी समजूत असल्यानें, भूमिदान हें सर्वश्रेष्ठ दान असें मानलें जात होतें.

**श्लोक ३६**—ज्या विदेहदेशांत ती पेटी रावणाच्या दूतांनीं पुरली होती, त्या विदेहाच्या राजा जनकानें त्या ब्राह्मणाला नवीन भूमिदान देण्याचें

ठरविलें, व ज्या भूमींत ती पेटी होती तीच नेमकी भूमि त्या ब्राह्मणास मिळाली. **तासीं** —तास=नांगरानें. जमीन नांगरण्याची क्रिया, नांगरणी. मिळालेल्या जमिनीची नांगरणी करीत असतांना त्या ब्राह्मणानें "येथें आतां अनेक प्रकारचीं बियें पेरीन" असें मनांत म्हटलें. **हलदंतिं**—नांगराच्या दांताला, नांगराच्या फाळाला. प्रथम ती पेटी त्या नांगराच्या फाळाला अडकली, पण ती उपटून काढून त्या ब्राह्मणानें ती राजाकडे आणली. **दाटली**—गच्च भरली. **श्लोक** ३७—आपणाला जमीन मिळाली ती आपली झाली, तरी तिच्यांत सांपडलेली पेटी आपली नव्हे या बुद्धीनें तो ब्राह्मण राजाकडे ती पेटी परत करूं लागला. इकडे राजाचेंहि म्हणणें असें पडलें कीं, "ज्या अर्थी मी तुला भूमि दान दिली, त्या अर्थी तेथें सांपडलेली पेटी देखील तुझीच असून, ती पेटी परत घेणें म्हणजे माझ्या कृत पुण्याचा क्षय करणें होय." राजाला ती पेटी परत घेववेना. **ते**—ती पेटी. **क्षेत्रीं**-इ०—राजा ब्राह्मणाला म्हणतो. "हे दयाळा! या शेतांत जें जें कांहीं धनादिक सांपडेल तें तें सर्व तुमचेंच आहे, एवढी आमची गोष्ट तुम्ही ऐका, मान्य करा." यावर ब्राह्मणाचें म्हणणें पुढील श्लोकांत दिलें आहे. **परिसे**— ऐके.

**श्लोक** ३८—ब्राह्मणाचा युक्तिवाद असा, "ज्या वेळीं तुम्हीं मला भूमि दान दिली, त्यावेळीं तिच्यांतील पेटीच्या दानाचा संकल्प तुम्ही केला नव्हता. त्यामुळें हे राजा! तुझ्या भूमिगत धनाला मी भुकेला नाहीं. तूं दिलेलें शेत माझें आहे, पण त्यांत सांपडलेलें भूमिगत द्रव्य हे राजा! तुझें आहे. मला धनाचा मुळींच लोभ नाहीं." **पुरा**—पुरता, मुळींच, निखालस. **श्लोक ३९**—राजापुढें पेंच पडला. राजा प्रधानास म्हणालाः—"ब्राह्मणाचें धन आम्हीं घ्यावें किंवा नाहीं, याबद्दल विचार करून योग्य होईल तें सांगा." **संकष्ट** संकट. 'धना ब्राह्मणाच्या न आम्हासि घेणें' हा काव्यसंग्रहाचा पाठ घेतल्यास, श्लोकांतील चवथ्या पादाचें फारसें प्रयोजन

राहत नाहीं. कारण ब्राह्मणाचें धन आम्हांस घ्यावयाचें नाहीं, असा निर्णय राजानें घेतल्यावर मग त्यानें 'विचार करून सांगा' असें प्रधानांस म्हणण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं. **निकें**–योग्य.

**श्लोक ४०–तदनुमत इ**–प्रधानांनीं दिलेल्या अभिप्रायांत राजा स्वस्थ राहिला. प्रधानांच्या मताप्रमाणें वागण्याचें त्यानें ठरविलें. **श्लोक ४१–पंचाब्द**–पांच वर्षांची. **कुसुमधनुषमूर्ति**–मदनमूर्ति, मदनाप्रमाणें सुंदर आकाराची. **त्रिभुवन इ.** त्रिभुवन उत्पन्न करण्याच्या ब्रह्मदेवाचें ती कन्या म्हणजे जणुं शिरोरत्नच. **शिरोरत्न**—डोक्यावर धारण करण्याचें रत्न. अर्थात् सर्व रत्नांत हें रत्न मुख्य होय. **चित्र**—चमत्कार. पेटींतून पांच वर्षांची कन्या निघणें हा चमत्कार डोळ्यांनीं पाहून जनक राजा आनंदानें हांसला. **श्लोक ४२—वेदआशीर्वचनासि**–वैदिकमंत्रपूर्वक आशीर्वादास. **मागुता**–फिरून, पुनः **भवें**–शंकरानें. ही कन्या शंकरानें दिली म्हणून राजाने ठेवून घेतली व ब्राह्मणाला इतर दानें दिलीं. वास्तविक ब्राह्मणाला दिलेल्या जमीनींतील पेटींतून ही कन्या निघाली होती, तर राजानें ती कन्या ब्राह्मणाच्याच कां स्वाधीन केली नाहीं? **श्लोक ४३**–राजाला कन्या प्राप्त झाली म्हणून विदेह नगरी शृंगारल्याचें हें वर्णन आहे. **तुरें**–वाद्यें. **दुंदुभी**–नगारे, नौबत. **गोपुरें**–मुख्यद्वारें. **श्लोक ४४–ज्ञाता**–ब्रह्मज्ञानी. **देही असोनि इ०** जनकराजा जीवन्मुक्त होता. शरीर धारण करीत असूनही त्याची शरीराबद्दल आसक्ती नव्हती. म्हणून देही असून तो विदेही होता असें म्हटलें आहे. शिवाय तो विदेह देशचा राजा असल्यामुळें, 'विदेही' या पारमार्थिक बिरुदाप्रमाणें विदेही=विदेह देशचा, असें व्यावहारिक नांवही त्याला यथार्थच होतें. 'विदेही' या शब्दावर येथें कोटी असावी. जनकराजाची त्याच्या वैराग्यवृत्तीबद्दलची ख्याति आहे, ती त्याच्या "मिथिलायां प्रदीप्तायां न मे किंचन दह्यते।" या उक्तींत सांठविली आहे. जनकराजाचें ज्ञान व अध्यात्मिक अधिकार जाणून शुकाचार्यांसारखे ब्रह्मज्ञानी देखील त्याच्या दारांत तिष्ठत उभे असत.

**श्लोक ४५** ती कन्या जनकाच्या घरीं दिवसेंदिवस वाढूं लागली. **सुलावण्य इ०** -तिच्या लावण्याच्या समुद्राकडे तिचें तारुण्य धावूं लागलें. जशी जशी ती तरुण होऊं लागली, तशी तशी ती अधिकाधिक सुंदर दिसूं लागली असा भाव. **राम** —परशुराम. हा विष्णूचा सहावा अवतार. परशुराम नारदासह जनकाकडे आला. **श्लोक ४६**—जनकानें परशुरामाचा कसा सत्कार केला त्याचें वर्णन. **भाट**— स्तुतिपाठक. **मिथुळापुरीं**—मिथिला नगरींत. जनकाच्या राजधानींत. जनकाच्या राज्यांत लोक कसे सुखी होते, त्याचें वर्णन केलें आहे. **सुकृती**—पुण्यवान् ( जनक ). **श्लोक ४७**—**विष्टर**—आसन. **साधु**—परशुराम व नारद हे सत्पुरुष, राजाचा आदर पाहून संतोष पावले. **निवाले**-संतोष पावले. राजानें त्यांची षोडशोपचार पूजा केली. **षोडश उपचार**—आसनं स्वागतं पाद्यमर्घ्यमाचमनीयकम् । मधुपर्काचमस्नानं वसनाभरणानि च । गंधपुष्पे धूपदीपौ नैवेद्यं वंदनं तथा ।। **श्लोक ४८**—**ते**—कन्या, सीता. **श्लोक ४९** - **चाप** – परशुरामाचें तें धनुष्य. **तिनें इ०** – सीतेनें त्या धनुष्याच्या कांबटाचा ‘घोडा’ केला. लहान मुलें ज्याप्रमाणें काठीचा घोडा करतात त्याप्रमाणें **लाडकोडें** – लाडीगोडीनें, गोडीगुलाबीनें.

**श्लोक ५०**—सीतेचा खेळकरपणा व एवढ्या धनुष्याला लीलेनें हाताळणें, यामुळें परशुरामाला आनंद वाटला. **अंकावरी**—मांडीवर. येथें परशुरामाचें वात्सल्य दिसून येतें. **शिकवी**—उपदेश केला. परशुरामानें जनकाला जें सांगितलें, तें पुढील दोन ओळींत दिलें आहे. **बुज**-समज. सीता ही तुझी मुलगी नसून, ती आदिमाया आहे असें समज. **श्लोक ५१**—जनकाला वाटलें कीं, सीतेच्या वागणुकीमुळें परशुरामाला कदाचित् राग आला असावा म्हणून तो परशुरामाची विनवणी करीत आहे. **शरासन**—धनुष्य. “सीतेनें तुझ्या धनुष्याचें घोडें केलें म्हणून राग मानूं नको” असें जनक सांगतो. **वज्रघोडें**—अभेद्य घोडा. त्या धनुष्याचा सीतेनें बळकट घोडा केला.

**श्लोक** ५२–सीतेनें आपल्या धनुष्याचा असा खेळ केल्यावर, परशुरामानें पुढील लक्षण ओळखून तें धनुष्य जनकाच्याच घरीं ठेवलें, व जो कोणी या धनुष्यास दोरी बांधील, तोच या कन्यकेला वरील असा भयंकर पण त्यानें सांगून टाकला. **श्लोक** ५३– परशुराम गेल्यावर त्यानें सांगितल्याप्रमाणें सीतास्वयंवर करण्याची जबाबदारी जनकावर पडली. **वचनार्थ**– परशुरामाच्या बोलण्याचा अर्थ लक्षांत घ्या. **हें मानलें इ०**–" सीतास्वयंवराची आज्ञा द्या " हे पुरोहितांचे शब्द जनकासारख्या विशेष सुज्ञाला अमृताप्रमाणें वाटून ते त्याला मानवले. **मानलें**--मान्य झालें.

**श्लोक** ५४– सीतास्वयंवराच्या निमंत्रणपत्रिका पाठविण्यास सुरवात होते. **स्ववक्त्रांबुजें**– आपल्या मुखकमलानें, तोंडानें. दूतांना त्यानें आपल्या तोंडीं आज्ञा दिल्या. **सप्ततळिंचे** – सात पाताळांतले शेषादि राजे. अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल आणि पाताल. अशीं सप्त पाताळें आहेत. विश्वामित्राला देखील इतर द्विज व ऋषीसह घेऊन येण्याबद्दल जनकाची दूतांना आज्ञा होती. **श्लोक ५५** – **तुरंबुनि** – बांधून, खोवून. राजाची आज्ञा शिरसामान्य करून. **गंतव्य** – गमन. **अयोध्यापती** – दशरथ. त्यावेळीं राम लक्ष्मण इत्यादि पुत्र अयोध्येंत नव्हते, म्हणून दशरथाला तेथून हलतां येईना. **संमती**– मान्य, पसंत, पूज्य. **श्लोक** ५६ – रावण आपल्या शुक व सारण या दूतांना टेहळणी करावयास धाडून पृथ्वीवरची सर्व बातमी आणीतच असे. दूतांनीं त्याला सीतास्वयंवराची बातमी सांगितली, व त्यावरून तो तिकडे आपल्या पुष्पकविमानांतून निघाला. **निमूळ** – आमंत्रणाशिवाय, आमंत्रण नसतांना. जनकानें सीतास्वयंवराचें आमंत्रण रावणास दिलें नसतांना तो निघाला. मूळ–बोलावणें. **सीतास्वरें** – 'सीता' या अक्षरांच्या प्रेरणेनें. 'सीता' एवढीं अक्षरें दूताकडून ऐकून आपणास बोलावणें नसतांनाही रावण स्वयंवरास निघाला, यावरूनच त्याची कैणवृत्ति व्यक्त होते.

**श्लोक** ५७-यांत रावणाच्या पुष्पक विमानाचें संपन्न वर्णन आलें आहे. **मुक्तावळी**-मोत्यांच्या माळांनीं व फुलांनीं गुंफलेलें तें विमान होतें. **रत्नस्तंभ**-रत्नाचे खांब. तें विमान रात्रौ आकाशांतून विहार करीत असतां, चंद्राप्रमाणें प्रशांत व कल्पनाविलासांत दंग व्हावयास लावणारें, तर दिवसा पृथ्वीचा केवळ कंठमणि असा सूर्य जसा जागृति व चेतना आणतो, त्याप्रमाणें देदीप्यमान होतें. रावणाचें विमान चंद्रसूर्यांप्रमाणें प्रभावी भासत होतें असा भाव. **मृगांक**-चंद्र. **मनोमय**-कल्पनामय. नाहींतरी चंद्र हा मनावरच प्रभाव गाजविणारा आहे. हें विमान चंद्राप्रमाणें असल्यामुळें, त्यांत बसून मन मानेल तिकडे जावें. **भूस्त्री** इ.-पृथ्वीरूपी स्त्रीचा सूर्य हा ( पति ) कंठमणि आहे. **दिनमणी**-सूर्य. सूर्य जसा पृथ्वीवरील सर्वांना चेतना व प्रकाश देतो, तसें हें विमान दिवसा आकाशांतून विहार करतांना सर्वांना प्रकाश व चेतना देई. **श्लोक** ५८—येथे रामकथेची फलश्रुति दिली आहे. **निकी**—चांगली. **रसवृद्धि**—शृंगारादि नवरसांची वृद्धि. रामकथा पाठ करीत असतां, भक्तांना नवरसांची प्रतीति होते. **सुधार्णवींची** इ०—जी रामकथा अमृताच्या समुद्राची एक लाट आहे. अमृताची लाट आल्यावर मग मृत्यु कोठला ? रामचरित्र पाठ केल्यावर किंवा गाइल्यावर असेंच अमृतत्व प्राप्त होतें. जन्ममरणाच्या फेऱ्यांतून प्राणी सुटतो. **लहरी**—लाट. **श्लोक** ५९—विठ्ठल कवि आतां आपलें काव्य ऐकण्याबद्दल श्रोत्यांना विनंति करीत आहे. **वाणी**—विठ्ठलाचें कवित्व. **वो**—अहो. भ्रमरांना पुष्पांतील सुगंध घ्या हो असें मुद्दाम जसें सांगावें लागत नाहीं, तसेंच आपलें काव्य आयका अशी पंडितांना विनंति करण्याची कांहीं जरूरी नाहीं, असें कवीचें म्हणणें. विठ्ठलानें येथें श्रोत्यांना विनंति करतांना जसा विनय दाखविला आहे, तसाच आपल्या काव्याबद्दल आत्मविश्वासही प्रकट केला आहे.

**श्लोक** ६० — विठ्ठल कवि मंत्रतन्त्रशास्त्रावर व शकुनावर विश्वास ठेवणारा दिसतो. कोणतेंही काव्य रचण्याचा प्रारंभ करण्यापूर्वी पुस्तक-

पूजा करून शकुन पाहण्याची चाल होती असें दिसून येतें. ही शकुन पाहण्याची पद्धति अशी:-निरनिराळया सात धान्यांचे सात ढीग मांडून त्यावर ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तीन वेदांची तीन ठिकाणीं स्थापना करावी. त्यानंतर आपणाला ज्या ग्रंथावर काव्यनिष्पत्ति करावयाची आहे, त्याची पूजा करून शकुन पहावा. असा शकुन पाहतांना त्या ग्रंथावर तीन सुपाऱ्या व त्यांच्यावर पुनः तीन फुलें आपल्या मनांत कांहीं इष्ट भाग कल्पून ठेवाव्या. मग कोणत्या सुपारीवरचें फूल प्रथम, नंतर व शेवटीं आपोआप पडतें तें पाहून, त्याप्रमाणें ग्रंथरचनेचा शकुन घ्यावा. समजा, येथें रामायणाची पूजा करून व त्यांपैकीं सीतास्वयंवराचा कथाभाग मनांत कल्पून कवीनें आपण रचावयाच्या ग्रंथांतील सर्ग किंवा दशक व श्लोक यासंबंधीं वरीलप्रमाणें सुपाऱ्या व त्यावर फुलें ठेवून शकुन पाहिला असेल, तर त्याच्या मनाच्या संकल्पाप्रमाणें फुलें पडून त्याला शकुनाचेंही पाठबळ सदर ग्रंथ रचतांना मिळालें असेल, व अशारीतीनें आपल्याला जणूं दैवी सहाय्यच आहे असें वाटून कवीला ग्रंथरचनेला अधिक उत्साहही आला असेल. कोणतेंही काम आरंभतांना भाविक लोक देवाला कौल लावतात तोच प्रकार येथें कवीनें वर्णिला आहे, कारण देवाला सुपारीचा किंवा फुलांचाच कौल लावलेला आढळून येतो.

**श्लोक ६१**—या प्रथम सर्गांत कवीनें सीतेची उत्पत्ति कशी झाली तें सांगितलें. आतां यापुढील दुसऱ्या सर्गांत, रामानें केलेल्या अहिल्योद्धाराची कथा वर्णन करणें प्राप्त आहे असें कवी म्हणतो. **बोलणें लागली**-बोलावी लागत आहे. **इच्छतें पुरवील**—आपल्या काव्याचा हा पहिला सर्ग वाचकांच्या आकांक्षा तृप्त करील. अशी कवीची खात्री असून, श्लोकांचा योग्य तोच अर्थ घेण्याबद्दल तो वाचकांना पुनरपि सुचवितो.

---

# सर्ग दुसरा

प्रस्तुत सर्गात यज्ञरक्षणासाठीं विश्वामित्रानें दशरथ राजाजवळ रामाची मागणी केल्याचा कथाभाग प्रथम आला आहे. **श्लोक १** — **दशरथ** — हा अयोध्येचा राजा असून अजराजाचा पुत्र होता. **कौशिक**— विश्वामित्र. **रविवंशविभूषण** — सूर्यवंशाचें भूषण. **रघुविरास** — रामास. **दिजे** — दे (आज्ञार्थी). **मखरक्षणा** — यज्ञरक्षणासाठीं. **श्लोक** २—वशिष्ठ ऋषि हे दशरथाचे कुलगुरु असल्यामुळें, ते राजास विश्वामित्राची इच्छा पूर्ण करण्यास सांगतात. **मुनिची** — विश्वामित्राची. — **नृपतिनें** इ०—दशरथराजानें मनांत विचार केला, व मग वशिष्ठांनें सांगितल्याप्रमाणें केलें. **विचारिलें** — विचार केला. **सिकविलें**—शिकविलेलें. ( पूर्ण भूतकालाप्रमाणें अर्थ) **श्लोक ३**. रामाला विश्वामित्रास दिला, व त्याच्याबरोबर सावधगिरीसाठीं दुसरं कोणी तरी असावं म्हणून लक्ष्मणही दिला. **सुमित्र** — लक्ष्मण. **अवधारणा** — सावधगिरी, हुशारी. **नरेंद्र** — दशरथ. " दोघांचा, रामलक्ष्मणांचा योग्य प्रतिपाळ करावा " असें दशरथ विश्वामित्रास म्हणाला. **श्लोक ४** — **मुनी** — विश्वामित्र व वशिष्ठ. राजानें दोघांचंही म्हणणें ऐकल्यामुळें ते दोघे संतुष्ट झाले. **तिघे** — राम, लक्ष्मण व विश्वामित्र. **वहनावरि** — रथावर. **रणतुरें** — रणवाद्यें. रणवाद्यें मेघासारखी गर्जना करीत होतीं. जणु काय तीं, " राम युद्धांत शत्रूंना मारील " असाच घोष करीत होतीं. **कदनीं** — युद्धांत.

**श्लोक ५**—**सवें तेणें** इ.—विश्वामित्रानें रामलक्ष्मणांना आपल्याबरोबर आणलें. विश्वामित्रानें त्यांना शस्त्रांचा व अस्त्रांचा उपयोग कसा करावयाचा तें शिकविलें. **सरिसें** — सारखें. **श्लोक ६** — अयोध्येहून विश्वामित्राच्या

यज्ञरक्षणस्थलाला जाईपर्यंत मार्गात रामानें एकदोन वीरकृत्यें केलींच. **ताटिका** – सुकेतु नामक यक्षाची कन्या. ही मोठी बलवान् असून, जंभपुत्र सुंद याची पत्नी होय. हिला त्यापासून मारीच आणि सुबाहु असे दोन पुत्र झाले. सुंदानें अगस्त्य ऋषीचा कांहीं अपराध केल्यानें तो त्याच्या कोपानें दग्ध झाला असतां, ही आपल्या दोनी पुत्रांस घेऊन, मलद आणि कारुषक या देशास जाऊन राहिली; व ऋषीस अनेक प्रकारें पीडा देऊं लागली. त्यामुळें अल्पकाळांत ते देश उध्वस्त होऊन तेथें मोठें अरण्य झालें. त्याच अरण्यासमीप विश्वामित्र ऋषि राहत असून, जेव्हां जेव्हां तो यज्ञ आरंभी, तेव्हां तेव्हां ही आपल्या दोन पुत्रासहित येऊन त्याचा विध्वंस करी. त्यामुळें कंटाळून विश्वामित्र अयोध्येस दशरथराजाकडे गेला, व त्याचे राम लक्ष्मण दोघे पुत्र मागून घेऊन तो आश्रमाकडे निघाला. इतक्यांत मार्गामध्यें हिनें त्यांस पाहिलें, व ती अंगावर धांवून येत आहे तों, विश्वामित्रानें रामाकडून हिचा वध करविला. पुढें यज्ञकाळीं सुबाहु मरण पावून, रामबाणाच्या पिसाऱ्यानें मारीचही उडून समुद्रांत जाऊन पडला. तेव्हांपासून तो या अरण्यांत पुनः न येतां, लंकेंत जाऊन राहिला. **पुरा केला** – मारला. रामानें आपल्या बाणानें याला खलास केला. **लंकाप्राप्ति इ.** – मारीच लंकेंत जाऊन राहिला हें वरील हकीकतींत आलेंच आहे. याच मारीचानें पुढें सुवर्णमृगाच्या रूपानें सीतेला मोह पाडला, हें प्रसिद्ध आहे. **अध्वर** – यज्ञ. **मिथिलेंद्र दूत** – मिथिलेचा राजा जनक, त्याचे दूत. यांनीं विश्वामित्राच्या आश्रमाला येऊन सीतास्वयंवराची कुंकुमपत्रिका त्याला दिली. **सिद्धाश्रम** – विश्वामित्र सर्व सिद्धि प्राप्त झालेला व ब्रह्मज्ञान झालेला होता म्हणून तो सिद्ध होता; त्याच्या आश्रमाला सिद्धाश्रम म्हटलें आहे.

**श्लोक ७ – ते ते अर्थ इ०** – "तीतें अर्थ" असा मूळ पाठ असावा. त्या पत्रिकेंतील अर्थ विश्वामित्रानें रामाला सांगितला. काव्यसंग्र-

हाच्या पाठानें अर्थनिष्पत्ति होत नाहीं. तिसऱ्या ओळींत जनकानें विश्वामित्राला पत्रद्वारें केलेली विनंति दिली आहे. **धनुर्याग** – सीतास्वयंवरासाठीं परशुरामाच्या धनुष्याचा पण होता, म्हणून या स्वयंवरप्रसंगाला धनुर्याग असें संबोधिलें आहे. **श्लोक ८**—विश्वामित्र रामास म्हणतात. **पहावयाकारणें**-पहावयास. येथें 'कारणें' हा शब्द चतुर्थीच्या प्रत्ययाबद्दल लावला आहे. विश्वामित्र म्हणतो कीं, "तुम्हांला मिथिलेला नेण्यास तुमच्या वडिलांची आज्ञा नसल्यानें तुम्हांला तिकडे नेतां येत नाहीं." **आपणें** – आपणहून. **आता जा** इ० विश्वामित्र रामाला शरयूतीराला जाण्यास सांगतात. **श्लोक ९** – पण रामाच्या मनांत विश्वामित्राबरोबर जाऊन स्वयंवरप्रसंग पाहण्याचें होतें, म्हणून तो विश्वामित्राबरोबर जाण्याची तयारी दाखवितो. **राजा न कोपे** इ० – आपण न विचारतां मिथिलेस गेल्यास आपले वडील दशरथ रागावणार नाहींत, अशी राम ग्वाही देतात.

**श्लोक १०**—विश्वामित्रानेंही यावर मनांत विचार केला. "हा राम परब्रह्मावतार आहे, जी गोष्ट होणार ती कांहीं टळत नाहीं, व रामाला तर या स्वयंवरप्रसंगांत यशच आहे." मग एवढें जर विश्वामित्राला माहित होतें, तर रामाला वडिलांच्या आज्ञेची अडचण सांगून आपल्याबरोबर येण्यास नकार देण्याचें त्याला कारण नव्हतें. पण कदाचित् रामाच्या अवतारी सामर्थ्याची गोष्ट विचारांतीं त्याच्या लक्षांत आली असावी. **स्वसंगें** — आपल्याबरोबर रामानें येण्यानें. **श्लोक ११-तिघे**—राम, लक्ष्मण व विश्वामित्र, सीतास्वयंवरासाठीं मिथिलेस जातात. **नफेरी** – (फारशी) पडघम.

**श्लोक १२** – यांत त्या तिघांना जातांना कोणते शुभशकून झाले ते दिले आहेत. भरलेली घागर डोक्यावर घेतलेली सुवासिनी स्त्री सामोरी येणें, डाव्या बाजूनें कावळे उडणें, वाटेंत मोर, मुंगूस, हरिण जातांना दिसणें, व तसेंच उजव्या बाजूनें तास पक्षी व हरिणींचा कळप जाणें, हे शुभ शकून समजतात, त्यामुळें जाणाऱ्या माणसाचें काम हटकून होतें, किंवा त्याला

न कळत फलप्राप्ति होते. येथें हेच शकुन घडले आहेत. **सव्यपाणी**-डाव्या हाताकडून उजवीकडे. **वामभागें** - उजवीकडून डावीकडे. रुक्मिणी हरणांत सुदेवाला श्रीकृष्णाकडे जातांना असेच शुभशकून झालेले सामराजानें वर्णिले आहेत. पद्य – पक्षद्वारें विप्र बाहेर आला । क्षेमाशंसी त्याजला काक गेला. ॥ जैसा देखे पूर्णकुंभद्वयाला । तैसा त्याला पूर्ण आनंद झाला. ॥ सवत्स त्या सन्मुख गाय आली । सुवासिनीची मग भेट झाली ॥ –रु. ह. ४।५३,५४. **तास**-चास पक्षी, हा निळया रंगाचा असतो. पद्य-' सव्य जाती वायस । अपसव्य जाती तास ।. " **श्लोक १३** – भद्रवनाचें वर्णन. **विपिन** - अरण्य. **छायासुशीतल** इ. सावलीनें गारगार असलेलें जें हरित दर्भांकुरांनीं आच्छादलेलें उपवन (फळबाग). **श्लोक १४**— असा सुशीतल वायु वाहणें हें देखील एक शुभ लक्षण असून, भावी लाभाचें सूचक आहे. पद्य–मंदं मंदं नुदति पवनश्चानुकूलो यथा त्वाम् ।-- मेघदूत. **दुणावे**-दुप्पट होई. असा शीतल वायु अंगाला लागल्यानं सुख दुणावलें. **कुहुकुहु**-हा कोकिळांचा स्वर होय. **सुधारव**-मधुर शब्द. **अरुणोत्पल**-तांबडें कमळ. **कळे**-मोठ्या कळया. कमळाच्या कळया फुलल्या होत्या. सूर्यविकासी कमळें विकसित झालीं होतीं.

**श्लोक १५** – **पुष्पयाती**-पुष्पांच्या अनेक जाती, प्रकार. **भ्रमर-निकर**—भोंग्याचा समूह. **गुंजत्कारती**- गुंजारव करीत होते. भ्रमर मंद गुंजारव करीत होते असें भासत होतें. **शाखी** – वृक्ष. या भद्रवनांत राम असतां तो मिथिला नगरीपासून पांच योजनेंच दूर होता. हें भद्रवन मिथिलेपासून पांच योजनें दूर होतें असा अर्थ. **लेखा**-हिशेब, गणती. **श्लोक १६**-एकीकडे हें भद्रवन असें संपन्न तर दुसरीकडे तें ओस व शून्य असलेलें रामानें पाहिलें, व हें असें कां याचें कारण त्यानें विश्वामित्राला विचारलें. **उद्वस** – ओस, शून्य. **संतोषला** रामानें असा प्रश्न विचारला याबद्दल विश्वामित्राला आनंद झाला. कारण अशा रामाच्या

प्रश्नांतूनच अहिल्योद्धाराला तोंड लागणार होतें. **श्लोक १७**— विश्वामित्र म्हणतो. " हे रामा ! हें वन शापताडित असून तुझ्या येथ आगमनानें त्याचें भाग्य उदयास आलें आहे." **उपहत** – शापताडित, शापदग्ध. **भूत इ०**– झाली ती घटना घडून गेली. अहिल्येचा वृत्तांत घडला त्याला पुष्कळ वर्षें झालीं. **विपिनकथन** – त्या अरण्याची कथा, वृत्तांत. हा वृत्तांत अद्याप-पर्यंत गुप्त होता, अहिल्येचा येथें घडलेला दुर्दैवी वृत्तांत राम येईपर्यंत कोणास ठाऊक नव्हता, तो आतां स्फुट होणार आहे असा अर्थ. **गोपी**-याचा अर्थ काव्यसंग्रहकारांनीं 'गुप्त' असा दिला आहे. पण कोशांत तो तसा सांपडत नाहीं. कदाचित् गुप्त, गुपित, गोपित, गोपी, असें अपभ्रष्ट स्वरूप येथें केलें असावें. पण वाङ्मयांत असें उदाहरण दुसरीकडे सांपडलें नाहीं. **श्लोक १८** – विश्वामित्र आतां पुढें त्या वनाची कथा सांगतात. **तप-स्थानक** – हें वन तपाचें स्थान आहे. पण शापाच्या अग्नीनें तें दग्ध झालें आहे. त्याचा तूं लवकर उद्धार कर. **श्लोक १९**—राम विश्वामित्राला अहि-ल्येचा वृत्तांत विचारतात. **कृतयुगकथा** – कृतयुगांत घडलेली कथा. **सांग** – आरंभापासून शेवटापर्यंत. **गुणीं** – गुणवान् लोकांनीं. गुणी लोकांनीं ही कथा ऐकण्याकडे आपलें चित्त दिलें पाहिजे.

**श्लोक २०** – **बुज** – समज. **मानससुता** – मानसपुत्री. ब्रह्म-देवाच्या मनापासून उत्पन्न झालेली. **तिच्या इ०** – तिच्या ( अहिल्येच्या ) सौंदर्याबरोबर तुलना करतां, स्वर्गीय देवता देखील अगदीं सामान्य वाटत. **विरंची** - ब्रह्मदेव. ब्रह्मदेवानें असा एक अवघड पण केला कीं, " जो कोणी पृथ्वीची प्रदक्षिणा करणाऱ्यांत पहिला येईल, त्याला मी माझी मुलगी देईन." **श्लोक २१** – पृथ्वीप्रदक्षिणा करण्यांत पहिला येऊन ब्रह्मदेवाचा पण जिंकण्यासाठीं इंद्रादिदेवांची लागलेली अहमहमिका येथें वर्णिली आहे. **जवें** – वेगानें. **कल्पम** – क्लृप्ति, कल्पना. ब्रह्मदेवाच्या वरील पणाची कल्पना. **वाक्य जालें**— समजली, सांगण्यांत आली. **तो चालिला इ०**—गौतममुनि ब्रह्मदेवाचा पण जिंकण्यास चालला, व वाटेंत त्याचें मन शुभ

शकुनांनीं शांत झालें. "मन पथीं शकुनें निवालें" असा पाठ असावा असें वाटतें. काव्यसंग्रहानें 'मुनि पथीं शकुनी निवाल' असा पाठ घेतला असून तो मुनि चालला असतां, मार्गांत पक्षी शांत झालें, असा अर्थ केला आहे. पण पक्षी शांत होण्याचा येथें कांहीं संबंध नाहीं, म्हणून तो पाठ स्वीकारला नाहीं. येथें गौतमाला मार्गांत शुभशकुन झाले, असाच खरा आशय आहे.

**श्लोक २२—उभैतोमुखी**—दोनीकडे तोंड असलेली. गाय वीत असतां, तिला एकीकडे स्वतःचे व दुसरीकडे वासराचें अशीं दोन तोंडें असतात. अशा दोनीकडे तोंडें असलेल्या म्हणजे प्रसवत असलेल्या गाईला प्रदक्षिणा घातली असतां, पृथ्वीप्रदक्षिणेचें फळ मिळतें अशी समजूत आहे. म्हणून अशी गाय दिसतांच तीच पृथ्वी समजून गौतमानें तिला सात प्रदक्षिणा घातल्या व ब्रह्मदेवाचा पण जिंकल्याच्या आनंदांत तो त्याच्याकडे आला. **आवर्तनें**— प्रदक्षिणा. **ब्रह्मधाम**—ब्रह्मदेवाचें ठिकाण, सत्यलोक. **श्लोक २३**—गौतमानें पृथ्वीप्रदक्षिणेच्या शर्यतींत पहिला येण्याचा आपला पण जिंकला असें समजून ठरल्याप्रमाणें ब्रह्मदेवानें आपली कन्या त्याला दिली. **नेमवचनें**—नियमित वचनाप्रमाणें, दिलेल्या वचनाप्रमाणें. **वृत्रासुरमथन**— वृत्र राक्षसाचा नाश करणारा, इंद्र. **देखोनि नयनें**—डोळ्यांनीं पाहून. इंद्र आलेला डोळ्यांनीं पाहून, ब्रह्मदेवानें त्याला "आतांपर्यंत कोठें होतां" असें विचारलें, व त्याला घडलेली खरी गोष्ट सांगितली. **तथ्य**—खरी गोष्ट. **विषम**—वांकडें. **श्लोक २४—कमळासनें**—ब्रह्मदेवानें. इंद्र कपट करणार हें ब्रह्मदेवाला ठाऊक होतें. **परतें**—पलीकडे, आपल्यापासून दूर. "अहिल्येला आपल्यापासून दूर कधीं करूं नको, ज्यावेळीं हिला आपणापासून दूर ठेवशील, त्यावेळीं इंद्र फसवील, दगा देईल." **ठकिल**—फसवील.

**श्लोक २५—वासर**—दिवस. **संक्रमिले**—गेले. **शतमखं**—इंद्रानें टपून बसतां बसतां दिवस साधला. अहिल्येला फसविण्याची संधि साधली. **पर्वणि**—पुण्यकाळ. **सूर्यपरागिंची**—सूर्यग्रहणाची. पहा—

चंद्रासि लागति कळा उपराग येतो । —दमयंतीस्वयंवर–५. **तिची**–त्या पर्वणीची, त्या पुण्यकाळीं घडलेली. **श्लोक २६**–गौतम सूर्यग्रहणाची पर्वणी साधण्यासाठीं आपल्या पत्नीसह वैतरणी नदीस स्नानास गेला. **रमणी**—पत्नी, अहिल्या. **वैतरणीस**—विंध्यपर्वतापासून निघणाऱ्या नदीस. **संतर्पणी**–संतर्पण करण्यासाठीं. देव, पितर यांना उद्देशून उदक देण्यासाठीं. **पर्वणी साधणें**—सूर्यग्रहण अथवा चंद्रग्रहण हा काल पर्वकाल समजला जातो, व तो काल संपण्याच्या आंत समुद्रस्नान, श्राद्ध, पितृतर्पण, दान इ. पुण्यकर्में उरकून घेणें. अशा कालांत पुण्यकर्में केलीं असतां कोटिगुणित फळ प्राप्त होतें अशी श्रद्धाळू समजूत आहे. **मोक्षांतीं**–ग्रहण सुटल्यावर. **पाककरणीं**—स्वैपाक करण्यास. ग्रहण सुटल्यावर भोजन करावयाचें म्हणून गौतमानें अहिल्येस स्वैपाक करण्यास आपल्या अगोदर घरीं पाठविली. हीच अहिल्येला एकटी गांठण्याची संधि टपून बसलेल्या इंद्रानें साधली.

**श्लोक २७**–इंद्र गौतमाचें रूप घेऊन अहिल्येकडे येतो. **रती**—संभोग. **कामज्वरें**—कामविकारानें पेटलेला. **ते**–अहिल्या. “ दिवसा संभोग वर्ज, हा शास्त्रार्थ तुम्हास टाऊकच आहे.” अहिल्येला तो कपटी इंद्र उमगला नाहीं. त्यानें गौतमाचें रूप घेतल्यानें तो तिला आपला पति गौतमच वाटला. म्हणून गौतमालाच उद्देशून ती बोलते. **नेंदी कदा भाउका**–“मला माझें हित साधावयाचें असल्यामुळें, अशा दिवसाढवळ्या मी तुम्हांला कधींच संभोग देणार नाहीं.” येथें “ भाउका ” ही चतुर्थी घ्यावी. पण ‘ भाउका ’ हे संबोधन घेतल्यास, “ हे भाविका ! तुम्हांला मी संभोग कधीं दिला नाहीं ? पण अशावेळीं तुम्हीं कसा अधर्म करता हें चांगलें कां ? ” असाही अर्थ होईल. **भाउक**–हित, कल्याण, अथवा भाविक. **श्लोक २८**–**तो**—गौतमरूपी इंद्र. **मृगशावलोलनयना**—हरिणबालकांच्या डोळ्याप्रमाणें चंचल आहेत डोळे जिचे अशी. **सामर्थ्यवंतापुढें** इ. —माझ्यासारख्या प्रभावी माणसापुढें मूर्ख शास्त्रांना दोषादोषविचार कांहीं समजत

नाहीं. त्यांचीं वचनें म्हणजे नुसते वेडेचार आहेत. म्हणून शास्त्रवचन विचारांत घेण्याचें कारण नाहीं. **चार करणें**—वेडेवांकडे आक्षेप घेणें, बडबड करणें. **कोपें इ०** – " ज्याच्या अंगांत सर्व त्रिभुवन भस्म करण्याचें सामर्थ्य आहे, त्याला दिवसा संभोगाचा दोष कांहींच करूं शकत नाहीं. मी शाप देण्याला तसाच अनुग्रह करण्यालाही समर्थ आहे. मला ब्रह्मा व इंद्र हे देव वंदन करतात. "

**श्लोक २९**— गौतमरूपी इंद्र पुढें आणखी युक्तिवाद करतो. **स्वक्षेत्रीं**- आपल्या पत्नीच्या ठिकाणीं. " आपल्या पत्नीच्या ठिकाणीं स्वेच्छेनें केव्हांही रममाण होण्यास दोष नाहीं. " असा शास्त्रार्थ त्या कपटी इंद्रानें पुढें केला आहे. **आच्छादूं इ०** — " तुला दिवसाचीच शंका येत असेल, तर हें सूर्यबिंब झाकून टाकून अंधार करूं काय ?" दिवसा सूर्यालाही झांकून टाकण्याचें सामर्थ्य आपल्या पतींत आहे हें अहिल्येला माहित होतें, म्हणून ती इंद्राच्या या भुलथापांना भुलली. **शास्त्रार्थीं** – शास्त्रवचनांत. या श्लोकाच्या पहिल्या ओळींत सांगितलेल्या शास्त्रवचनांत. **गोंविले**—आडकविलें. **दिजे**— दिला. **श्लोक ३०—रतांतसमयीं**— संभोग घेतल्यानंतर इंद्रानें आपलें खरें रूप प्रगट केलें, व मग अहिल्येलाही आपली दुःस्थिति कळून चुकली. **दुर्गती** - आपली शोचनीय स्थिति, भ्रष्ट स्थिति. **कंटाळणें** – त्रासणें, उद्वेग वाटणें. **कवण पैं वर्जी** – "ज्यानें तपाचें वर्धन केलें आहे अशा गौतमाचें कोण निवारण करूं शकेल ? " असें अहिल्या त्या कपटी इंद्राला बोलते. **श्लोक ३१** – इंद्रअहिल्येच्या संभोग-कालीं गौतमऋषी नदीहून आपल्या आश्रमाला आला. **परगामिनी** – आपली पत्नी परपुरुषाशीं रत झाली, हें गौतमाला अंतर्ज्ञानानें समजलें. **पाचारी** – विचारलें. गौतमानें इंद्राला आश्रमाच्या बाहेरूनच विचारलें. **आशंका** – भीति. **पाकशासन** - इंद्र. अहिल्येनेंही इंद्राचा धिक्कार केला, तो पुढील श्लोकांत दिला आहे.

**श्लोक ३२ – झिडकिला** – धुडकावला, धिक्कार केला. **माजार-वेशें** – मांजराच्या रूपानें. इंद्र मांजराच्या रूपानें दडला. गौतमाची त्याला भीति वाटली. **इंद्रगोप** – तांबड्या किंवा हिरवट रंगाचे मखमली किडे पावसाळ्याच्या प्रारंभीं निघतात ते. कदाचित् इंद्रानें त्याचें रूप घेतलें म्हणूनच त्यांना तसें नांव पडलें असावें. **सहसा** – अकस्मात्. गौतमाच्या तो जातां जातां दृष्टीला पडला. गौतमानें आपल्या झारींतील पाणी शिंपडून इंद्राला त्याच्या खऱ्या स्वरूपांत आपल्यापुढें उभा केला. इतकें त्याचें मंत्र-सामर्थ्य प्रभावी होतें. **विषयता** – कामुकता. इंद्रासारख्या देवाधिदेवानें प्राकृत मानवाप्रमाणें दुष्ट कामुकतेला बळी पडावें, याबद्दल गौतमाला विस्मय वाटला आहे. **वोखटा** – वाईट. **श्लोक ३३** – म्हणून गौतम इंद्राला शाप देतो. "ज्या भागाच्या ठिकाणीं तूं रममाण झालास, तशींच हजारों छिद्रें तुझ्या अंगाला पडतील." **लुति** – लूत. हा एक त्वचारोग आहे. कुत्र्यालाही लूत भरते, तशीच लूत तुझ्या अंगांतून गळून तुझें शरीर सडून जावो असा गौतमाचा शाप. **आच्छादी** – झांकून घेतलें. इंद्रानें लाजेनें आपलें तोंड झांकून घेतलें. **सर्वांगीं इ०** – गौतमाच्या शापवाणी-प्रमाणें इंद्राच्या सर्वांगावर छिद्रें पडल्याची स्थिति प्रत्यक्ष अनुभवाला आली. **बाणली** – ठसली. **उश्शाप** – शापाची तीव्रता कमी करणारें वचन. इंद्रानें भिऊन जाऊन आपल्याला दिलेला शाप कमी व्हावा म्हणून गौतमा-जवळ तशी मागणीदेखील केली नाहीं. **श्लोक ३४** – **युग** – जोडी. **दंड** – शिक्षा. **ऐरावत** – इंद्राचा हत्ती. **शतक्रतु** – इंद्र. **स्त्रीशीं** – अहिल्येला गौतम बोलला. **तूं कैशी इ०** – "तूं इंद्राशीं रममाण होऊन पुनः त्याला पळ असें कसें म्हणालीस?" यावरून इंद्राला अहिल्येची देखील फूस अगर अनुमति असावी, असा गौतमाचा संशय दिसतो, म्हणून त्यानें त्या दोघांना शाप दिला. **कां लत्ताप्रहरें इ०** – गौतमाचा अभिप्राय असा कीं, इंद्राच्या व्यभिचारकर्मांत जर अहिल्येचें अंग नव्हतें, तर तिनें त्याला लाथ कां मारली नाहीं? 'पळून सुटून जा.'

असें ती त्याला कां म्हणाली ? यावरून अहिल्यासुद्धां शापाला तितकीच पात्र ठरवून गौतमानें तिला, 'शिळा होऊन पड' असा शाप दिला. **श्लोक ३५** – अहिल्या आपल्याकडून घडलेल्या दोषांचें समर्थन करतें. ते– अहिल्या. ती गौतमाला म्हणते, "इंद्रानें तुमचें रूप धारण केलें, शिवाय त्यानें 'पतीला आपल्या पत्नीशीं केव्हांही रममाण होण्यांत दोष नाहीं' असा शास्त्रार्थ सांगितला. मी तर निर्दोष आहे, ही सर्व घटना केवळ दैव· योगानें घडून आली !" हें ऐकून गौतमानें अहिल्येला उःशाप दिला. **जल्पे** – बोले. **सुधासौरस्यी**—अमृताच्या गोडीनें, अमृततुल्य. **श्री-रामांघ्रि इ०**—श्रीरामाच्या पदकमलाचे रजःकण. श्रीरामाच्या पायाची धूळ लागताच तूं पुनरपि तुझें पूर्वींचें शरीर पावशील. तूं पुनः अहिल्यारूप धारण करशील. **श्लोक ३६** – **मळरूप**—पापरूप. **कुंडाग्निनें**—यज्ञकुंडांतील अग्नीनें. पर्णकुटी जळून सर्वत्र शून्य झालें.

**श्लोक ३७– मृगासन** – हरिणाजिन. हें झाडून गौतमानें तें वन सोडून जाण्याची तयारीच केली ! **एणें**— गौतमानें. **श्लोक ३८— नीडें**– घरटीं. पक्ष्यांनीं आपलीं घरटीं सोडलीं. **समूळाग्रपत्रें** – मुळा-पासून शेंड्याच्या पानापर्यंत वृक्ष वाळून गेले. **गतक्रोध**– राग शांत झाल्यावर मात्र गौतमाला पश्चात्ताप प्राप्त झाला. **श्लोक ३९**– गौतमाला मेरुपर्वतावर तपःश्चर्येला जावें लागलें. **घाला घालणें**– छापा घालणें. इंद्रानें गौतमाच्या अहिल्येवरच केवळ छापा घातला नाहीं, तर गौतमाला आपल्या कपटी वर्तनानें क्रोधाला चढवून त्याच्या तपावरच त्यानें घाला घातला ! क्रोधाला चढून गौतम आपल्या दीर्घकालीन तपाचें पुण्य गमावून बसला. **पश्चात्तापें इ०**– आपण इंद्राला व अहिल्येला व्यर्थ शाप दिला असा त्याला पश्चात्ताप झाला, व त्यामुळें त्याचा इंद्र–अहिल्येवरील क्रोध शांत झाला. **श्लोक ४०**– शांतरस व वीररस यांच्यांत मूलतःच विरोध आहे. **तिमिर**– अंधार. **दुरित**– पाप. या श्लोकांत दोन विरोधी गोष्टी

एकत्र राहूं शकत नाहींत, याबद्दल निरनिराळे दृष्टांत देऊन गौतमाच्या पश्चात्तापापुढें त्याचा क्रोध राहणें शक्य नव्हतें, हें ध्वनित केलें आहे. **श्लोक ४१– आपुला घात केला–** आपल्या तपःपुण्याचा नाश करून घेतला. **लिंपिली –** मा^ख^ली.

**श्लोक ४२–**गौतम पश्चात्तापपूर्वक म्हणतो. " ज्या अर्थी अहिल्ये. कडे कांहींच दोष नाहीं, त्याअर्थी खरें काय तें न समजून घेतांच मीं तिला शापली. इकडे इंद्रही कांहीं सामान्य व्यक्ति नव्हे. तर तो सर्व देवांचा अभिमानी ! अशांना क्रोधानें शाप देण्यांत मीं व्यर्थ पुण्यहानि करून घेतली. " **श्लोक ४३ –** " कोणत्याही कन्येच्या कौमारावस्थेंत चंद्र, अग्नि व गंधर्व हे तिघे प्रत्येकीं दोन वर्षें तिचा उपभोग घेतातच, त्याचा प्रत्यवाय कोणता योगी धरतो ? " गौतमाचें म्हणणें असें कीं, प्रत्येक कुमारीचा जर चंद्र, अग्नि व गंधर्व यांच्याकडून उपभोग घेतला जातोच, तर अहिल्येच्या कौमारावस्थेंतही तसेंच घडलें असलें पाहिजे. मग त्याला जर आपण आक्षेप घेतला नव्हता, तर आतां इंद्रानें अहिल्येचा उपभोग घेतला म्हणून तरी आपण कां क्रोधास चढावें ? इंद्र देखील चंद्र अग्नीप्रमाणें देवच नाहीं काय ? आपण व्यर्थ क्रोधास वश झालों याबद्दलची गौतमाची ही पश्चात्तापोक्ति आहे. **सुरतानुरागी–**उपभोगाची इच्छा धरणारे. **दुर्बाध**-प्रत्यवाय. **श्लोक ४४–**" शिवाय जो विराटस्वरूपीं ईश्वर जगाचा केवळ प्राण असून प्रत्येक प्राण्याच्या देहांत प्राणरूपानें राहतो, चंद्र हा ज्याचें मन, व सूर्य ज्याचे डोळे, त्याच्याच मुखापासून इंद्र व अग्नि उत्पन्न झाले. " गौतमाचें म्हणणें असें कीं, विराटस्वरूपी परमेश्वराच्या तोंडांतून निघालेल्या इंद्राकडून आपल्या पत्नीचा देह विटाळला गेला असल्यामुळें, ती गोष्ट विचारांतच घेण्यासारखी नाहीं. कारण प्रत्येक प्राण्याच्या देहांत विराटस्वरूपीं ईश्वर प्राणरूपानें राहतो, ' तसा तो अहिल्येच्याही ठिकाणीं आहेच. आणि अशा विराटस्वरूपाच्या तोंडांतून निघालेला इंद्रही विराटस्वरूपाचा अंशच असल्यानें, ईश्वराच्या विराटस्वरूपाच्या नात्याच्या दृष्टीनें विचार केल्यास,

अहिल्या व इंद्र दोघेही विराटस्वरूपाचेच अंश ठरतात. म्हणजे त्या दोघांत द्वैत नाहींच. मग त्यांच्यांत व्यभिचार घडला असें तरी कसें मानतां येईल? गौतम येथें वेदान्ताच्या दृष्टीनें आपलें समाधान करून घेत आहे. वेदांताच्या भूमिकेवरून पाहतां, इंद्रावर व अहिल्येवर आपण क्रोध धरला हें अनुचित केलें, असेंच त्याला ध्वनित करावयाचें आहे. **अर्यमा**— सूर्य. **भूत**—झाले, उत्पन्न झाले. **श्लोक ४५**— गौतम शेवटीं, "व्हावयाचें तें टळत नाहीं, ब्रह्मादिदेवांनासुद्धां भोग सुटत नाहीं, यावरून ईश्वरेच्छा बलीयसी" असें म्हणून, आपल्या क्रोधाची व्यर्थता दर्शवितो. "ब्रह्मदेवाला जिथं आपत्ति सुटली नाहीं, तिथं आपला काय पाड!" असंच गौतमाला सुचवावयाचें आहे. जो गोष्ट व्हावयाचीच हें ठरून गेलं होतं, ती होणारच. अहिल्येकडून असें अपकृत्य होणार हें जर पूर्वींच ठरलेलें होतें, तर त्याबद्दल क्रोध बाळगून तरी काय फायदा? **प्रमाणीं**—प्रत्यंतरासाठीं. "होणार तें टळत नाहीं," याच्या प्रत्यंतरादाखल अनेक ऋषी वेदवाणी बोलून गेले आहेत.

**श्लोक ४६**—**संग्रह**-पुण्यसंचय, सांठा. **संदग्ध करावयातें**-जाळून टाकण्यासाठीं, नाहींसा करण्यासाठीं. **प्रस्थान**— प्रस्थान=प्रवासास निघणें, प्रयाण करणें. **श्लोक ४७** रामाचें परब्रह्मस्वरूप जाणूनच विश्वामित्रानें त्याला अहिल्येची हकीकत साग्र सांगितली. **आत्माराम**—परमात्मा. **गुणाभिराम**— गुणांनीं सुंदर असणारा, गुणमंडित. **त्यातें म्हणें**—राम विश्वामित्राला म्हणतात. **ते पैं इ०** - तिला तूं खचित उद्धरशील. **उश्याप** - अहिल्येच्या शापाचा परिहार कसा करावयाचा हें तूं जाणतोस. तुझ्याचकडून तिचा **उद्धार** व्हावयाचा आहे, असा अर्थ. **श्लोक ४८** — विश्वामित्र रामाला अहिल्येची शिळा कोठे आहे तें सांगतो. **पसरिली** — लांब-सडक् अशी पडलेली आहे. अहिल्येच्या देहाचीच शिळा-झाल्यामुळें ती लांबच लांब अशी पडली होती. **वंशातळीं** — वेळूच्या वेटाच्या मुळाशीं. **शापीळ इ०** — रामाला वाटलें कीं, आपण जर त्या

शिळेला पाय लावला, तर तिच्यांतील अहिल्या आपल्याला कदाचित् शापील. अशा पतिव्रतेच्या शिळेला पाय कसा लावायचा अशी शंका रामाला वाटली. पण विश्वामित्रानें त्याची खातरजमा करून आपल्या पायांच्या रजःकणानें तिचा उद्धार करण्यास सांगितलें. **पादक्षालन** – पाय धुवून. कोणतेंही पवित्र कार्य करण्यापूर्वी हातपाय धुण्याचा आपला आचार आहे. **आचमन**–तळहातावरून संध्येच्या पळीभर पाणी पिणें. हाही वरीलप्रमाणेंच आचार आहे. **रामांघ्रि** – येथें वास्तविक रामानें आपला पाय शिळेला लावला आहे. पण 'रामांघ्रि' असा समास घेतल्यास 'रामाचा पाय' विश्वामित्रानें त्या शिळेला लावला असें समजावें लागेल. 'राम अंघ्रि' अशीं भिन्न पदें असतां, कवीनें येथें संधि केला आहे. **श्लोक ४९ – समेत** – बरोबर. **ते** – शिळा. **जडतां** – लागतांच **पूर्वस्थिति** – अहिल्येचा पहिला मनुष्यदेह तिला प्राप्त झाला. **तपोवर्धना** ज्यानें आपलें तप वाढविलें आहे अशा विश्वामित्राला. **मूर्धना** – मस्तक.

**श्लोक ५० – मिलिंदें**—भृंग. रामाच्या पदकमलदर्शनासाठीं देव देखील भृंग झाले, उत्सुक झाले असा अर्थ. **श्लोक ५१**—अहिल्या रामाची स्तुति करते. **कैवल्यधाम** – मोक्षाचें माहेरघर अशा. **निगम**– वेद. राम हा परमात्मस्वरुप असल्यानें त्याचें स्वरूप वेदांना देखील कळलेलें नाहीं. म्हणून "नेति नेतीत्यात्मा" असें उपनिषद्वचन आहे. **वामांगिं रामा** – ज्याच्या डाव्या बाजूला त्याची पत्नी (सीता) बसलेली आहे असा. "वामांकारूढ सीता मुखकमलमिलल्लोचनं नीलकंठम्" असें रामाचें ध्यान वर्णन केलें आहे. पण येथें तर सीतेचें स्वयंवर अजून व्हावयाचें आहे. मग त्याच्या वामांगीं सीता आली कोठून? हा कालविपर्यासाचा दोष कवीच्या लक्षांत आला नाहीं. येथें 'वामांकिं' असा पाठ पाहिजे होता. **उमाकांत** – शंकर. हा रामाचा भक्त असून तो रामाचा सारखा जप करतो अशी कथा आहे. पहा— "निशिदिनिं शितिकंठा हा जपाचाच धंदा" –

सामराज. रु. इ. किंवा ' तूझ्या पदांबुजरजःस्नपनें शिवाला । अज्ञाननाशन-महोत्सव थोर जाला '॥– सामराज. रु. इ. ५।१०० **मोक्षार्थ इ०**—धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारी पुरुषार्थ तूं भक्ताला साधून देतोस. **अमृत-पद**—मोक्षपद, निर्वाणपद. पहा— " यद्गत्वा न निवर्तते तद्धाम परमं मम "— गीता. **पूर्णकामा**— भक्तांच्या इच्छा पूर्ण करणारा. **सामा-विशी**– भक्तांचें अन्याय तूं पोटांत घालतोस. येथें " द्वादशकमलबंध " नामक बंध साधला आहे. या श्लोकाच्या ओळींत २१ अक्षरें असून, त्या-पैकीं सातव्या अक्षराला ' मा ' यानें यमक साधलें आहे, व हें ' मा ' अक्षरच या सहा सहा अक्षरांच्या प्रत्येकी पाकळयांच्या कमळाचें देठ आहे. अशा सहा सहा अक्षरांच्या पाकळया एकंदर बारा होतात, म्हणून याला द्वादशकमलबंध म्हटलें आहे.

**श्लोक ५२** – आपल्या पत्नीचा रामानें उद्धार केला, हें गौतमाला अंतर्ज्ञानानें समजलें. **समीरोपमा** – वायुवेगानें, शीघ्रगतीनें. याचा संबंध 'आला' या क्रियापदाकडे आहे. **साकार ब्रह्म** – परब्रह्म हें निर्गुण निरा-कार आहे, तेंच रामाच्या रूपानें साकार होऊन आलें आहे, अशी गौत-माची स्तुति. **श्लोक ५३** – **वेदमंत्रीं** – वेदमंत्रोच्चारपूर्वक. **विधानोक्त**—शास्त्रांत सांगितलेल्या विधीप्रमाणें, पद्धतीप्रमाणें, **तंत्रीं** – तंत्राप्रमाणें. तंत्र= धार्मिक विधींतील मंत्राप्रमाणें हातानें करावयाच्या क्रियांचा समुदाय, पूजा इत्यादिकांतील आचार, प्राणायाम; षडंगन्यास इ. बाह्य कर्मं तंत्रांतच येतात. गौतमाला अहिल्या पुनरपि मंत्रतंत्रोक्त दिली असा अर्थ. **गीर्वाण**—देव. **ऋषीकारणें** – ऋषीला. द्वितीयेसाठीं ' कारणें ' हें अव्यय जोडलें आहे. **श्लोक ५४** – ब्रह्मदेवादि देवांची गौतमाला प्रार्थना. **समस्तां इ०** – सर्व देवांना तो पुनरपि मान्य होवो. गौतमाच्या शापानें इंद्राचें स्थान भ्रष्ट झालें होतें; तर पुनः त्याला त्याच्या पूर्वस्थळीं स्थापा अशी प्रार्थना. **श्लोक ५५**-गौतमाचें उत्तर. **समुद्रांतुनि** – इंद्र गौतमशापामुळें समुद्रांत दडी मारून

बसला होता. **वदे** – गौतम इंद्राला म्हणाला. **सर्व सेवी** – यज्ञांतील सर्व हविर्भाग तूं पूर्वींप्रमाणेंच घेत जा. **श्लोक ५६ – भगांचे** – इंद्राच्या अंगावरील छिद्रांचे डोळे झाले. **साक्षि चाले**- असें प्रत्यक्ष प्रमाण घडलें. इंद्राला त्या दिवसापासून ‘ सहस्राक्ष ’ हजार डोळयाचा असें नांव मिळालें. **श्लोक ५७ – तपोधन**-तप हेंच धन ज्याचें असा गौतम. **ऋषि**- विश्वामित्र. **बंधु**–लक्ष्मण. **जगवंदनमूर्ति**–महेश, शंकर. विश्वामित्र, राम व लक्ष्मण हे तिघे त्या रथावर ब्रह्मा, विष्णु, महेशाप्रमाणें शोभले. **श्लोक ५८–वाल्मीकिची** -रामायणकर्ता आद्य कवि. त्याच्याच काव्याच्या आधारानें आपण हें काव्य रचिलें, असें विठ्ठल सांगतो. **उलथा**–संस्कार, ठसा. **वित्पन्न**—व्युत्पन्न, विद्वान लोक, आपला हा दुसरा सर्ग कानांनीं ऐकोत, अशी विठ्ठलाची विनंति.

---

# सर्ग तिसरा



विठ्ठल कवि आपल्या काव्यरचनेला आधारभूत असलेल्या संस्कृत व प्राकृत ग्रंथांचा उल्लेख करतो. **हनुमंत नाटक** – हें नाटक मिश्रमोहनदास या नांवाच्या कवीनें संस्कृतांत रचलें असून, त्याचे १४ अंक आहेत. यांत रामाच्या स्वयंवरापासून त्याच्या लंकाविजयापर्यंतचे प्रसंग वर्णन केले आहेत. शिवकालांतील मुक्तेश्वर, नागेश, आनंदतनय, अनंत अित्यादि सीतास्वयंवरावर रचना करणाऱ्या मराठी कवींनीं या नाटकाच्या जरूर त्या भागाचा अनुवाद केला आहे. **रघुवंश**—कालिदासाचें हें महाकाव्य १९ सर्गांचें असून त्यांत दिलीपापासून लवकुशापर्यंतच्या रघुवंशाचें वृत्त वर्णन केलें आहे. **आदिकविप्रमेय** – वाल्मीकि हा आद्य कवि असून त्याचा रामायण हा रामचरित्रपर ग्रंथ सिद्धांतस्वरूपाचाच आहे. **प्रमेय** – सिद्धांत. **गिरा-देशिची** – देशी भाषा जी मराठी, तिच्यांतील कांहीं रचना. विठ्ठलानें आपल्या सीतास्वयंवराला कोणते मराठी काव्यग्रंथ आधाराला घेतले होते, याचा स्पष्ट उल्लेख त्यानें केलेला नाहीं. **पद्यें सार्थक** – विठ्ठल अशी ग्वाही देतो कीं, आपली पद्यरचना अर्थपूर्ण असून, त्यांत वाचकांना पाद-पूरणासाठीं अधिक अक्षरांची किंवा शब्दांची भरती करावी लागणार नाहीं. आपली वाणी जशी अर्थवाहक आहे, तशीच आपली पद्यरचना देखील वृत्त-शुद्ध आहे, असा त्याला विश्वास आहे. **पादपूर्ति** – वाक्याच्या किंवा श्लोकाच्या चरणाची भरती. **गौणाक्षरें** – कमीजास्त अक्षरें. आपल्या कवि-तेंत उगीच वावगीं अथवा फालतू अक्षरें सांपडणार नाहींत, असें कवि बजा-वतो. **चैत्रींचे इ०**—असा हा आपला रामचरित्रपर काव्यग्रंथ रामनवरा-त्रांत चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून रामनवमीपर्यंत ९ दिवस वाचला जावा, तो वाचण्यालायख आहे, अशी कवीची अपेक्षा आहे.

**श्लोक २** – राम, लक्ष्मण व विश्वामित्र अहिल्येचा उद्धार करून त्या भद्रवनांतून मिथिलेकडे निघाले. या सर्गांत रामाच्या मिथिला प्रवेशाचें वर्णन येणार आहे. **स्यंदन** – रथ. **वायुगतीं** – वायुवेगानें. **भाट अचाट** – असेंच वर्णन पहिल्या सर्गाच्या ४६ श्लोकांत आलें आहे. तुलनेसाठीं सर्ग २ श्लोक ११ ही पहावा. **श्लोक ३** – राम, लक्ष्मण व विश्वामित्र हे जणु श्रृंगार, हास्य व करुणरसांच्या मूर्तीच होत्या. पण विश्वामित्रासारख्या कोपिष्ट माणसाला करुणरसाची मूर्ति म्हणण्यांत काय स्वारस्य आहे ? शिवाय लक्ष्मणाचा तरी हास्यरसाशीं काय संबंध, हें समजणें कठीण आहे. **साक्षिपूर्ति** – साक्षीभूत, साक्षात्. **श्लोक ४** – रामाच्या रथाचें वर्णन. **वर्णूं सके** – 'वर्णूं सके' या क्रियापदाचें 'वेगासि' हें कर्म घ्यावें. **मलयानिळातें** – मलयपर्वताकडून येणाऱ्या वाऱ्याला देखील तो रथवेग कुंठित करीत होता, थोपवीत होता. **गाती इ०** – काव्यसंग्रहाचा पाठ घेतल्यास 'गाती' याला कर्ताच दिसत नाहीं, म्हणून तो पाठ स्वीकारला नाहीं. **श्लोक ५** – **जान्हवी** – गंगा. **भर्गचित्ताभिरामें**–शंकराच्या मनाला आनंद देणाऱ्यानें अर्थात् रामानें. शंकर रामाचा भक्त असल्यानें, राम हा त्याला आनंद देणारा आहे. **असा प्रश्न** – रामानें गंगावतरणाची कथा विश्वामित्राला विचारली, व त्यानें ती त्याला सांगितली. **श्लोक ६** – विश्वामित्र सांगतो. **सगर** – इक्ष्वाकुकुलोत्पन्न हरिश्चंद्रवंशीय बाहुक राजाचा पुत्र होय. त्याला विदर्भ देशाचा राजा यदु याची कन्या सुमति व शिबि देशच्या राजाची कन्या केशिनी अशा दोन बायका होत्या. त्यांत पहिलीला साठ हजार व दुसरीला असमंजा नांवाचा एकच, याप्रमाणें पुत्र झाले होते. सगरानें अनेक यज्ञ करून अश्वमेधही शतावधि केले. त्यांतील एका अश्वमेधांतील श्यामकर्ण अश्व इंद्रानें हरण केला, त्याचा साठ हजार सगरपुत्र शोध करूं लागले. परंतु त्याचा कोठें ठिकाणा लागेना, म्हणून त्यांनीं समुद्र खणला. तथापि तेथें अश्व न सांपडतां, कपिलऋषीच्या आश्रमांत तो सांपडला. तेव्हां कपिलमुनि हाच

अश्वहरणकर्ता असावा असें वाटून, ते त्या समाधिस्थ ऋषीस मारूं लागले. इतक्यांत कपिलानें नेत्र उघडून सगरपुत्राकडे पाहतांच ते सर्व दग्ध झाले. इकडे सगरराजा यज्ञदीक्षा घेऊन बसलेला, तर तिकडे पुत्रांचा असा परिणाम झालेला. असमंजा पुत्र जवळ होता, पण तो पूर्वीच अरण्यांत गेलेला असल्यानें, राजाला यज्ञसमाप्तीचें मोठें संकट पडलें. पुढें असमंजाचा पुत्र समद्दश (अंशुमान्) यानें तो अश्व मोठ्या युक्तीनें कपिलाकडून आणून सगराचा यज्ञ सिद्धीस नेला. यज्ञ पूर्ण होतांच सगरानें समद्दशास (अंशुमानास) राज्यावर बसवून आपण तपार्थ अरण्यांत गेला. **सूर्यांशिचा** – सूर्यवंशांतील राम हा इक्ष्वाकुकुलोत्पन्न व सूर्यवंशी होता. सगर त्याचा पूर्वज ठरतो. **घोडा** – अश्वमेध यज्ञांतील घोडा अगोदर पृथ्वीवर भ्रमणार्थ सोडावयाचा, व जो कोणी राजा त्या घोड्याला धरील त्याला त्या यज्ञकर्त्यानें जिंकायचें, अशा तऱ्हेनें पृथ्वीवरील सर्व राजे जिंकून झाल्यावर मग त्या घोड्याचा यज्ञ करावयाचा, अशी पद्धति होती. येथें त्या साठसहस्र सगरपुत्रांनीं आपल्या सामर्थ्यानें पृथ्वीवरील सर्व राजांना जिंकलें होतें. **गोत्रापती** – पृथ्वीपती, राजे. **शतक्रतु** – इंद्र. ज्या कोणाच्या यज्ञांची संख्या शंभरपर्यंत येई, त्याच्या यज्ञांत इंद्र विघ्न आणणार हें ठरलेलेंच असे. कारण ज्याच्या हांतून शंभर यज्ञ होतील त्याला इंद्रपद मिळावयाचें असा नियम होता, व त्यामुळें आपलें स्थान जाईल अशी इंद्राला नेहमींच भीति वाटे. म्हणून तो अशा यज्ञांत कांहींतरी विघ्न आणीच. येथें सगराच्या यज्ञाचा घोडाच पाताळांत नेऊन इंद्रानें अडथळा उत्पन्न केला आहे.

**श्लोक ७– बिंदुसरोवर** – भागीरथीचा ओघ शंकरांनीं मस्तकीं धारण केला, त्यांतून जे बिंदू भूमीवर पडले, त्यांपासून झालेलें सरोवर तें. हें हिमालयाच्या हिरण्यशृंग नामक शिखराच्या पायथ्यासमीप आहे. **सगर**– सगरपुत्र. **जालें तुरंगें पिसें**– घोड्यामुळें वेडे झाले, त्यांची अगदीं वेड्यासारखी स्थिति झाली. **होतें बंधन इ०**– इंद्रानें तो घोडा पाताळांत

कपिलऋषीच्या आश्रमांत त्यांच्या पाठीमागें बांधून लपवून ठेवला होता. **नेणोचि तो तापसी**- ही गोष्ट कपिलाला ठाऊक नव्हती. आपल्या मागें हा सगराचा घोडा इंद्रानें बांधला आहे, याची त्या ऋषीला कल्पना नव्हती. **वारुसी**- घोड्यास. **श्लोक ८- खाणितलें**- खणून काढलें. सगरपुत्रांनीं समुद्र खणला म्हणून त्याला 'सागर' असें नांव मिळालें. **धुंडित इ०**- घोड्याला हुडकीत हुडकीत ते सैन्यासह बिळांबिळांतून येत होते. **शामल-कर्ण**-ज्याचे कान काळे आहेत, असा सुलक्षणी घोडा. **समाधिस्थि इ०**- कपिलमुनि त्यावेळीं समाधि लावून बसले होते, त्यांच्या मागेंच इंद्रानें घोडा बांधला होता. सगर कपिलालाच घोड्याचा चोर समजून, त्याच्यावर ते तुटून पडले, व त्याचे अपराधी झाले. **यकसरें पडले**- एकदम तुटून पडले. **श्लोक ९ – जळा इ०**— कपिलानें त्यांना 'तात्काळ जळून जा' असा शाप दिला. **नेत्रानळें**- कपिलाच्या डोळ्यांतील अग्नीनें. कपिलानें त्यांना आपल्या क्रुद्ध दृष्टीनें जाळून भस्म केलें. **श्लोक १०**— इकडे सगरपुत्र कपिलाच्या रागानें जळून गेल्यामुळें, त्यांचें काय झालें हें सगर-राजाला समजेना, म्हणून तो चिंताक्रांत झाला. **समदृश** (अंशुमान्) हा असमंजाचा पुत्र व सगराचा नातू, हें वर सांगितलेंच आहे. **म्हणिजे**- म्हणून. **शुद्धि**— शोध. **त्यांची** — साठ हजार सगरपुत्रांची म्हणजे आपल्या चुलत्यांची. **विवरद्वारमार्गीं**- पृथ्वी खणून भोंक पाडलें होतें, त्याच्या तोंडाला.

**श्लोक ११ – पाताळीं**—कपिलाचार्यांचा आश्रम पाताळांत होता, तेथें समदृश गेला, व आपले पूर्वज जळत असलेलें त्यानें पाहिले. **तो भाव**- हा जळण्याचा काय प्रकार आहे, त्याचें त्यानें कारण विचारलें, व कपिलानेंही त्याला इत्थंभूत हकीकत सांगितली. **तया**—कपिलास. **उश्यापि**—समदृशानें आपले चुलते जे सगरपुत्र त्यांना मिळालेला कपिलाचा शाप उठविला. **श्लोक १२**—समदृशाची कपिलाला प्रार्थना, पहिल्या दोन ओळींत आली आहे. **संतोषोनि इ.**—समदृशाच्या प्रार्थनेनें संतुष्ट होऊन कपिल म्हणतो.

**श्रीतीर्थचूडामणी** — सर्व तीर्थांचें शिरोरत्न. **महेशमुगुटीं**-शंकराच्या मस्तकावरील. **गंगावणी** — गंगेचें पाणी. " सर्व तीर्थांत श्रेष्ठ असें शंकराच्या मस्तकावरील गंगाजळ आणून त्यानें सगरपुत्रांना स्नान घाल म्हणजे ते उद्धरतील, " असा कपिलानें समदशाला सगरपुत्रांच्या उद्धाराचा मार्ग सांगितला. **न्हाणि**—स्नान घाल. पहा—" शुक्रसुता गर्हिवरली न्हाणी तदुरस्थळाशि अश्रु तिचे । कोणाला न प्रिय तें गुणमणिमय केलिमंदिर. श्रुतिचें "॥- मोरोपंत कचदेवयानी आख्यान. **श्लोक १३ — कळेवर**-शरीर. **पुरश्चरण**—मंत्रसामर्थ्य मिळविण्यासाठीं मंत्रशास्त्रांत सांगितल्या-प्रमाणें मंत्राचें जपानुष्ठान करणें. पुरश्चरण करीत असतां समदशाचें शरीर नष्ट झालें. **भगीरथ**—इक्ष्वाकुकुलोत्पन्न सगरवंशीय दिलीप राजाचा पुत्र. दिलीप राजानें पूर्वजांच्या उद्धारार्थ गंगा प्राप्त व्हावी, म्हणून दीर्घकालपर्यंत तप केलें. परंतु ती सिद्धि त्याला न मिळतांच तो मरण पावला. पुढें राज्यावर आलेल्या भगीरथानें पित्याप्रमाणेच हिमालयावरील गोकर्णक्षेत्रीं सहस्र वर्षें तप केलें. या तपानें गंगा प्रसन्न होऊन त्याच्यापुढें साक्षात् उभी राहिली, व तिला वंदन करून त्यानें " तूं आपल्या जलानें माझ्या पूर्वजांचा उद्धार कर " अशी तिची प्रार्थना केली. गंगेनें भगीरथाचें म्हणणें मान्य करून अलकनंदानामक प्रवाहानें ती पूर्वींच स्थित असलेली, त्याच्यामागून येत येत हिमालयावर येऊन या भरतखंडांत आली, व तिनें त्याच्या पूर्वजांचा उद्धार केला. तेव्हांपासून गंगेस भागीरथी हें नांव मिळालें. या कथेंत भगीरथाला शंकराकडून गंगा मिळाल्याचा उल्लेख नाहीं. पण शंकराच्या द्वारां ती त्याला कशी मिळाली, हें पुढील श्लोकांत सांगितलें आहे.

**श्लोक १४ — कुमंडल**-पृथ्वीचें मंडल. काव्यसंग्रहाचा येथें 'कमंडलु' असा पाठ आहे. पण ब्रह्मदेवाला कमंडलु असण्यास तो कांहीं संन्यासी नाहीं. सबब तो पाठ चुकीचा दिसतो. **ब्रह्मांडसारोदकें**— ब्रह्मांडाचें केवळ सत्त्वच अशा पाण्यानें, ब्रह्मदेवानें हें सर्व पृथ्वीतल भरून

टाकलें. **दानांतीं**–पुढें बळिराजानें बटुवामनवेषधारी विष्णूला दिलेल्या त्रिपादभूमीच्या दानाच्या वेळीं, बळीच्या आचार्यांनीं याच पाण्यानें विष्णूचे पाय धुतले. **बोधक**– आचार्य. **ती धारा इ०** – त्या विष्णुपादोदकाची धार शंकरानें आपल्या शिरावर धरली, व तीच पृथ्वीवर सोडल्यानें जान्हवी या नांवानें प्रसिद्ध झाली. **केलें पूर्वज इ०**—ही गंगेच्या पाण्याची धार कपिलशापानें भस्म झालेल्या सगरपुत्रांच्या राखेला लागतांच ते मुक्त झाले. **देवसरिता**—देवनदी. या नदीला ब्रह्मा, विष्णू, महेशांचा संबंध लाभ- ल्यानें हिला देवसरिता म्हटलें आहे. **पूर्वांबुधि**– पूर्वसमुद्राला. गंगा पूर्वसमुद्राला मिळवून टाकली. **श्लोक १५–आख्यान**-हें गंगेचें आख्यान, कथा. **कौशिककथा**—विश्वामित्रानें सांगितलेली ही गंगेची कथा. **प्रणि- पात**–रामानें गंगेला नमस्कार घातला. **नावकरियाप्रति**—नावाड्यास. **बाहे**—हाक मारी. रामानें नावाड्यास बोलावलें.

**श्लोक १६—गुह्यक**–शृंगबेरपुरीचा किराताधिपति. हा दशर- थाचा परममित्र होता. राम अयोध्येहून दंडकारण्यांत चालला असतां, एक- रात्र शृंगबेरपुरींत राहिला होता, व तेव्हां गुह्यकानें रामाचें आतिथ्य करून रामाला तेथेंच १४ वर्षें घालविण्याचा आग्रह केला. पण रामांनीं तें मान्य केलें नाहीं. नंतर प्रातःकाल होतांच रामलक्ष्मणांनीं आपलें नित्यकर्म उर- कून त्यांस " गंगेपलीकडे दक्षिणतिरीं आम्हांस उतर " म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें यानें राम, सीता व लक्ष्मण या तिघांस गंगेपार उतरिलें. नंतर येथून रामलक्ष्मणास पोंचविण्यास आलेला सुमंत्र अयोध्येस माघारा गेला. गुह्यकाची ही माहिती पुढील रामवनवासप्रसंगींची आहे. यावरून रामाची व गुह्यकाची भेट वनवासापूर्वी म्हणजे विश्वामित्राबरोबर मिथिलेस जातांना प्रथम पडली होती, असें या श्लोकांतील विठ्ठलाच्या उल्लेखावरून दिसतें. **मुहूर्तां इ०** —" प्रयाण करण्यांत मुहूर्त साधण्याचें मोठें कार्य मला करा- वयाचें आहे " असें रामाचें नावाड्यास सांगणें. स्वयंवराचा मुहूर्त साधा- वयाचा असल्यानें आपणांस लवकर प्रयाण करावयाचें आहे, तरी नाव

हाकार, असा रामाचा आशय. **कर्णधार**—नावाडी. पहा—' कर्णधार उतरील उतारीं '—सामराज–रु. ह. ४।१०८. 'वंदे' या क्रियापदास 'राम' हा कर्ता आहे. **श्लोक १७**—या पुढील श्लोकांत गुह्यकानें रामाची स्तुति केली आहे. गुह्यक म्हणतो, " हे रामा ! तुझ्या पदधूलीनें शिळादेही गौतम-पत्नी अहिल्या मुक्त झाली. याची साक्ष विंध्य पर्वतावरील ऋषींनीं प्रत्यक्ष पाहिल्यावर तूं त्या ऋषींच्या इच्छेवरून विंध्यपर्वतावरील दगडांचे स्त्रियांत रूपांतर केलेंस व त्यांची इच्छा पूर्ण केलीस. " रामानें शिळेची अहिल्या केवळ आपल्या पदस्पर्शानें केली असें पाहून, विंध्यपर्वतावरील बऱ्याच ऋषींनीं रामापुढें तेथें पडलेले दगड धरून त्याच्या पदस्पर्शानें त्यांच्या साक्षात् स्त्रिया करवून घेतल्या, व अशारीतीनें तेथील ऋषींची इच्छा रामानें पूर्ण केली. राम असा अद्भुत् चमत्कार करतो असें पाहून, स्त्रीलोलुप ऋषींनीं हावरेपणानें तेथील वाटेल त्या दगडाला रामाचा पाय लावून त्यांच्या स्त्रिया करून घेतल्या, असा प्रसंग नागेश कवीनेंही आपल्या सीतास्वयंवरांत वर्णन केला आहे. पहा—" बळानें शिळा मस्तकीं थोर घेती, । महा धीट ते राघवा नीट येती ॥ तदा राम बोले गुरू न्यायवाचा । ' यदर्थी कसा काय, अन्याय यांचा ? ' ॥१५१॥ नागेश कवीचा या प्रसंगीचा विनोद विठ्ठलांत नसल्यानें, त्यानें हें प्रकरण गुह्यकाच्या तोंडच्या एकाच श्लोकानें कसें तरी आटपलें आहे. तथापि काव्यसंग्रहकारांना अशा प्रसंगाची कल्पना नसल्यानें त्यांच्या प्रतींतील पाठ चुकीचे पडले आहेत. ' उपल युवति ' असे पृथक् शब्द व ' तापसांची ' असा सानुस्वार शद्व येथें अवश्य आहे. त्याशिवाय चांगली अर्थसिद्धि होत नाहीं. **उपल युवति होती**—दगड स्त्रिया झाले. **वासना**—दगडांच्या स्त्रिया बनवून घ्याव्या, ही ऋषींची इच्छा रामानें पुरवली.

**श्लोक १८** — या श्लोकांत गुह्यक रामाला विनंति करतो, "हे रामा ! माझ्यासारख्या दुर्बळाला दुसरी बायको करणें शक्य नाहीं, आपण दगडाची स्त्री बनविता, तर आपण माझ्यासाठीं लाकडांतून स्त्री निर्माण करावी, कारण

दगड व लाकूड हे जडत्वाच्या दृष्टीनें सारखेंच, त्यांत अणुमात्र भेद नाहीं." विंध्यपर्वतावरील ऋषींना, तेथील शिलांच्या स्त्रिया रामांनीं केवळ आपल्या पदस्पर्शानें बनवून दिल्याचें ऐकून, गुह्यकानें येथें आपणासाठीं लाकडांतून स्त्री बनविण्याची रामाला प्रार्थना केली आहे. गुह्यकाचा धंदा नावाड्याचा. त्याचा संबंध नित्य लाकडाशीं. म्हणून त्यानें हातास सांपडलें त्या लाकडांतून स्त्री निर्माण करण्यास रामास सांगितलें आहे. **धुविन इ०**— " आपले पाय धुवून त्यांचे जेव्हा तीर्थ घेईन, तेव्हांच तुम्हांला नावेंत बसवीन " असें गुह्यकाचें रामास निक्षून उत्तर. **श्लोक १९— परपार**— गंगेपार. **सवनादिक**- पावन स्नान. **तिघ**— राम, लक्ष्मण व विश्वामित्र. मध्यंतरीं वाटेंत गंगेवर नित्यकर्म करावयास थांबून ते पुढें मिथिलेस जावयास निघाले. **पवनानुवेगें**— वायुगतीनें. **श्लोक २०**— जनकराजानें आपलें नगर कसें श्रृंगारलें त्याचें वर्णन येथून चालू होतें. **जैसा इ०**— जसा रवीचा उदय हातानें झांकला तरी तो झाकला जात नाहीं, आपल्या मूळच्या प्रकाशानेंच तो प्रकाशतो, तद्वत् मिथिलेंतील सुवर्णकळसांचें तेज सूर्योदयाप्रमाणेंच सर्व दिशांना फांकलें होतें. **सुवर्णमाणे**— सुवर्णकळस. मंदिरांचे सोन्याचे कळस. **स्वपुटभेदन** – आपलें नगर. अर्थात् मिथिला. पहा— उपरुध्यमानमिव भूभृतां बलैः पुटभेदनं दनुसुतारिरैक्षत । —शिशुपालवध — १३।२६. **भूमिपाळें**- जनक राजानें. **येकया इ०**— एका खणावर सात मजले विराजमान झाले होते. मिथिलेंत सात मजली इमारती होत्या असा अर्थ. **ताळ**- इमारतीचा मजला. **श्लोक २१— सकळ दुर्घट भेद**- मनांतील सर्व भेदभाव. त्या नगरीच्या दर्शनानें हें आपलं हें परक्याचं असा भेदभाव नष्ट होई. कारण जनकासारख्या ब्रह्मज्ञानी राजाची ती नगरी होती. **जीवंत इ०**- तेथील प्रजाजन इतके पुण्यवान् होते कीं, ते जीवन्मुक्त होते. जिवंत असूनही, ब्रह्मज्ञान बाणल्यामुळें, त्यांना इहलोकींच मोक्ष प्राप्त झाला होता. जन्ममरणाच्या फेऱ्यांतून ते सुटले होते. **ज्ञानी**

**अभेद इ०** – आत्मा व परमात्मा हे एकच आहेत, असें अभेदज्ञान त्यांना प्राप्त झालें होतें. त्या ज्ञानाचें ते चिंतन करणारे होते. अशांचा गुणगौरव मी कसा करणार असें कवि ध्वनित करतो. **श्लोक २२** – वरील श्लोकांत मिथिलेचें अध्यात्मिक वैभव वर्णन केल्यावर, आतां तिचें आधिभौतिक वर्णन कवि करीत आहे. **हाटवटिया** – बाजारपेठा, बाजारांतील दुकानें. पहा- कीर्तन केलें पोटासाठीं । देवा मांडिलें हाटवटीं – दासबोध ५।८।१९. **मढिली** – सजविली. **वीथी** – रस्ते. **चतुष्पथ** – चव्हाट. (Squares). **पट्टशाळा** – मुख्य शाला ( Main Hall ). ही शाला श्रीगोपुरावर असून ती सर्वोपचारांनीं युक्त होती. **श्रीगोपुर** – राजवाड्याच्या महाद्वारावरील मजलेदार, नक्षीदार किंवा मूर्ती वगैरे काढलेली इमारत. पहा—' एक चढले माडिया गोपुरीं '—एकनाथ. रु. स्वयंवर ६।१०७. ' खग मग नगरीचे गोपुरीं झेंप घाली '— रघुनाथ पंडित — नलदमयंती-९० **उपचारशीळा** जेथें सर्व शिष्टाचार पाळले जात होते अशी. 'पट्टशाळे' चें हें विशेषण घ्यावें. **श्लोक २३**—मिथिलेच्या श्रृंगाराचें आणखी वर्णन दिलें आहे. **समार्जित इ०**–तेथील जमिनीवर केशराचे सडे घातले होत. **कुंकुम**–केशर. असे सडे घातल्यानें सर्व वातावरण सुगंधित झालें असेल. **श्लोक २४**–तेथील नित्याचा व्यवहार कसा चालत होता तें सांगितलें आहे. **स्फुरणें**–धडधडाट. **उदिम करी**—व्यापार करी. लोकांचा व्यापार दुसरा तिसरा नसून नीति, शास्त्र व प्रमाण यांच्या चर्चेतूनच चालत असे. अशी चर्चा हाच त्यांचा नित्याचा व्यवसाय होता. ' नीतिशास्त्राप्रमाणें ' हा काव्यसंग्रहाचा पाठ घेतल्यास लोक नीति व धर्मशास्त्राप्रमाणें वागत होते असा अर्थ करावा लागेल. पण त्यांत कांहीं विशेष स्वारस्य नाहीं. **नाहीं देशीं इ०**– पाप लाजीरवाणें होऊन त्या देशांत ( मिथिलेंत ) राहातच नव्हतें, तर तें भयानें तेथून पळून गेलें होतें. त्या नगरींत पाप घडतच नव्हतें असा भाव. **रामश्रीकृष्ण नाणें**—राम व श्रीकृष्ण या दोन नांवांचेंच चलन लोकांत चालू होतें. दुसरीं रुप्याचीं, सोन्यांचीं नाणीं तेथें नव्हतींच. येथें रामनामाचें नाणें चालें

असें म्हणणें एकवार चालेल. कारण रामाचा अवतार त्यावेळीं सुरू तरी झाला होता. पण जो श्रीकृष्ण पुढें पुष्कळ वर्षांनीं झाला, त्याच्या नांवाचें नाणें मिथिलेंत रामावतारात कसें चालत होतें हें चिंत्य आहे. हा कवीचा निवळ कालविपर्यासदोष आहे.—**मुक्तजीवंत जाणें**-तेथील लोक मोक्ष पावून सदेह स्वर्गाला जात असत. कदाचित् तुकारामाचें सदेह स्वर्गगमन कवीच्या कानावरून गेलें असेल, व त्याचाच तो येथें उल्लेख करीत असेल.

**श्लोक २५**—**वनीं**-मिथिलेजवळच्या उपवनांत. **वृतांत**—वृत्तांत. द्विज मुनी आल्याची वर्दी दूतांनीं जनकाच्या कानावर घातली. **सामंत पाचारिले**—जनकानें आपले मांडलीक राजे बोलावले. **नृप**—जनकराजा त्यांना सामोरा गेला. **सर्वे**—बरोबर. **सैन्यसिंधु**— सेनासमुद्र. **सरिसा**—जवळ. **श्लोक २६**- **जो सृष्टिकर्ता** इ.—विश्वामित्रानें ब्रह्मदेवाप्रमाणें अपरसृष्टि निर्माण करण्याचा उपक्रम केला होता. **हर्षे स्फुरोति** इ.—आनंदानें त्यांचे बाहू स्फुरण पावत होते. **पुरौकस**—प्रजाजन, शहरवासी लोक. **शिबिका**—पालख्या. **श्लोक २७**- विश्वामित्राला आणखी कोण कोण सामोरे गेले, त्यांची यादी दिली आहे. **मौनी**-मौन धारण केलेले. **तडीतापडी**-तपस्वी, बैरागी. **श्रोत्री**-अग्निहोत्री, वैदिक. **सिद्ध**-अणिमा लघिमादि आठ सिद्धी प्राप्त झालेला. **साधक**— मंत्रतंत्रादि साधन करणारा. **कापडी**— खांद्यावर कावड घेऊन तीर्थयात्रा करीत फिरणारे. **श्रौत**— वेदविषयक. **स्मार्तक**— स्मृति, धर्मशास्त्रविषयक. **मंत्रोपासक**-मंत्राची, ऋषिप्रणीत गूढशक्तियुक्त वाक्याची उपासना करणारे.

**श्लोक २८**—विश्वामित्राच्या स्वागतार्थ आणखी प्रतिष्ठित लोक कोण कोण गेले ते सांगितलें आहे. **सेटे**-बाजारावरील अधिकारी. **महाजन**-गांवांतला शिष्ट मनुष्य, व्यापारी, सावकार. **चाटे**-कापडाचे व्यापारी. **वाणी**—किराणा जिनसांचा दुकानदार. **उदमी**-व्यापारी, दुकानदार. **पुरपंथ दाटे**—शहराचा रस्ता भरून गेला. **धूळी** इ०-या सर्वांच्या चालण्यानें जी धूळ उठली, तिनें सर्व अंतराळ भरून गेल्यामुळें तें धूसर, धुरकट

झालेसें वाटलें. **मुनी**–विश्वामित्र. हा जनकाकडे पाहून कौतुकानें हांसला असावा. **श्लोक २९**–जनकराजाचें सपरिवार वर्णन. **वेत्रपाणी**–वेताच्या काठ्या घेतलेले लोक. **भाट** – स्तुतिपाठक. स्तुतिपाठक जनकराजाच्या प्रतापातिशयाचें आपल्या वाणीनें वर्णन करीत होते. **विदेही** – विदेह देशाचा राजा जनक. **पदस्पर्शनें ३०** – जनकानें विश्वामित्राच्या पायाला स्पर्श करतांच दोघांनाही आत्मैक्याचा अनुभव घडला. जनक व विश्वामित्र हे दोघेही ब्रह्मज्ञानी असल्यानें, परस्परांच्या स्पर्शानें त्यांना असा अभेदानुभव आला. **चित्कला** – चैतन्यकला, ब्रह्मकला, आत्मकलिका.

**श्लोक ३०– जगन्मित्र**– विश्वामित्र. **क्षमालिंगनें**– 'क्षेमालिंगनें' असें पाहिजे. वृत्तसुखार्थ 'क्षमालिंगनें' असें लिहिलें आहे. **क्षेम**– आलिंगन. हे दोनी शब्द समानार्थीच आहेत. जनक व विश्वामित्र हे परस्परांच्या आलिंगनानें एक होऊन राहिले. **दिशा दाटल्या**– दिशा भरून गेल्या. **भार भूगोल**– पृथ्वीचें वजन हादरलें. एवढी वजनदार पृथ्वी, ती देखील हालली. **श्लोक ३१– पुण्यश्लोक**– पवित्र आहे यश किंवा कीर्ति ज्याची असा. अशा पुण्यश्लोक प्रातःस्मरणीय राजांबद्दल जो एक श्लोक प्रसिद्ध आहे, त्याचाच येथें अनुवाद केलासा दिसतो. "पुण्यश्लोको नलो राजा, पुण्यश्लोको युधिष्ठिरः। पुण्यश्लोकश्च वैदेहः पुण्यश्लोको जनार्दनः॥" प्रत्येक युगांत पुण्यश्लोक राजे होऊन गेले. जनार्दन हा पहिला पुण्यश्लोक, कारण तो तर प्रत्यक्ष ईश्वर. पुढें कृतयुगांत नलराजा, द्वापर युगांत धर्मराजा, व त्रेतायुगांत जनक. **क्षमापति**– पृथ्वीपति. **देही ३०** – शरीरधारण करणारा असूनही जो आपलें शरीर नाहींच असें मानतो. ज्यानें आपल्या शरीरावरील आसक्ति नष्ट केली आहे. **वामनयना**– सुंदर आहेत डोळे ज्यांचे अशा स्त्रिया. सुंदर स्त्रिया ज्याचा एक पाय आपल्या चंदनयुक्त स्तनांनीं रगडतात, तर ज्याचा दुसरा पाय अग्नींत आहे, अशा त्या जनकराजाला राजेलोक आपलासा करतात. जनकराजाच्या देही विदेही वृत्तीचें हें वर्णन आहे. जो एकीकडे राजोपचारादि उपभोग घेतो, तोच

दुसरीकडे आपला पाय अग्नींत जळाला तरी त्याची क्षिति बाळगीत नाहीं. यावरून त्याची प्रपंचांत राहून वैराग्यवृत्ति स्पष्ट होते. काव्यसंग्रहकारांनीं 'वन्हित' या पाठाबद्दल 'चिन्हित' असा पाठ दिलेला आहे, तो अर्थातच अर्थहीन व चुकीचा आहे. **श्रीगंधें** – सुगंधानें युक्त. हा शब्द 'स्तनें' याकडे घ्यावा. **अर्जिती** – प्राप्त करून घेतात, आत्मसात करून घेतात.

**श्लोक ३२** – आतां विश्वामित्रासह जनकराजा त्या उपवनापासून आपल्या सभास्थानाकडे जातो. **दंड धरुनी** – राजदंड घेऊन. राजदंड ही राजानें हातांत धरावयाची सोन्याची काठी असून, तें एक राजचिन्ह आहे. **निवारीत** – निवारण करीत, थोपवीत. मिरवणुकीपुढील वाद्यें लोकांना जणू काय थोपवीत होती. **श्लोक ३३** – **विष्टर** – आसन. **विश्वामित्रापुरत** – विश्वामित्रापुढें. **बंधु उभयां** – रामलक्ष्मण दोघे. **दिसे इ०** – जनकराजाला राम परब्रह्मरूप दिसला. जनकराजा ज्ञानदृष्टि असल्यानें, राम हा परब्रह्माचेंच सगुणस्वरूप आहे असें त्याला पटलें. पण सामान्य लोकांच्या व्यावहारिक दृष्टीला राम केवळ मदनाचें म्हणजे सौंदर्याचें माहेरघरच भासला. **श्लोक ३४** – **कासिणें** – बांधणें, कसणें. **कनकअंबर** – पीतांबर. **कांसे** – कांसोटा, काचा. पहा – 'तुळशीहार गळां कांसे पीतांबर।' – तुकाराम. **कौस्तुभ** – श्रीविष्णूच्या कंठांतील मध्यमणि. समुद्रमंथनांतील १४ रत्नांपैकीं एक. पहा कंटीं कौस्तुभमणी विराजीत," –तुकाराम. **वक्षीं** – छातीवर. **वांकी** – पायांतील अलंकारविशेष. **तोडर** – पायांतील एक दागिना. पहा – इटोपरीं वाउलीं तोडरीं काढिती दैत्यांचीं।' – दामोदर पंडित, वच्छहरण ८१. **श्लोक ३५** – रामलक्ष्मण निरनिराळ्या लोकांना कसे दिसले, त्याचें वर्णन केलें आहे. क्षत्रियांच्या दृष्टीला ते राजासारखे तर इतर सज्जनांना ते देवांचे अवतारच आहेत असे भासले. **धरापति** जनकराजा. त्यानें रामलक्ष्मणाबद्दल विश्वामित्राजवळ पृच्छा केली.

**श्लोक ३६**—विश्वामित्र रामलक्ष्मणांचें कुलवृत्त निवेदन करतो. **चंड**– प्रचंड, गाढे. **दिनकरकुळ** – सूर्यवंश. **करणि** – रामाचा पराक्रम' विश्वामित्र पुढील श्लोकांत रामपराक्रम वर्णन करतो. **श्लोक ३७ – मख**–यज्ञ. या यज्ञरक्षणासाठींच विश्वामित्रानें रामाला दशरथाकडून आणलें होतें. **उडविली** इ० – दशदिशांना उडवून दिली, मारली. **मूळपत्र** – आमंत्रण-पत्रिका. जनकानें विश्वामित्राला पाठविलेली सीतास्वयंवराची आमंत्रण-पत्रिका. **स्या तदा** इ० —जनकाच्या आमंत्रणावरून रामालाही घेऊन येण्यांत आपण स्वयंवराचा शुभमुहूर्त साधला, असें विश्वामित्र म्हणतो. पण विश्वामित्र रामाला कांहीं आणायला तयार नव्हता, हें आपण पाहिलेंच आहे. रामच स्वयंवरप्रसंगीं जमणाऱ्या राजेलोकांना पाहण्याच्या कुतूहलानें आग्रह-णहून आले. मग विश्वामित्रानें त्यांना आणण्याचें श्रेय घेण्यांत अर्थ काय? **श्लोक ३८** – पुढील अहिल्योद्धाराची कथा विश्वामित्र जनकाला सांगतात. **निजकलत्र** – स्वतःची पत्नी, अहिल्या. **श्लोक ३९** – या श्लोकांत विश्वामित्र रामाचा महिमा व त्याची अवतारकथा जनकाला वर्णितात. **मनोभिराम**—मनाला आनंद देणारा. **सर्वांतरीं** इ०—सर्वांच्या अंतःकर-णांत नेहमींच असणारा परमात्मा. **तारक** – जन्ममृत्यूपासून तारणारा, मोक्ष देणारा. **ब्रह्म चिद्धन** – ज्ञानघन परब्रह्म. परब्रह्माचें स्वरूप सत्, चित् व आनंदमय आहे. हें निर्गुण परब्रह्म, सगुणरूपानें आपण तुला भेटावयास आणलें, असें विश्वामित्रांचें म्हणणें. **सप्तम अवतार** – राम हा विष्णूच्या दशावतारांपैकीं सातवा अवतार होय. मत्स्य, कूर्म, वराह, नरसिंह, वामन, परशराम, राम, कृष्ण, बुद्ध व कल्की असे दशावतार झाले. रामासारखा अवतारी पुरुष तुझ्या केवळ भाग्यानेंच तुला भेटला असा विश्वामित्राचा आशय. **श्लोक ४०** – आतां लक्ष्मणाच्या अवताराची कथा देतात. **याचा बंधु** इ० – रामाचा बंधु हा लक्ष्मण, त्याचा योग्य असाच मित्र असून तो प्रत्यक्ष शेषावतार आहे. **शेषावतार** – विष्णू क्षीरसागरांत ज्या शेषावर शयन करतात, त्या शेषानें रामावतारांत लक्ष्मणाचें रूप धारण

केलें. विष्णूनें रामावतार घेण्याचें ठरविल्यावर त्याच्या आयुधांनीं देखील लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न अशा त्याच्या बंधूंचे अवतार घेतले. पहा — शेष चक्र जलजात असे । सहित सहोदर तो विलसे ॥ —निरंजनमाधव — निर्वोष्ठ्राघवचरित. **तो हा** — त्यापैकीं राम हा लीलाविग्रही, लीलेनें कोणतेंही शरीर धारण करणारा, कसलाही अवतार घेणारा आहे. **वेदनेति-महिमा** — वेद देखील 'नेति नेति' असें म्हणून ज्याचा महिमा वर्णन करतात तो. वेदांना देखील ज्याचें खरें स्वरूप कळलें नाहीं असा. **स्वभू** — स्वतःच होणारा, अवतार घेणारा. **भूप्रभू** — जनकराजा.

**श्लोक ४१** — जनकाची वृत्ति राममय झाली. **विसावलें** — स्थिरावलें. **ठसावलें** — ठसलें. **तो म्हणे इ०** — जनक राजा रामाकडे पाहून आपणाशींच म्हणाला. "सीतेच्या स्वयंवरासाठीं परशुरामाच्या धनुर्भंगाचा पण मीं व्यर्थ लावला. हा पण लावला नसता, तर आज रामालाच तात्काळ जानकी देऊन टाकली असती." **श्लोक ४२** — **निका** — योग्य. **भागधेय**—नशीब उघडेल, तर जानकी रामाला वरील. नशीब उघडावयाचें असेल, तर रामच धनुर्भंगाचा पण जिंकील व मग जानकी सहजच त्याला माळ घालील. **श्लोक ४३** — यानंतर स्वयंवराला आलेल्या राजांचें वर्णन येतें. **भूपदेशाभिधानें** — राजांच्या देशांचीं नांवें. **आतपत्रें** — छत्रें. **श्लोक ४४** — **चवरे** — चवऱ्या, चामर. **रत्नदंड** — रत्नखचित दांड्यांच्या. **चंद्रोपमा** — चंद्राप्रमाणें धवल व कांतिमान्. छत्र व चामर हीं राजचिन्हें पांढरींच असतात. पहा — "अदेयपासीत्त्रयमेवभूपतेः शशिप्रभं छत्रमुभे च चामरे।" रघुवंश सर्ग ३. **भारापुढें**— सैन्यापुढें. सैन्यापुढें सिंहाचे, मत्स्याचे व शार्दूलाचे मुखवटे, जयचिन्हें म्हणून मिरविण्याची चाल असावी. **मार्तंडपत्र** — सूर्यपान. सूर्याची आकृति असलेली अबदागिरी. हें देखील एक राजचिन्हच आहे. **ध्वजा** — पताका. **मेघडंबर** — छत. उंच सूर्यपानें व पताका यांनीं आकाश एवढें झाकून गेलें कीं, आकाशाला छतच मारल्याप्रमाणें भासलें. **बिरुदें** — नांवलौकिक,

कीर्ति. **श्लोक ४५ – रायें** – जनकानें. जनकानें सैन्यापुढें जाऊन आलेल्या राजांचें स्वागत केलें. **ढेंसली** – दडपून भरली. पहा – 'तुज करावया नमस्कार । पुढें ढसे महासिद्धांचा संभार ॥' एकनाथी भागवत ४।१४६. **धात्रीवरी** – पृथ्वीवर. ती जनकराजाची सभा, पृथ्वीवर स्वर्गांतल्या इंद्र-सभेप्रमाणें भासली.

**श्लोक** ४६—जनकाच्या सभेचें वर्णन. त्या सभेच्या खांबावर बाहुल्या काढल्या असून, त्यांच्या हातांत दिवट्या दिल्याचें दाखविलें होतें. **स्मेरानना**– सुहास्यवदना. तसेंच तेथें हातांत आरत्या घेऊन ओवाळणाऱ्या हास्यवदना स्त्रियांचींही चित्रें काढलीं होतीं. अशी तेथील चित्रकला होती. **मुक्तें** इ०- तेथील छताला मोत्याच्या झालरी लावल्या होत्या. **मृद्वासन** –मृदु आसनें. शुद्ध शब्द 'मृद्वासनें' असा पाहिजे. या आसनांना मोत्यांच्या जाळ्या लावल्या होत्या. **चवरिया**—चवरें=बसावयाची जागा. पहा – 'कीं तें परिमळाचें देव्हारें । वरि मन्मथाचें चवरें ॥ – नरेंद्र – रु. स्वयंवर ४३७. बसावयाचीं आसनें रत्नजडित असून, त्यावर मऊ गाद्या घातल्या होत्या. **श्लोक ४७ – संसदिपुढें** – सभेपुढें. **श्लोक ४८** – अशा राजसभेची शोभा पाहण्यास देवांचीं विमानें नेहमीं ठेवलेलींच असतात. **प्रसंगीं** – प्रसंगानें, वेळप्रसंगीं. कारण पुढील सर्गांतच विठ्ठल सीतास्वयंवराला आलेल्या अनेक देशींच्या राजांची यादी देतो. **ललामें** – सभेला भूषण होणारीं हीं राजांचीं नांवें, गुणज्ञ श्रोत्यांनीं ऐकावीं. **श्लोक ४९** कवि आतां वाग्देवतेची प्रार्थना करतो. **हरिकथानटि** – हरिकथा गाणारी नटी हो. "तूं माझ्या जिभेवर मूर्तिमंत अवतरून नर्तन कर." प्रत्यक्ष सरस्वतीच कवीच्या जिभेवर नर्तन करीत असल्यावर, मग कवित्वाचा विलास काय वर्णन करावा! **सज्ज** – तयार, सिद्ध. पहा – 'वंदीन पादांबुज सज्जनांचे । तयां-पुढें मी मग सज्ज नाचें ॥' – नागेश – सीतास्वयंवर – ८.

---

# सर्ग चवथा



प्रस्तुत सर्गात शिवधनुर्भंगाचा प्रयत्न करतांना रावणाचा झालेला मानभंग वर्णन केला असून, पहिल्याच श्लोकांत 'रामाला हें धनुष्य वाकेल कीं नाहीं' अशी जनकाला लागलेली चिंता स्पष्ट केली आहे. **विचारी**–विचार करी. आपण धनुर्भंगाचा पण लावून चुकलो. राम तर लहान, त्याला हें डोंगराएवढें धनुष्य पेलणार नाहीं, व मग त्याला सीता देण्याचा आपला मनोदयही सफळ होणार नाहीं. एकदा लावलेला पणही मागें घेतां येत नाहीं. अशा दुग्ध्यांत राजा पडला आहे. **वज्रातुल्य** – इंद्राच्या वज्राप्रमाणें. **भृगुपतिपण** – परशुरामाचा पण. जो आपल्या धनुष्यास दोरी लावील, त्याला सीता द्यावी असा परशुरामानें घातलेला पण. **मौन्य-मुद्रा** – अबोलेपणानें राहण्याची प्रवृत्ति दर्शविणारी चेहऱ्याची ठेवण. **श्लोक २** – **त्रिदश** – देव. **दनुज** – राक्षस, दानव. **लंकनाथा-भिमानी** – रावणाचे अभिमानी. **श्लोक ३** – परशुरामाचें तें प्रचंड धनुष्य सभेंत ओढून आणायला किती हत्ती व बैल लागले तें वर्णन. **दिग्मातंग** – अष्टदिशांना असणाऱ्या दिग्गजाप्रमाणें मदोन्मत्त असे हत्ती, तें धनुष्य ओढतांना आघाडीला जोडले होते. **आटोपिले** – सांभाळावयास लावले. **मत** – मत्त. **रानखुळगे** – रानरेडे. **जेठी** – मल्ल. **सायासिं** – श्रमानें. **दिक्चापासमतुल्य**—इंद्रधनुष्याप्रमाणें विस्तृत. येथें 'सम' व 'तुल्य' असे दोन समानार्थी शब्द एकत्र घातले आहेत. तथापि आपली काव्यरचना निर्दोष असल्याचा आत्मविश्वास विठ्ठल व्यक्त करतोच. **रंगां-गणिं**—सभामंडपाच्या पटांगणांत. आनंदतनयानें याच प्रसंगाचें असेंच वर्णन केलें आहे. पहा—"मत्तेभ, मल्ल, हय, बैल, हले धनुष्या लावूनि

ओढिति, बळें न ढळे मनुष्यां । गाड्यासि त्यासि दृढ बांधुनि चारि नाडे आकर्षिती, धरुनि हर्ष, म्हणोनि नाडे ।। — सीतास्वयंवर ६.

**श्लोक ४** — जनकराजानें यानंतर ज्या भूमीवर तें धनुष्य ठेवलें, तिची विधीपूर्वक पूजा केली. **रंगसुरंग** — रंगांनीं रंगीत केली. **गोपद्म**— गाईचें पाऊल. पंचरंगी गोपद्मावर पुष्पांचीं स्वस्तिकें शोभत होतीं. त्या भूमीवर रंगीबेरंगी रांगोळ्यांतून गोपद्म व स्वस्तिकें चित्रित केलेलीं होतीं. **वेदपूर्वक** — वेदोक्त. तो भूपूजाविधि वेदविहित मंत्रांनीं करण्यांत आला. **उद्बाहु** — हात वर करून. कोणतीही घोषणा करावयाची झाली कीं, ती हात उभारून केली जाते. त्यामुळें श्रोत्यांचें तिकडे लक्ष वेधतें. **वक्त्रांबुजें**— मुखकमलानें, तोंडानें. जनकराजानें त्या पूजित भूमीवर तें धनुष्य ठेवल्यावर हात उभारून घोषणा केली. **श्लोक ५**—**भृगुपति इ०**—परशरामाच्या धनुष्यास जो कोणी दोरी लावील. **ज्या** — दोरी. **शाली** — शोभिवंत, प्रख्यात. यांत जनकानें सीतास्वयंवराचा आपला पण सर्व राजांना जाहीर केला आहे. **श्लोक ६** — तें प्रचंड धनुष्य पाहून राजांची उडालेली गाळण. **अजासर्पन्यायें** — शेळी सापाला पाहून भिते त्याप्रमाणें राजे त्या धनुष्याला पाहून भ्याले. **स्फुरद्रोमा** — ज्यांच्या अंगावरील केस उभे राहिले आहेत असे. राजे लोक एवढे भ्याले कीं, त्यांच्या अंगावरील केस ताठ उभे राहिले, त्यांच्या अंगावर कांटा आला व घाम सुटून तो गळूं लागला. **पुलकित** — कांटा आला. **गळद्बिंदु** — घामाचे गळणारे थेंब. **मृतच्छाया** — प्रेतकळा. राजांच्या तोंडावर प्रेतकळा आल्याप्रमाणें त्यांचीं तोंडें भीतीनें भकास झालीं. **शरीरें इ०** — ते प्रेतवत् झाले, जिवंत असून त्यांची प्रेतासारखी अवस्था झाली. आपलें आयुष्य संपलें, आपणांवर मरण ओढवलें असें त्या धनुष्याच्या दर्शनानें त्यांना वाटलें.

**श्लोक ७**— जनकाचा प्रधान सर्व राजांना तें धनुष्य उचलण्याची विनंति करतो. **दृढपणी**— दृढपणानें, निश्चयानें. **प्रतापाचे मेरु**—आपण पराक्रमाचे मेरुपर्वत आहां. आपली बुद्धि मेरूप्रमाणें स्थिर आहे. **सच**-

किंत- भयभीत. नागेशानें देखील आपल्या सीतास्वयंवरांत भयभीत राजांचें असेंच वर्णन केलें आहे. पहा– 'थरथरा नृपती किती कांपती, । खटखटां मग दंतही वाजती. ॥ म्हणति पूर्वभयें फुटलों उरीं, । सबळ हे तंव चोंडि बसे शिरीं. ॥ ३२५ ॥ श्लोक ८– रावणाचें शरीरवर्णन. कराळें– भयंकर. आजानुबाहो–ज्याचे बाहू गुडघ्यापर्यंत पोंचतात असा. हें वास्तविक चांगलें सामुद्रिक लक्षण आहे. पण येथें रावणाच्या लांबचलांब बाहूचें तें निदर्शक आहे. रजनिचरपती – राक्षसपती, रावण. नवजलदतनु – नवीन मेघाप्रमाणें शरीर आहे ज्याचें असा; काळाकभिन्न. दर्प – धाक. सर्व राजांना रावणाचा धाक होता. श्लोक ९— येथून श्लोक ११ पर्यंत रावणगर्वोक्ति दिली आहे. दुर्गा– पार्वती. गुह— कार्तिकस्वामी, शंकराचा पुत्र. नंदि–शंकराचें वाहन. पार्वती, गणेश, कार्तिकस्वामी, नंदि असे शिवाच्या सभेत असतांना, शंकराचें निवासस्थान जो कैलासपर्वत तो मीं माझ्या बाहुबलानें खिळखिळा केला. श्लथरूप– सुटा. तो मी इ०— ज्यानें कैलासासारखा पर्वत शंकराच्या परिवारासह हलवून टाकला, तो मी रावण, कोसळणाऱ्या आकाशाला देखील डाव्या हातानें सावरून धरीन. हें धनुष्य मोडील असा माझ्याशिवाय दुसरा राजा कोण आहे? श्लोक १०– क्वा नाहीं इ०— मीं न जिंकलेला असा पृथ्वींतला कोणता राजा इथं आला आहे? म्हणजे जे राजे येथें आले आहेत, ते सर्व मी जिंकलेलेच आहेत असा भाव. माझा दर्प इ०—माझा धाक इंद्राला देखील आहे. शेषासि—पृथ्वी आपल्या डोक्यावर धारण करणाऱ्या शेषाला, वासुकीला. भूपी इ० – पृथ्वीची मी घडी घालीन. उतरडी – खालीं मोठें व वर लहान अशारितीनें एकावर एक भांडीं ठेवून केलेली रचना. स्वर्गाच्या एकावर एक अशा रचलेल्या उतरंडी मी पाडीन. भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनोलोक, तपोलोक आणि सत्यलोक, असे एकावर एक सात लोक आहेत, अशी कल्पना आहे. "अशा सप्तलोकांची ही उतरंड मी पाडीन" अशी रावणाची वल्गना. पाताळें – पृथ्वीच्या खालीं अतल,

वितल, सुतल, महातल, रसातल, जलातल आणि पाताल अशीं सप्त पाताळें आहेत. "अशीं पाताळें म्हणून काढून लंकेच्या किल्ल्याला पडलेल्या भेगा मी बांधून काढीन." चिऱ्या—भेगा. एकंदरीनें पृथ्वी, स्वर्ग व पाताल, हे आपणास करपटाप्रमाणें वाटतात, अशी रावणाची बढाई.

**श्लोक ११** — रावण आणखी आपली प्रौढी सांगतो. **दंडें** — बाहूंनीं. **कोदंड** — धनुष्य. **उपरीवरी** — माडीवर. नागेशानें देखील माडीवर बसलेल्या सीतेचें असेंच वर्णन केलें आहे. पहा—त्यानंतरें सुंदर माडियेसी। आली सखीवेष्टित ती सुकेशी॥ उच्चासनीं बैसत पंकजाक्षी, । महादरें सर्व सभा निरीक्षी॥—सीतास्वयंवर २६६. **श्लोक १२** — **कोण कैसा इ०**— कोण राजा कसा पहातो याचें निरीक्षण सीता करीत होती. **प्रगट गुण**— प्रत्येक राजाचा ठळक गुण कोणता व कोण राजा कसा शोभतो याचें स्पष्टीकरण सखी सीतेपुढें करीत होती. **श्लोक १३** — कोणकोणत्या द्वीपांचे व खंडांचे राजे सीतास्वयंवराला आले होते, त्यांचीं नांवें दिलीं आहेत. **द्वीपें**— जंबू, पलाश, शाल्मलि, कुश, क्रौंच, शाक व शृंगली अशीं सात बेटें, त्यांचे राजे. **दिक्पती** — आठ दिशांचे अधिपति. **खंडें** —चारण, भस्म, सिद्ध, नाग, गंधर्व, इंद्र, सुवर्ण अशीं सप्त खंडें. पृथ्वी ही सप्तद्वीपा व सप्तखंडा आहे. तेथील सर्व राजे स्वयंवराला आले होते. **श्रोत्रीं इ०** – जीं फक्त कानानींच ऐकलीं होतीं. कारण हीं सर्व खंडें प्रत्यक्ष कोण पहाणार ?

**श्लोक १४**— सप्तलोक व सप्तपाताळें, येथीलही राजे आल्याचें जसें वर्णन आलें आहे, तसेंच पुढील श्लोकांत सप्तसमुद्र, अष्ट दिक्पाल, सिद्ध, चारण, चंद्र, विद्याधर, किन्नर इत्यादि स्वर्गीय गण देखील विमानांतून स्वयंवर पाहण्यास आल्याचें सांगितलें आहे. **भू भुवः इ०**— भू, भुवः स्वः महः जनः तपः सत्यं असे मेरुपर्वतावरील सात लोक मागें दिलेच आहेत. पाताळेंही सात असल्याचें सांगून त्यांची यादी १३ व्या श्लोकांत सांगितलीच आहे. **बळी**— हा एक दैत्यांचा राजा असून विष्णूनें वामनावतारांत त्याच्याकडून त्रिपाद भूमीचें दान मागितलें असतां, त्याची पूर्तता न झाल्यानें

त्याला पाताळांत दडपल्याची कथा प्रसिद्धच आहे. **श्लोक १५- सप्त-समुद्र-** क्षारोद, इक्षुरसोद, सुराद, घृतोद, क्षीरोद, दधिमंडोद व शुद्धोद असे सात समुद्र. यांत सर्पसमुद्र मात्र कोठें दिलेला आढळत नाहीं. **हाहा हूहू-** हे दोघेही चालू मन्वंतरापूर्वींचे गंधर्व असून, त्यापैकीं हूहू हा देवल ऋषीच्या शापानें जलमध्यें नक्र झाला होता. पुढें विष्णूनें गजेंद्रमोक्ष केला त्यावेळीं गजेंद्राबरोबर या नक्राचा उद्धार केला. **यानीं-** आपापल्या विमानांत. **श्लोक १६—१९** स्वयंवरास आलेले भिन्नभिन्न देशांचे राजे सांगितले आहेत. अनंत कवीनें देखील आपल्या सीतास्वयंवर २१-२५ श्लोकांत, असेच अनेक देशचे राजे दिले आहेत. **कोंकण प्रभू**-कोंकणचा राजा. याचा उल्लेख विठ्ठलाप्रमाणेंच नागेशानें आपल्या सीतास्वयंवरांत केला आहे. पहा— "कोंकणस्थ नृप हा जळधीचा। स्वामि तो चतुर निर्मळधीचा ॥ २६९ ॥ **श्लोक १८-** येथें मात्र कांहीं म्लेच्छ व परदेशी राजांचीं नांवें आलीं आहेत. यांत 'फिरंगाणि' च्या म्हणजे पोर्तुगीजांचा जसा नामनिर्देश आहे, तसाच तांबड्या तोंडाच्या पारशांचा व काळ्या तोंडाच्या हबशांचाही नामोल्लेख आहे. यावरून असे परदेशी व्यापारी हिंदुस्थानांत येऊं लागल्यानंतरच विठ्ठलानें आपलें काव्य रचलेलें दिसतें. मुक्तेश्वरानेंसुद्धां दुष्यंताचे सार्वभौमत्व वर्णन करतांना आपल्या आदिपर्वांत, व राजसूययज्ञप्रसंगीं पांडवांच्या दिग्विजयांत जिंकलेल्या राजांचें वर्णन करतांना आपल्या सभापर्वांत, अशा परदेशस्थ जातींचा स्पष्ट उल्लेख केला आहे. पहा— "जाबी, जंगी फिरंगी करूर। नायी, इंग्रेज मल्लोबार,। कावे, कावटे कंकमखर। जळतस्कर मांशाशी ॥९॥ रूमशाम खोरासान। मुलतान, हबशान, अर्बस्तान,। उजबेख, पठाण, तुर्कमान। बदकशान मेवात ॥१०॥ —मुक्तेश्वर आदिपर्व १५, व "जाबी जंगी फिरंगी। इंग्रेज बहुधा रक्तांगी। मलेबार नौकामार्गीं। विप्रकर्तें दंडिले ॥ १२७ ॥ पारसी भासिक ताम्रमुख। आरब हुरमुज काळमुख। रूमशाम घोडमुख। नाट पाट पुलिंद ॥ १५६ ॥ —मुक्तेश्वर, सभापर्व ८. **श्लोक-१९ श्रीताम्रध्वज -तांबड्या निशाणाचे.**

**नीळकेतु**- निळया निशाणाचे. **पाहे इ०**— मेरुपर्वताप्रमाणें प्रचंड अशा राक्षसराज रावणानें मोठ्या कौतुकानें ही सर्व राजांची शोभा पाहिली. **लालसें**— प्रीतीनें.

**श्लोक २०** येथून रावणाच्या प्रतापाचें वर्णन सुरू होतें. **आले इ०** —ज्या रावणाच्या भयानें तेथें आलेले सर्व सार्वभौम राजे भयानें कांपत होते, ज्याच्या घरांत स्वर्गांतले इंद्रमुख्य सर्व देव चाकराप्रमाणें राबत होते. **निर्जर**—देव. ज्यांना जरा नाहीं असे. कारण देवांना व यक्षांना म्हातार पण नाहीं. पहा—'वित्तेशानां न च खलु वयो यौवनादन्यदस्ति'—मेघदूत. **शक्रमुख्य**—इंद्र ज्याचा प्रमुख आहे असे. **चौदा चौकडिया**—कृत, त्रेता, द्वापर व कली या चार युगांच्या मिळून होणाऱ्या कालाला **चौकडी** म्हणतात. अशा चौदा चौकड्या रावणाचें राज्य टिकणारें होतें. **छप्पन्न**—हा शब्द येथें 'अगणित' या अर्थी वापरला आहे. ज्याची संपत्ति अगणित होती, असा रावण. **दर्प इ०**—ज्याच्या धाकानें त्रिभुवनांतले गर्विष्ठ देखील कांपत होते. **श्लोक २१**—रावणाचा आणखी पराक्रम सीतेपुढें तिची सखी वर्णन करीत आहे. **बंदीं इ०**—ज्या रावणानें सर्व देव आपल्या बंदीखान्यांत टाकले, शंकराचा कैलासपर्वत ज्यानें गदगदा हलविला. **ब्रह्मयाचा पणतू**- कुबेर. ब्रह्मामानसपुत्र पुलस्त्यऋषीचा पौत्र व विश्रवा ऋषीपासून कैकसीनामक भार्येच्या ठिकाणीं झालेल्या तीन पुत्रांपैकीं एक. म्हणून हा ब्रह्मदेवाचा पणतू होतो. रावण व कुंभकर्ण यांचा हा सावत्रभाऊ. चार वेदांवर भाष्यार्थ करण्याइतका हा विद्वान होता. अशा या कुबेराला देशोधडीला लावून त्याची लंका नगरी ज्या रावणानें समुद्रांत नेऊन ठेवली. रावण ब्रह्मदेवाच्या वरानें बलाढ्य झाला व त्यानें वैश्रवणाकडे (कुबेराकडे) लंकेची मागणी केली. कुबेरानें पित्याचें ( विश्रवा ऋषीचें ) अनुमोदन घेऊन लागलीच लंका रावणाच्या स्वाधीन केली, व आपण निघून हिमालयाच्या कैलास नामक शिखरावर जाऊन राहिला. इकडे लंकेंत रावणास राक्षसांनीं राज्याभिषेक केला,

अशी कथा आहे. **दाहा मौळि इ०** -असा हा रावण दहा शिरांचा व वीस हाताचा आहे.

**श्लोक २२**—रावणाचा पराक्रम आणखी चालूच आहे. **अष्टौ-भैरव**—असितांग, रुरु, चंड, क्रोध, उन्मत्त, कुपति (कपाली), भीषण आणि संहार असे आठ भैरव. वास्तविक हीं शंकराचीं स्वरूपें आहेत. **सटवी**—षष्ठी देवता, सटी ही एक क्षुद्र देवता असून लहान मुलांस उपद्रव देते म्हणून हिची मूल जन्मल्यानंतर सहाव्या दिवशीं पूजा करतात. भैरव व सटवी हे लहान मुलांना उपद्रव देणारे असूनही रावणाच्या घरांत उलट त्याच्या मुलांचें रक्षण करीत होते. इतका रावणाचा त्यांना दरारा होता. **चामुंडा**—ही एक महाशक्तीची प्रखर व रौद्र देवता आहे. अशी असून देखील ती रावणाच्या घरांत एखाद्या दासीप्रमाणें राबत होती. **अनुकुला**—मंडोदरीसारखें स्त्रीरत्न ज्याची पत्नी आहे. **वायूनें वरुणें इ०**—वायु व वरुण हे देव ज्याच्या घरीं झाडलोट व सडा, संमार्जन करतात. **पंचांग**—तिथि, वार, नक्षत्र, योग व करण यांचें पत्रक. हें पंचांग सांगण्याचें नित्याचें एखाद्या भटजीचें काम, ज्याच्या घरीं प्रत्यक्ष ब्रह्मदेव करतो! **खंडेराय**—हा शंकराचा अवतार अशी कल्पना आहे. यानें मणिमल्ल दैत्याचें मर्दन केलें. असा हा पराक्रमी देव देखील रावणाला त्याच्या सभेंत आरसा दाखविण्याचें काम करतो. **सिद्धी**—अणिमा, गरिमा, महिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशित्व व वशित्व अशा आठ सिद्धी आहेत. **निधी**—"महापद्मश्च पद्मश्च शंखो मकरकच्छपौ। मुकुंदकुंदनीलाश्च खर्वश्च निधयो नव॥" असे हे कुबेराचे नवनिधी सांगितले आहेत. आठ सिद्धी व नवनिधी रावणाच्या घरांत राबत होते. मग त्याच्या वैभवाला काय कमी!

**श्लोक २३**— रावणाच्या ऐश्वर्याचें सीतेच्या सखीनें केलेलें वर्णन तर त्याचा प्रभाव अधिकच व्यक्त करणारें आहे **नवग्रह**— चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, रवि, राहु व केतु हे नऊ ग्रह, रावणाच्या राजवाड्याच्या महाद्वाराच्या पायऱ्या होऊन राहिले होते. या नवग्रहांतच चंद्र व

सूर्याची गणना असतांना पुनः चंद्राकडे छत्र धरण्याची व सूर्याकडे द्वारपालाची कामगिरी कशी आली समजत नाहीं. यांत वास्तविक द्विरुक्तीच झालेली आहे. **वसंत इ०**— वसन्तऋतूकडे रावणाच्या पलंगावर पुष्पांची शेज रचण्याचें काम देण्यांत आलें होतें. कारण वसंतऋतु हा विविध सुगंधित पुष्पांनीं समृद्ध असतो. **माळी वासव इ०**— इंद्र माळी, अग्नि आचारी तर गणपति रावणाचा गुराखी झाला होता. **अलकेश**— कुबेर हा भांडारखान्याचा मुख्य. अशीं अनेक कामें रावणानें देवांना वाटून दिलीं होतीं. अशाच मासल्याचें रावणाच्या वैभवाचें वर्णन, नागेश व अनंत या कवींनीं आपल्या सीतास्वयंवरांत केलें आहे. पहा— "पुष्पें आणित इंद्र, चंद्ररविला दीपप्रचर्या घडे, । ब्रह्मा वेद पढे, जळाधिप जळें आणोनि घाली सडे, ॥ वारा झाडितसे स्वयें, पचन तें वैश्वानराला पडे, । द्वारा पाळित काळ, रांड सटवी ते बंदखानीं रडे. ॥ ३३२ ॥ विघ्नें वारितसे गणेश, नगरीं विष्णू समुद्रांतरीं,। शेषाचा मणि मंडपास निरुता, ईशान वेत्रा धरी,॥ इंद्राणी प्रमुखा करीति सदनीं, योषांस वेणीफणी, । हें तों कांबिट केवढें मजपुढें, कैसें चढेना गुणीं ?" ॥ ३३३ ॥ नागेश-सीतास्वयंवर. तसेंच "सुरेंद्र आणि माळिका, अखंड चंद्र ऊदका, । समीरणूचि झाडणी धरोनि झाडि आंगणीं; ॥६१॥ वरुण घालि मार्जना, करोनि यम गर्जना । अखंड घटि घालितो, सुपर्ण ग्राम रक्षितो. ॥ ६२ ॥ विरिंचि वाचि पातडें, मुखा करीत वांकडें, । मैराळ दावि दर्पणा, श्रिसूर्य वाहे सर्पणा. ॥ ६३ ॥ गणेश रासभें वळी, नवग्रह ते आवळी । करोनि त्यांसि पायरी, चढूनि जाय ऊपरी. ॥ ६४ ॥"— अनंतकविकृत सीतास्वयंवर. **श्लोक २४**— यानंतर आतां रावणाच्या नगरीचें वर्णन येतें. **रत्नस्तंभ**—रत्नाचे खांब. **चिंतामणी**— चिंतिलेली, इच्छिलेली वस्तु देणारे मणि. यांचा उपयोग सामान्य दगडाप्रमाणें बांधकामाला जेथें होत होता. **क्रीडा इ०**— रावणाच्या अशोकवनांत क्रीडा करण्यासाठीं जे वृक्ष होते ते कल्पवृक्ष होते, तेही इच्छिलेली वस्तु तात्काळ देणारे होते. **दिव्यांगना इ०**— ज्याच्या नगरींत स्वर्गीय अप्सराच नृत्यांगना झाल्या

होत्या. **नाचणी** – नृत्यांगना. **दुर्गाचीं इ०** – ज्या नगरीच्या बुरुजाचीं शिखरें नागांच्या फणाप्रमाणें डौलदार असून, जिच्या वेशीचीं दारें चतुर्दिशांच्या मुखाप्रमाणें विस्तृत होतीं. **सिंधुचे इ०** – ज्या नगरीला समुद्राचा कंबरपट्टा लाभला होता, अर्थात् जी समुद्रवलयांकित होती. अशा पुरींत रावण सुखानें नांदत होता.

**श्लोक २५** – रावणाच्या पराक्रमाचें, त्याच्या वैभवसंपन्न नगरीचें इतकें वर्णन केल्यावर, सीतेची सखी आतां तिला रामाचें वर्णन करून सांगते. **मशकासम** – ज्या रावणाला इतर सार्वभौम राजे घुंगुरट्याप्रमाणें क्षुद्र वाटतात. **धरणिजा** – सीता. अशा प्रचंड रावणाला पाहून ती भ्याली. पण जिंकून हा जर आपला पति झाला, तर आपलं संपलंच असं तिला वाटलं असावं. **रविवंशशाली** – सूर्यवंशांत शोभणारा राम. सखीनें यापुढें रामाचें वर्णन आरंभिलें. **श्लोक २६** – यांत रामाचें कुलवृत्त व त्यानें नुकताच केलेला पराक्रम थोडक्यांत वर्णिला आहे. **गभस्तीचे वंशीं** – 'सूर्यवंशांतला हा राजपुत्र तूं पहा' असे सखी सीतेला सांगते. **मुनियुवतिउद्धार** – गौतमपत्नी अहिल्येचा रामानें आपल्या पदस्पर्शानें केलेला उद्धार. **पुढें इ०** – "विश्वामित्राजवळ बसलेला तो तूं ओळख". **तां** – त्वां, तूं. **श्लोक २७** – रामाचें वर्णन. **कोटीर** – रत्नमुकुट. **जडित** – रत्नखचित. **फणिमणीतेज** – नागाच्या फणेवरील मण्याप्रमाणें तेज आहे ज्याचें (मुकुटाचें विशेषण). **दिक्प्रांत इ०** – ज्या मुकुटाच्या तेजानें सर्व दिशा भरून गेल्या होत्या. **चन्द्रार्क लाजे** – रामाच्या कानांतील कुंडलांचे मणी असे लखलखीत होते कीं, त्यांच्या तेजाला चंद्रसूर्य देखील लाजावे. **डाजे** – मनांत डांचत होतें. रामाच्या छातीवरचें रत्नजडित पदक, रावणाच्या मनांत सलत होतें. तसलें पदक आपणास मिळालें नाहीं, म्हणून रावण मत्सरानें जळत होता. **ब्रीदांचा इ०** – रामाच्या ब्रीदावळीचा, कीर्तिचिन्हांचा घोष सर्वत्र गाजून राहिला होता. **तोडरीं** – पादभूषणांच्या ठिकाणीं, जिंकलेल्या राजांच्या प्रतिमा कोरण्याची चाल होती. यावरून तोडरीं

घालणें जिंकणें, वठणीस आणणें असा अर्थ प्राप्त झाला. रामाच्या पायांतील तोडरांत अनेक राजे बद्ध झाले होते. रामानें अनेक राजांना जिंकले होते असा अर्थ. पहा – तो गुणांचा नव्हे गोवळु । तयां पासौनि नोवरा शिशुपाळु । जेणें तोडरीं घातला काळु ? । अमोलपणें ॥ ३७३ ॥ —नरेंद्र-रुक्मिणीस्वयंवर.

श्लोक २८–वर रामाच्या अलंकारांचें वर्णन झालें. आतां येथून त्याचें शरीरवर्णन अगदीं अल्पसेंच दिलें आहे. विठ्ठलाच्या वर्णनाचा भर बाह्य गोष्टीवरच अधिक दिसतो. अवयवांपेक्षां त्यानें अलंकारांनाच महत्त्व दिलें आहे. **त्रिपुंड्र** – कपाळीं लावण्याचा तीन पट्टयांचा तिलक. **सामुद्रिक** – हातापायावरच्या वगैरे रेषा पाहून त्या माणसाचें भविष्य सांगण्याविषयींचें शास्त्र. पहा – 'ध्वजवज्रांकुश रेखा । चरणींचीं सामुद्रिकें देखा ' ।— एकनाथ रु. स्वयंवर १।२२. रामाच्या हातापायावर ध्वज, वज्र, अंकुश अशीं शुभ सामुद्रिक चिन्हें होतीं. अशा चिन्हांचा पुरुष भाग्यवान् असतो. **वैजयंती**—विष्णूच्या गळयांतील माळ, हींत पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश या पांच तत्त्वांचा निदर्शक नीळ, मोती, माणिक, पुष्पराज व हिरा अशीं पंचरत्नें असतात. पहा–" परम विमल जेथे वैजयंती विराजे "—सामराज, रुक्मिणीहरण ८।११९. राम हा विष्णूचाच अवतार, म्हणून येथें त्याच्या वैजयंती माळेचा उल्लेख केला आहे. **तुळसीस्रज**–तुळसीची माळ. हिचाही निराळा निर्देश, राम हा विष्णूचा अवतार हें ध्वनित करण्यासाठींच होय. पहा–तुळसी माळ गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान ॥—तुकाराम. **श्लोक २९**—पुनः रामाच्या अलंकारांचेंच वर्णन कवि करतो. **क्वणत्**— नाद करणाऱ्या. **किंकिणी**–घागऱ्या. **क्षुद्रघंटा**–लहान लहान घंटा. **नितंबीं**–कटीखालच्या भागीं, कंबरेंत. **महारत्नकांची**—रत्नजडित कंबरपट्टा. **विलंबी**— लोंबणारा. रामाच्या कंबरेंत घागऱ्या व लहान घंटा असूनही शिवाय लोंबणारा व नाद करणारा कंबरपट्टा होता. **नाराच** — बाण. **तूण**–भाता. **अक्षय**–कधींही न संप-

णाऱ्या अशा बाणांनीं भरलेला भाता ज्यानें आपल्या पाठीला बांधला आहे. रामाचा भाता कधींच रिकामा होत नसे. शत्रूवर सोडलेला बाण पुनः त्याच्या भात्यांत येऊन बसत असे. **श्लोक ३०- इंद्रनीळ** इ०-इंद्रनील मण्याच्या कांतीप्रमाणें सांवळा. **कांति** इ०- कांतीनें राम कोटि मदनांचा पुतळा होता. कोटी मदन एकत्र झाले असतां जी कांति दिसली असती, तीच एकट्या रामाची कांति होती. **कुसुमेसु**- कुसुमेषु = मदन. **रत्नपुंज**- रत्नांचा समुदाय असलेला, अर्थात् रत्नजडित. **अवतंस**- तुरा. **श्लोक ३१**- एकाद्या निर्धनाला द्रव्याचा गठ्ठा सांपडतांच त्याला जसा विस्मय वाटतो, तसाच राम दृष्टीला पडतांच जानकीला तो वाटला. तिच्या अंतःकरणांत रामाची मदनसुंदर मूर्ति ठसल्यामुळें, किंवा तिचें मन रामांत रंगल्यामुळें, तिची समाधि लागण्याइतकी एकतानता झाली. **श्लोक ३२**- सीतेची रामाच्या ठिकाणीं एवढी तंद्री लागली कीं, तिचा मनावरचा ताबा नष्ट झाला. **धारणा**- धैर्य, मनावरचा ताबा. पद्य- धारणेत्युच्यते चेयं धार्यते यन्मनो तया। **विकलरूप**- ढिला. सीतेच्या मनावरचा ताबा ढिला होऊन तिची शुद्ध नाहींशी झाल्याचें पाहून तिच्या सख्यांनीं तिला वारा घातला. **समीरण**- वारा. **बाह्य** इ०— सीतेला बाहेरचे चंचल पदार्थ दिसेनासे झाले. म्हणून तिच्या डोळ्यांना पाणी लावण्यांत आलें. बेशुद्ध माणूस शुद्धीवर येण्यासाठीं असें पाणी लावतातच.

**श्लोक ३३ विजया**— सीतेच्या सखीचें नांव. **सये**- सखे! सीतेनें आपला मनोदय येथें अगदीं स्पष्ट केला आहे. **श्लोक ३४**—रामाचें कोमल शरीर पाहून असलें कठीण व जड धनुष्य त्याला उचलेल कसें अशी सीतेला शंका वाटून, आपल्या पित्यानें व्यर्थ असा कठीण पण लावला, याबद्दल तिला हळहळ वाटली. रामाला जर हा पण जिंकतां आला नाहीं, तर आपणास त्याचा लाभ कसा होणार, अशी सीतेला चुटपुट लागली. **कांसवपृष्ट**- कांसवाच्या पाठीसारखे कठीण. **ननू**— खरोखर. **काय कळे मला**- मला कांहीं कळेनासें झालें आहे. **पण**- जनकानें लावलेल

पण. हा श्लोक हनूमन्नाटकांतील याच प्रसंगाच्या वर्णनपर श्लोकाचा निवळ अनुवाद आहे. पहा — " कमठपृष्ठकठोरमिदं धनुर्मधुरमूर्तिरसौ रघुनंदनः । कथमधिज्यमनेन विधीयतामहह तात पणस्तव दारुणः ॥ १।९. नागेशानें देखील या श्लोकाचा असाच अनुवाद आपल्या सीतास्वयंवरांत केला आहे. पहा—" कमटपृष्ठकठोर धनुर्महा, । मदनसुंदर तो रघुराम हा ॥ लघु कसा धनु लाविल, पां गुणीं, । अहह ! हा, पण दारुण साजणी ! ॥ ३२० ॥ यावरून हनूमन्नाटक हें आमच्या मराठी कवींना कसें प्रोत्साहक झालें आहे, तें दिसून येतें. श्लोक ३५-येथें मात्र रामाचें थोडें तरी शारीरवर्णन आलें आहे. **निमासुर** — सुंदर, सुरेख, लावण्ययुक्त. पहा—" सुंदर निमासुर वदन । रघुनंदन उभा तेथें "—हरिविजय ५।१६८, किंवा 'मुख निमासुर बरवंट' —वेणाबाई— सीतास्वयंवर १३।१४. **नागर**—सुरेख, सुंदर, सुसंस्कृत. या ओळींत बहुतेक समानार्थीच शब्द योजिले आहेत. **मन्मथगाभा** — मदनाचा केवळ गाभा. मदन हा सौंदर्याबद्दल प्रसिद्धच आहे. **अंबुजशामळ** — कमलाप्रमाणें नीलवर्ण. **चांचरकुंतळ** — चंचल, कुरळे केस. **षट्पदशोभा** — भृंगांची शोभा. रामाचे कुरळे केस भृंगाप्रमाणें शोभत होते. राम हा अंबुजशामल असें म्हटल्यावर, त्याच्या केसांना षट्पद म्हणणें योग्यच आहे. कारण कमळावरच भृंग बसणार ! " अंबुदशामल " हा पाठ म्हणूनच अयुक्त. **वज्रागरासन** — इंद्राच्या वज्राप्रमाणें कठिण असें धनुष्य. या धनुष्याला रामाच्या हांतून शासन कसें घडेल ? तें रामाकडून कसें उचललें जाईल ? याची सीतेला चिंता पडली. रामाचा सुकुमारपणा पाहून त्याच्या हांतून हें धनुष्य उचलण्याचें काम कितपत निभावेल याबद्दल सीतेला विवंचना पडली व म्हणून सीता म्हणते कीं, ' रावण कदाचित् तें उचलील तर मी तात्काल देहत्याग करीन. त्याची मी वाटच पहात बसलें आहे." रावण प्रचंड असल्यामुळें, तो कदाचित् तें धनुष्य उचलील असें सीतेस वाटलें, व मग आपल्या बापाचा पण त्याच्याकडून जिंकला जाऊन आपणावर त्याची पत्नी होण्याची आपत्ति ओढवावयाची. त्यापेक्षां देहत्याग केलेला बरा असा सीतेचा निर्वाणीचा निश्चय.

**श्लोक** ३६- **येरीकडे**- दुसरीकडे. सीतेच्या मनांत एकीकडे हे विचार, तर दुसरीकडे रावण धनुष्य उचलण्यास तयार झाला देखील. **अन्यप्रभू इ०**— दुसऱ्या राजांना रावणाप्रमाणें तें धनुष्य कसें तोलणार? तें रावणालाच तोलणार असें सीतेला पक्कें वाटे. म्हणून ती प्रार्थना करूं लागली. **श्लोक ३७** येथून ४२ श्लोकापर्यंत, रावणाला तें धनुष्य उचलूं नये म्हणून सीता अनेक देवदेवतांची प्रार्थना करते. प्रथमतः ती आपल्या आईची, भूमीची प्रार्थना करते, कारण तें धनुष्य भूमीवरूनच उचलावयाचें होतें, व भूमि तर सीतेची आईच. म्हणून भूमीनेच रावणाला तें धनुष्य उचलण्यांत अडथळा करावा अशी सीतेची अपेक्षा, व ती बरोबरच आहे. कारण प्रत्यक्ष आईवांचून मुलीची इच्छा कोण पुरी करणार? **तस्मै इ०**— ब्रह्मदेवालाही नमन असो. त्यानें देखील रावणाला पाडण्यांत सहाय्य करावें, अशी सीतेची विनंति. **देवद्रोहक**— हा रावण देवांचा द्रोह करणारा असून, तो पृथ्वीला गांजणारा आहे. म्हणून सीतेचें आपल्या आईकडे मागणें असें कीं, "तूं रावणाला उताणा पाड, व त्याच्या उरावर हें धनुष्य चक्राप्रमाणें फिरूं दे." **चक्रन्यायजवें**- चक्राप्रमाणें वेगानें. **श्लोक ३८**— आतां सीता गणपतीला, शंकराला व इतर देवतांना वरीलप्रमाणेंच प्रार्थना करते. **भूतेशा**— हे शंकरा! तुझें नवसाला लावलेलें त्र्यंबकचाप, दुष्ट रावणाला छळू दे. **चामुंडा**- शंकराच्या शक्ती. या नवकोटी चामुंडा या धनुष्यावर जोरानें बसोत. म्हणजे इतक्यांच्या वजनानें रावणाला तें धनुष्य उचलणार नाहीं. **कात्यायनी**— याही शंकराच्या शक्तीच आहेत. या छप्पन्नकोटी कात्यायनी धनुष्यावर भार घालोत. म्हणजे रावणाला तें उचलणें अशक्य होईल. **श्लोक ३९** – आतां आणखी देवांची प्रार्थना. **शेषा** – आदिशेष, यानेंच ही पृथ्वी आपल्या फणेवर धारण केली आहे, अशी कल्पना आहे. "हे शेषा! तूं पृथ्वीचा भार डोक्यावर घेऊन तिच्यासहित या धनुष्यावर भार घाल. **निर्जरकुंजरासहित** - देव व ऐरावतासह. इंद्र हा देवांचा राजा असून, त्याचा ऐरावत

नांवाचा हत्ती आहे. म्हणून त्यांच्यासह येऊन तूं धनुष्याला ओढून घर अशी सीतेनें इंद्राला विनंति केली आहे. **सत्यलोकरमणा** – सत्यलोकाचा राजा, ब्रह्मदेव. **कूर्मा** – आदिकूर्म. ज्यानें समुद्रमंथनप्रसंगीं मंदरपर्वत आपल्या पाठीवर धरला. **त्रैलोक्यपारायणा** – त्रिभुवनाचें रक्षण करणाऱ्या. **निजकूर्मचक्र** – विष्णूच्या कूर्मावतारांतील कूर्माच्या पाठीचें चक्र. पाठीवरच आदिकूर्मानें पृथ्वी धारण केली असल्यामुळें, हें पाठीचें चक्र तूं फिरवितांच पृथ्वी कंपायमान होऊन मग रावणाला तें धनुष्य उचलतां येणार नाहीं, असा सीतेचा आशय. कूर्मावताराबद्दलचा उल्लेख पहा – "क्षितिरतिविपुलतरे तव तिष्ठति पृष्ठे, धरणिधरणकिणचक्रगरिष्ठे । केशवधृत कच्छपरूप जय जगदीश हरे ॥ – गीतगोविंद.

**श्लोक ४०** येथें सीता अनेक देवतांची, त्या धनुष्यावर बसून तें जड करण्याबद्दल आणखी प्रार्थना करते. **भेरुंडा–भुवनेश्वरी**– या अशाच देवता आहेत, त्यांचें स्पष्ट स्वरूप कोठें दिलेलें दिसत नाहीं. **ऐंद्री**– दुर्गेचें एक नांव. ऐंद्री = इंद्राणी असाही अर्थ होईल पण तिचा उल्लेख याच श्लोकांत पुढें आला आहे. **षोडशी** – या सोळा मातृका असाव्या. पहा– 'गौरी पद्मा शची मेधा, सावित्री विजया जया । देवसेना स्वधा स्वाहः मातरो लोकमातरः । शांतिः पुष्टिर्धृतिस्तुष्टिः कुलदेवात्मदेवताः' ॥ यांत देखील शची व सावित्री यांची पुनरुक्ति झालीच आहे. **श्रीबाळा इ०**–या क्षुद्रदेवता आहेत. पहा–जाखमाता मायराणी । बाळा बगुळा मानविणी । '– दासबोध, ४।६।१६. तसेंच पहा– " नेणेंचि बालाबगलादिसेवा । जाणें तुजे केवळ पाय, देवा ! ॥ सामराज रु. इ. १।३५ **व्रततिथी**–व्रतांच्या तिथी. **तारा**–बृहस्पतीपत्नी. ही चंद्रावर आसक्त झाली. **पंचदशी** – पूर्णिमा. **सावित्री** – गायत्री मंत्र. **शची** – इंद्राणी. **काळरात्रि** – भयंकर किंवा प्रळयकाळची रात्र. पहा– " काळरात्रीचीं कटकें । उठावलीं जैसीं ।' ज्ञानेश्वरी ११।१९९. मात्र 'काळरजनी' ही एक रात्रिंचर देवता आहे, पण ती येथें अभिप्रेत नसावी. **धन्वंतरी** – देवांचा वैद्य. हा समुद्र-

मंथनांतून निघालेल्या १४ रत्नांपैकीं एक आहे. या सर्व देवता या धनुष्यावर बसोत, असें सीतेचें मागणें. **श्लोक ४१** — आतां भूतपिशाच्चांना आळविण्याची पाळी येते. अष्टभैरवांचा उल्लेख मागें २२ व्या श्लोकांत आलाच आहे. **विभ्रांतितनू** — शरीर धारण करून. पिशाच्चें वायुरूपीं असतात. पण त्यांनीं शरीर धारण करून आज धनुष्य ओढण्यास यावें, असा भाव. **झोटिंग** — मुसलमानाचें पिशाच्च. पण रामकाळीं मुसलमान कुठले? **मुंजे** — मुंजा = मुंज झालेला पण सोडमुंज होण्यापूर्वीं मरून भूत झालेला. **कूष्मांड**— भूत किंवा पिशाच्च. **पूतना** — एक राक्षसी. कृष्णाचा नाश करावयास आलेली त्याची मावशी. यावरून नावडती मावशी, दुष्ट स्त्री. **शाकिनी-डाकिनी** — या स्त्रीपिशाच्चिका आहेत. **महामारी** — जिवापाड श्रमानें. "तुम्हीं आज आटोकाट प्रयत्न करून हें धनुष्य ओढून धरा, म्हणजे तें रावणास उचलणार नाहीं," असें सीता भूतपिशाच्चादिकांना सांगते. कोणीकडून तरी रावणाला तो पण जिंकतां येऊं नये, हीच तिची उत्कट इच्छा. **श्लोक ४२** — यानंतर ज्या परशुरामाचें तें चाप, त्याचाच सीता आतां प्रत्यक्ष नवस लावते. **विसभुज** — वीस हाताचा, अर्थात् रावण. रावणानें धनुष्य उचलल्यास आपण जगणार नाहीं, असा सीतेचा नवस. **षष्ठावतारी** — परशुराम हा विष्णूचा सहावा अवतार. अशा अवतारी पुरुषाशिवाय आपल्यासारख्या जडजीवांना कोण तारणार? असा सीतेचा भाव. धनुष्य जड करून व रावणास तें उचलण्यास अशक्य करून आपणास पर्यायानें तारावें असें सीतेचें मागणें.

**श्लोक ४३** — तें धनुष्य उचलण्याच्या चमत्कार रावण करीत असतां, तो पहाण्यास गांवांतले लोक जमले. **चित्र** — चमत्कार. **अभिनव** — पहिल्यानेंच. रावणाला त्यांनीं पूर्वीं कधीं पाहिला नव्हता. **घनसर** — जाड, मजबूद, भक्कम. रावण असा जाडजूड होता. **कळकुंबा** — दांडगा, (कळकाचा कोंब). **स्तंभ इ०** ज्याचे हात खांबाप्रमाणें लांबचलांब. मागें त्याला 'आजानुबाहु' म्हटलेंच आहे. पहा श्लोक ४।८. पवन हें धनुष्य

कसा उचलतो तें पाहण्यास देवप्रमुख आकाशांत आपलीं विमानें थांबवून राहिले होते. **श्लोक ४४** – धनुष्य उचलावयास जाणाऱ्या रावणाच्या हौशाचें वर्णन. **भूधूळीं इ०** – जमिनीवरील मातीनें त्यानें आपले दंड माखले. पाइलवान् लोक कुस्ती खेळण्यापूर्वी आखाड्यांतली माती अशीच अंगाला लावतात. **चमकला** – दचकला, भ्याला, बुजला. **मूर्धा** – डोकें. त्यानें आपलें डोकें जोरानें वर उचलून धरलें. तें शिवधनुष्य पाहून त्याच्या अंगांत कांपरें भरलें. **साटोप** – अतिनट त्यानें आपल्याकडून करावयाचा तो नेट केला. **दावी भाव इ०** – आपणास असें वजनदार धनुष्य उचलण्याचा जणु सरावच आहे, असा आविर्भाव रावणानें दाखविला. **श्लोक ४५ तें** – धनुष्य इंद्राच्या वज्राप्रमाणें त्याला कठिण वाटलें. 'इंद्रवज्रा' ची उपमा धनुष्याला देऊन कवीनें जातां जातां श्लोकाचें 'इंद्रवज्रा' हें वृत्तही सूचित केलें आहे. पण विट्ठल 'सम' व 'तुल्य' असे समानार्थी शब्द एकत्र घालतो. पहा मागें. सर्ग ४।३. **स्पर्शीं इ०** – रावणानें जमीनीची धूळ घेतांना भूमीला स्पर्श करतांच त्याच्या अंगांतली शक्ति नाहींशी झाली. भूमी ही सीतेची आई असल्यानें, तिनेंच सीतेसाठीं त्याला बळहीन करून टाकलें. 'स्पर्शे सिताच्या' हा काव्यसंग्रहाचा पाठ, या दृष्टीनें मुळींच हृद्य नाहीं. **कोदंडतोलीं इ०** – रावण जों धनुष्य तोलूं लागला, तों त्याचें धैर्य गळून गेलें

**श्लोक ४६** एखाद्या कोंकणांतील माणसानें देशावर जावून श्रमानें द्रव्यसंचय करावा, व तें द्रव्य, जातांजातां फुकट चोरांनीं लुटून न्यावें, म्हणजे जशी त्या माणसाच्या मनाची वंचना होते, तसाच प्रकार रावणाचा झाला. आजपर्यंत त्यानें मिळविलेला लौकिक व प्रौढी, तें धनुष्य उचलतांना अकस्मात् रसातळाला गेली! **लज्जानृपांची** – इतर राजे त्याप्रसंगीं लाजलेले आहेत, असें पाहून रावणाच्या मनाला धीर आला. राजे लोकांनीं लाजेनें आपलीं तोंडें खालीं घातल्यानें आपलें धैर्य गळलेलें त्यांना दिसलें नाहीं, हें पाहून रावणाला जरा बरें वाटलें. **श्लोक ४७** – रावणाचा तें

धनुष्य उचलण्याचा प्रयत्न येथें वर्णन केला आहे. **न गवसे**—रावणानें आपल्या वीस हातांनीं तें धनुष्य ओढलें, पण तें त्याच्या हातांत आलेंच नाहीं. **मांडखडी**—वीरासन. पहा—'मग गोसावियांपुढें मांडखुटी घालूनि बैसले'।—श्रीगोविंदप्रभुचरित्र १०८. तसेंच "मांडीखुटी येउनि तोलिताहे। तथा न तोले, उर योजित हे"॥—नागेश—सीतास्वयंवर ३४२. **जानू**—गुडघे. जमिनीवर गुडघे टेकून रावण हातानें तें धनुष्य तोलून पाहूं लागला. **या उपरि इ०**—तें धनुष्य हालेचना असें पाहून रावणानें तें छातीशीं कवटाळून धरलें. पण यामुळें त्याला धाप लागली, त्याच्या शरीराला कंप सुटला. म्हणून छातीस धरलेलें तें धनुष्य त्याला पायाच्या घोट्यापर्यंत आणावें लागलें. **गुल्फ**—पायाचा घोटा. 'पोटीं धाक' हा काव्यसंग्रहाचा पाठ अर्थहीन आहे. **श्लोक ४८**—रावणाची तें धनुष्य उचलण्याची खटपट, व शेवटीं तें त्याच्या उरावर येऊन तो उताणा पडल्यानें त्याची झालेली फजीति, येथें वर्णन केली आहे. **झोंबी लोंबी इ०**—रावण त्या धनुष्याशीं मोठ्या शिकस्तीनें झोंबी खेळला, त्याला लोंबकळला, व आपले वीस हात एकत्र करून त्यानें तें धनुष्य कसें तरी गुडघ्यापर्यंत उचललें. **टेंका इ०**—तें धनुष्य जमिनीवर दिर्घपणानें टेंकलेलें असल्यानें, डळमळत होतें. त्यामुळें रावणाला तें प्रयत्नानेंहि आवरेना. **साक्षपेंसीं**—प्रयत्नानें. **सर्वांगीं इ०**—त्याच्या सर्वांगाला घाम सुटला. **वायु त्या इ०**—त्यावेळीं वारा देखील अशा दिशेनें वाहूं लागला कीं, उलथणाऱ्या धनुष्याला त्याचें साह्यच व्हावें. धनुष्याच्या मूळच्या वजनानें तें उलथलें, व त्यांतही वाऱ्याच्या वेगाची त्याला मदत झाली. **त्याच्या इ०**—त्या धनुष्याच्या हेलकाव्यानें रावण पृथ्वीवर उताणा पडला, व त्याच्या पडण्याचा आवाज पृथ्वींत जिरून गेला, शांत झाला. **धात्री**—पृथ्वी. या श्लोकाला समानार्थक पहा—उलथला पृथु मेरु जसा दिसे। उपरि तो परतोनि उरीं बसे॥ अवनि राक्षसपाठिशि वांसते। अधर भोंकर भोंकही वासतें॥—नागेश, सीतास्व. ३४३. अनंतकवीनें देखील या प्रसंगाचें असेंच वर्णन केलें आहे. पहा—'धनुष्या

लंकेशें अमित बलकोशें उचलिलें। न थारे भूमीसीं, पदयुगुल चापें कळथिलें; ॥ त्वरें त्याचें वक्षःस्थळिं बसुनि पाडी क्षितितळीं, । उताणा आक्रंदे, तंव महि मुखीं घालित धुळी. ॥ — अनंत-सीतास्व. ७६.

**श्लोक ४९**— ते धनुष्य रावणाच्या उरावर पडून तो जेव्हां जमिनीवर उताणा पडला, त्यावेळीं त्याची कशी स्थिति झाली तिचें हें वर्णन आहे. आपल्यावर मेरुपर्वताचा कडा कोसळून पडला आहे, किंवा सर्व पृथ्वीच आपल्या अंगावर ढासळली आहे, किंवा सूर्याच्या रथाचा घोडाच आपल्यावर पडला आहे, इतक्या त्रासानें रावण गांजून गेला. आपल्यावर मेघ तर गडगडून पडला नाहीं ? असें वाटण्याइतका तो प्रसंग रावणाला भयंकर वाटला. रावणाची ही अशी शोचनीय स्थिति, तर इकडे सीतेचा मनरूपी मयूर तांडवनृत्यानें नाचला व आनंद पावला. यांतील विरोध लक्षांत घेण्यासारखा आहे. रावणाच्या फटफजीतीनें तिला पाहिजे होतें तेंच नेमकें झालें होतें. मग तिचें मन हर्षानें कां नाचूं नये ? **चवला**–च्यवला = पडला. **मेधा**– त्रास. **तांडवनटें**- तांडवनृत्यानें, अभिनयपूर्वक नृत्यानें. **श्लोक ५०**–रावणाची अशी फजीति झालीसें पाहून लोकांनीं एकदम टाळी पिटली. **कळका**– गलका = गलबला, गडबड. **भीतां इ०**– प्रतापी राजे मनांत भ्याले, चरकले. रावणाच्या या फजितीचें पर्यवसान आतां कशांत होणार याबद्दल ते साशंक झाले. **आलें विघ्न इ०**–आलेलें विघ्न नष्ट झालें. रावण कदाचित् तें धनुष्य उचलील ही सीतेवर ओढवलेली आपत्ति नष्ट झाली. 'आलें'–हा भूतकाळवाचक प्रयोग पूर्णभूतकाळवाचक म्हणून योजला आहे. **विटंबिलें** — नष्ट झालें. त्यानंतर सीतेची सखी तिला म्हणाली, 'आतां रामचंद्राला वर.' रावणाचें भय गेलें. असा अर्थ. **श्लोक ५१**– धनुष्य उरावर पडल्यानें झालेली रावणाची शोचनीय अवस्था आणखी वर्णन केली आहे. धनुष्याच्या भारानें तो खालीं दडपला गेल्यामुळें, त्याची मुद्रा खेचरी झाली. **खेचरी मुद्रा**– ही हटयोगांतील एक मुद्रा आहे. या मुद्रेंत योग्यानें आपली दृष्टि भुवयांच्या मध्यभागीं स्थिर करावयाची असते. धनु-

त्याच्या वजनानें रावणाची मुखचर्या अशीच खेचरी मुद्रा लावलेल्या योग्या-प्रमाणें झाली. त्याचे डोळे भुवयांच्या मध्याकडे वळले, अर्थात् त्याची शुद्धि नाहींशी झाली. **आरक्त इ०**— त्याचें शरीर रक्तानें भरून गेलें. **चक्रन्याय इ०**— वज्राप्रमाणें कठिण असें तें धनुष्य, रावणाच्या उरावर व पोटावर एखाद्या चक्राप्रमाणें फिरूं लागलें. 'न्याय' हा शब्द 'प्रमाणें' या अर्थी योजण्याची विठ्ठलाला संवय आहे. शिवाय या चक्रन्यायाची उपमा कवीनें अनेकदा देऊन आपल्या प्रतिभेची असहायता दाखविली आहे.

**श्लोक ५२ त्रिपुरें**—लोह, रजत व सुवर्ण अशीं तीन पुरें मयासुरानें निर्मिलीं होतीं. देवांच्या व ब्रह्मदेवाच्या विनंतीवरून महादेवानें विष्णूचा बाण करून तो आपल्या धनुष्यावर जोडला व त्यानें त्रिपुरांचा नाश केला अशी कथा आहे. ज्या धनुष्यानें शंकरांनीं हीं तीन पुरें नष्ट केलीं, तेंच शिवधनुष्य रावणानें उचलतांच तीं तीन पुरें निर्विघ्न झालीं. कारण आतां आपला नाश करण्यासाठीं कांहीं तें धनुष्य पुनः येणार नाहीं, असें त्यांना वाटलें असावें. **रक्ताच्या इ०**—रावणाची त्या धनुष्यानें अगदीं मरणोन्मुख अशी अवस्था केली. **वमे** -- ओकला. **प्रधानसमुहो**-रावणाचें प्रधान-मंडळ आपल्या मालकाची अशी अवस्था पाहून त्याच्या सुटकेसाठीं त्याच्या-जवळ धावलें. **श्लोक ५३**—रावणाच्या उरावरील तें धनुष्य काढून त्यांतून त्याची सुटका करण्यासाठीं मांडलीक राजे व सहस्रावधी पैलवान धनुष्याला ओढूं लागलें. **सामंत**—मांडलीक राजे. **चंडबळिये**—मोठे बळवान् पुरुष. **बाणा-सन**— धनुष्य. **कैंचा इ०**—रावणाचा रत्नजडित मुकुट कुठच्या कुठं गेला होता! त्याच्या पडण्याबरोबर तोही लांब जाऊन पडला होता. **भूतळवटीं**—ज्यामुळें रावणाचीं दहा तोंडें जमिनीवर बोडकींच लोंबत होतीं. **माथे**-तोंडें. **रिते**-मोकळे, बोडके. **सारण**—रावणाचा दूत. त्यानें रावणाच्या उरावरील धनुष्य एकीकडे सारून त्याला उठविलें. **टाकी इ०**— रावणाला धाप लागली होती, त्याचा श्वासोच्छ्वास जोरानें चालला होता. **घटोदकें**—रावणानें यानंतर आपलीं दहाही तोंडें घागरींतल्या पाण्यानें धुतलीं. त्याचीं

सर्व तोंडें रक्तबंबाळ व धुळीनें माखलेलीं असल्यामुळें, आतां त्यानें तीं स्वच्छ धुतलीं. **श्लोक ५४ झांकी इ०** – ज्या रावणानें आपल्याच तोंडांनीं आपली कीर्ति गायिली होती, त्याच रावणानें तीं तोंडें आतां झांकून घेतलीं. **जाली इ०** – लौकिकाला लज्जा प्राप्त झाली. 'लज्जा' याचा अर्थ 'मर्यादा' असा केल्यास लौकिकाची मर्यादा झाली. लौकिक संपला, गेला, असा अर्थ होईल. **मृत्यु चुकलें** – धनुष्याच्या रूपानें रावणावर जो मृत्यु ओढवला होता, त्यांतून तो कसाबसा निसटला. **आदान** – मिळावयाचें तें मात्र नष्ट झालें. सीतेचा जो लाभ व्हायचा होता तो मात्र हातचा गेला. **पहा** – 'पदयुगुल हरीचें हंस आदान आहे' — वामराज – रु. ह. २।११. हें रावणाच्या बजूनें झालें, तरी इतर राजांच्या मनांत 'हा रावण आतां काय करील कोणास ठाऊक' अशा भयंकर भीतीनें ठाणें दिलें. हा रावण झालेल्या फजीतीचा सूड घेतल्यावांचून राहणार नाहीं, अशी शंका सर्व राजांना वाटून त्यांच्या पोटांत भीतीचा गोळा उठला. **दुर्भय**– मोठें भय. **श्लोक ५५**– कवि पुढील सर्गांतील कथेची पूर्वसूचना देतो. **काव्यकथातरंगीं**– प्रस्तुत काव्याच्या कथेच्या निरनिराळ्या विभागांत; किंवा प्रस्तुत काव्यकथेच्या भिन्न-भिन्न लहरींत. **भवभोगव्यथा** – संसारभोगाची व्यथा. संसारांतील सुखदुःखांच्या अनुभवाचा त्रास, या चौथ्या सर्गाच्या वाचनानें नष्ट होईल; वाचकाची या संसाराच्या त्रासांतून मुक्तता होईल, सारांश त्याला मोक्ष मिळेल, अशी फलश्रुति कवीनें शेवटीं सादर केली आहे.

---

# सर्ग पांचवा



मागील सर्गांत रावणाचा मानभंग वर्णन केल्यावर या सर्गांत रामानें शिवधनुर्भंग केल्याची कथा ओघानेंच येते. **कांचवला**— खचला. **षडंगें**— दोन हात, दोन पाय, मस्तक व कंबर हीं मनुष्यदेहाचीं सहा अंगे आहेत. त्या मोठ्या धनुष्यानें रावणाचीं हीं साहीं अंगें अगदीं पीठ करून टाकलीं. **सुपर्णा इ०**— गरुडापुढें साप जसे भितात, तसेच स्वयंवरासाठीं तेथें जमलेले राजे, रावणाची ही गत पाहून भिऊन गेले. **श्लोक २**—धनुष्य उचलतांना रावण मागें हटला असें पाहून जनक राजाला सीतेच्या स्वयंवराच्या अटीची घोषणा पुनरपि करावी लागली. "हें शिवचाप वांकवून जो त्याला दोरी चढवील, त्याचीच सीता पत्नी होईल." अशी जनकाची ही उघड घोषणा होती. **सदसिं**—राजसभेंत. **दशवदन इ०**—रावणाच्या दंडांनी. **लववुनि**—वांकवून. **या**—दोरी. **दारा**-पत्नी. **त्रिभुवनजयलक्ष्मी**— जिच्या प्राप्तीनें त्रिभुवन जिंकल्याप्रमाणें होणार आहे, अशी ही मैथिलीरूपी लक्ष्मी. हा श्लोक हनूमन्नाटकांतील खालील श्लोकाचा अनुवाद आहे. पहा— "शृणुत जनक कल्पाः क्षत्रियाः शुल्कमेते दशवदनभुजानां कुंठिता यत्र शक्तिः। नमयति धनुरैशं यस्तदारोपणेन त्रिभुवनजयलक्ष्मीर्जानकी तस्य दाराः १।१८. **श्लोक ३**-जनकराजा पुढें आणखी सर्व राजांना संबोधून बोलतो. **यामाजि इ०**—या जमलेल्या राजांपैकीं एकही धनुष्य उचलायला उठत नाहीं, कीं त्याच्याकडे नुसतें पाहतही नाहीं! पृथ्वीवर एकटा रावणच वीर होता काय? पण गरुडाच्या दृष्टीपुढें कपोत पक्षी जसा वरमतो, तसा तो देखील पराभूत झाला! **श्लोक ४**—पण राजांची अगदीं केविलवाणी स्थिति झालेली होती. **भयाति इ०**—ते भयाला लुब्ध झाले होते, भयाच्या स्वाधीन झाले होते. **वाग्बंध**—त्यांच्या वाणीला, तोंडाला खीळ

बसली होती. **चित्रोपमा**-तें चित्राप्रमाणें निश्चल होते. **अधोमुखें-तोंडें** खालीं घातलीं आहेत असे. **जाणोनि इ०**—जनकराजाची सहनशीलता जाणून. जनक क्षमाशील आहे तो आपणास याहून अधिक कांहीं करणार नाहीं, हें जाणून ते न बोलतां बसले होते. **निःसंदेह इ०**-'मला तर असें खात्रीनें वाटतें कीं, जानकीला योग्य असा पतीच पृथ्वीवर नाहीं.' जो हा पण जिंकून तिला वरील असा कोणी वीर दिसत नाहीं, असें जनक-राजाचें आव्हान. **श्रीजानकीकारणें**-- विठ्ठल नेहमींच 'कारणें' हा शब्द द्वितीयेच्या प्रत्ययाबद्दल योजतो. **श्लोक ५**- जनक पुढें आणखी जाहीर करतो. "पृथ्वीवर जेवढे म्हणून राजे आहेत ते या सभेला आलेले आहेत. ही आमची कन्या तर अग्नितप्त सुवर्णाप्रमाणें झळझळीत असून, आपल्या लाभाबरोबरच लक्ष्मी व कीर्ति यांचा लाभही ती करून देणारी आहे. असें असून येथें एकही राजा हें धनुष्य ओढीत नाहीं, टणकारीत नाहीं, वांकवीत नाहीं, कीं उचलीत नाहीं. इतकेंच नव्हे तर तें कोणी हातांतही धरीत नाहीं. यावरून या पृथ्वीवर कोणी वीरच उरला नाहीं, हेंच खरें." **कलधौतकोमलरुची** – दाहोत्तीर्ण हेम्न इव कोमलारुचिर्यस्या सा. अग्नींतून काढलेल्या शुद्ध सोन्याप्रमाणें सुंदर कांति आहे जिची अशी. पहा— हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकाऽपि वा —रघुवंश—१. **श्रीकीर्तिलाभोद्यमा**— लक्ष्मी व कीर्ति यांच्या लाभाचा उद्यम, प्रयत्न करावयास लावणारी. विठ्ठलाचा हा श्लोक देखील हनूमन्नाट-कांतील खालील श्लोकाचा स्वच्छ अनुवाद आहे. पहा— "आद्वीपात्परतो-प्यमी नृपतयः सर्वे समभ्यागताः। कन्यायाः कलधौतकोमलरुचेः कीर्तेश्च लाभः परः। नाकृष्टं न च टंकितं न नमितं नोत्थापितं स्थानतः। केनापी-दमहो महद्धनुरिदं निर्वीरमुर्वीतलम्॥— १।१० नागेशानेंही आपल्या 'सीतास्वयंवरां'त या श्लोकाचा कांहीं अर्थ आणला आहे. पहा— 'विदेह राजा मग काय बोले,। 'कोदंड हें तों कवणा न तोले,॥ सर्वांसही साच कुनाम आलें, । निर्वीरमुर्वीतल काय झालें!' ॥—सीतास्वयंवर ३५८.

**श्लोक ६— मुनिनें**— विश्वामित्रानें. जनकाचें वरील आव्हान ऐकून विश्वामित्रानें आपल्याजवळ बसलेल्या रामाकडे साभिप्राय पाहिलें. त्याच्या रामाकडे पाहण्यांत, 'आतां तूं पुढें होऊन पण जिंक,' अशी आज्ञाच होती. म्हणून ती आज्ञा आपणास शिरसावंद्य आहे, असें रामानें सांगितलें. पण इतक्यांत लक्ष्मणाला जनकाच्या घोषणेनें कमीपणा वाटून तो मोठ्या आवेशानें म्हणाला, "रावणाचा मानभंग झाला म्हणून जनकाला सर्व पृथ्वी निर्वीर झालीशी वाटली. पण मला जनकाचे शब्द सहन होत नाहींत. 'पृथ्वीतल निर्वीर झालें' या जनकाच्या शब्दांनीं सूर्यवंशांतील आम्हां वीरांना कमीपणा प्राप्त झाला आहे." **श्लोक ७**— लक्ष्मणानें मोठ्या आवेशानें घट्ट कांस घातली व दंड थोपटून तो रामाला म्हणाला. 'महाराज! तुह्मीं या सभेंत मीं काय चमत्कार करतों तें पहा. मी आतां मेरु व मंदरपर्वत किंवा समुद्र व चंद्र यांना देखील जुमानीत नाहीं. फक्त तुम्हीं या दासाला — तें धनुष्य उचलण्याची — आज्ञा द्या. हें धनुष्य तर अगदीं जीर्ण जुनें झालें आहे. त्याची थोरवी ती काय! माझें सामर्थ्य तर पहा." **मंद्र**— मंदर पर्वत. ज्याची रवी करून देवदानवांनीं समुद्रमंथन केलें. **पिनाक**— धनुष्य. **श्लोक ८**— यावर राम हळुवारपणानें लक्ष्मणाला बोलला. **कौशिकें इ०**— 'विश्वामित्रानें पुढें होण्यास मला आज्ञा दिली आहे.' 'समर्पिली' या क्रियापदाचें 'आज्ञा' हें अध्याहृत कर्म घ्यावें. **येकल्या इ०**— 'मला एकट्याला जर हें धनुष्य उचलण्याचें निभावलें नाहीं तर मग तूं ऊठ." रामानें लक्ष्मणाला असें म्हणण्यांत थोडा स्वार्थ दिसत नाहीं काय? लक्ष्मणानें पण जिंकल्यास त्याला सीतेचा लाभ होईल, अशा बुद्धीनें रामानें लक्ष्मणाला मागें ओढला असेल काय? तसें असेल तर तें रामाला तितकेंसें श्लाघ्य नाहीं.

**श्लोक ९**— पुढें राम लक्ष्मणाला म्हणतो. **उगलाचि**— उगीच. पहा— 'तथापि बोटी उगला निरी हा'— सामराज— रु. इ. १।६८. **निर्वीर इ०**— 'पृथ्वीतळ निर्वीर कसें होतें तें तर पाहूं बा. आपणाला तर

कर्मीपणाचा शब्द सहन होत नाहीं.' **राजा** – जनकराजाला मात्र रामाचें हें भाषण ऐकून आश्चर्य वाटलें, व तो स्तब्ध राहिला. **श्लोक** १० – रामानें चाप उचलावयास जाण्याची तयारी केली. **गुरुपदाब्ज** – विश्वामित्राचें पदकमल. **लाघवें** – विनयपूर्वक. **ठेविला** इ० —विश्वामित्रानेंही रामाच्या डोक्यावर आपला वरप्रद हात ठेवला, व 'या धनुष्याचा भंग करण्यांत तूं विजयी हो' असा त्याला वर दिला. **श्लोक** ११ – सीता या वेळीं माडीवर होती. कदाचित् ती थोडी विमनस्क असल्यामुळें, सखीनें तिच्या वस्त्राचा पदर सांवरला. मग सखीनें सीतेला 'राम आतां उभा असून तो लवकरच धनुर्भंग करील' असें निक्षून सांगितलें. **श्लोक** १२- सीता आतां भूमीला, शेषाला, सूर्याला, तें धनुष्य उचलतांना रामाला साह्य करण्यास प्रार्थिते. जी सीता रावण तें धनुष्य उचलीत असतां, तें जड करण्याबद्दल याच देवांना प्रार्थीत होती, तीच सीता आतां राम तें धनुष्य उचलीत असतां, तें हलकें करण्याबद्दल त्याच देवांना विनंति करते. या दोन प्रसंगांतला हा विरोध लक्षांत ठेवण्यासारखा आहे. **उमाण धनुषा** – धनुष्याचा झाडा घे. उमाणणें=मोजणें, झाडा घेणें. 'उमानिधनुषा।' या काव्यसंग्रहाच्या पाठांतील 'उमानि' याचा कांहींच अर्थ होत नाहीं. उमानि म्हणजे शंकर असा अर्थ कोठेंच नाहीं. त्यामुळें काव्यसंग्रहाचा वरील पाठ अग्राह्य आहे. **कोटि** इ० – धनुष्याला टकल, व रामाला साह्य कर. **तपना** – 'सूर्या! तुझ्या हजार हस्तांनीं, किरणांनीं, तूं धनुष्याला ओढ, म्हणजे रामाला विशेष श्रम पडणार नाहींत. हे शंकरा! तूं आपल्या दश हातांनीं तें धनुष्य आवर, व हे कूर्मा! तूं तें आपल्या पाठीवर उचलून धर. दिग्गज हो! तुम्ही तें चाप धरा, व हे ब्रह्मदेवा! (विधि!) तूं तें धनुष्य हलकें होईल असें कर.'

**श्लोक** १३— येथें तीर्थें व्रतें इत्यादि नैमित्तिक कर्मे रामाला साह्य करोत व कोणीकडून तरी तें धनुष्य त्याच्या हातून भंग पावो, असें सीता इच्छिते. **पुरश्चरण**—ठराविक मंत्रजप. **उद्यापन**-व्रताची समाप्ति. **द्विज**-

**भुक्तमानें** – ब्राह्मणांनीं उपभोगलेलीं ( हवनें ) रामाला साह्य करोत. **सुकृत इ०** – " माझ्या गांठीं जर केलेलें पुण्य असेल, तर रामाच्या कल्याणकारक हातांनीं हें धनुष्य भंगो. " ' शिवें ' हें ' हातें ' याचें विशेषण घ्यावें. **श्लोक १४** – **उपरीवरि**– माडीवर. **पंकजाक्षि** – कमलनयना (सीता.) **पाहे इ०** – आपल्या मैत्रिणींत उभ्या असलेल्या तिनें, जगाचा तारक व परब्रह्मावर लक्ष ठेवणारा राम पाहिला. **नाना इ०** – भूमीला, आपल्या आईला, साक्षी ठेवून तिनें अनेक देवांना नवस लावले. रामाच्या हातून तें धनुष्य भंगो म्हणून पुष्कळ नवस केले. **भंगावया इ०** – इकडे समुत्सुक ( कांक्षी ) असलेला राम, धनुष्य भंगायला तयार ( उद्यत ) झाला. **श्लोक १५**—येथून १७ श्लोकापर्यंत रामाचें वर्णन लागतें. पण विठ्ठलाच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें शारीर वर्णन न करता, तो बाह्य अलंकारांचेंच वर्णन देत बसतो. त्यामुळें तें ठराविक ठशाचें होऊन बसतें. **केयूर व अंगद**— हीं बाहुभूषणें आहेत. पहा—' केयूरा न विभूषयंति पुरुषं हारा न चंद्रोज्ज्वलाः ' । भर्तृहरी २।१९. **कुंडलें**—कर्णभूषणें, डूल. **जांबनदें**—सुवर्णाचीं. मनगटांत सोन्याची कडी. दुसऱ्या ओळींत पादभूषणें सांगितलीं आहेत. **वांकी व तोडर**– हीं पायांतलीं भूषणें, वाळे पैंजणासारखीं आहेत. **घनरवें**— मोठ्या आवाजानें गर्जणारीं. पायांतले वाळे व पैंजण मोठ्यानें वाजत होते. **सीता इ०**– सीतेचा चित्तरूपी मोर नुसता नाचत होता. उल्हासानें सीतेचें मन हुरळून गेलें होतें. श्रीराम सर्व सभेपुढें धीरोदात्त पद्धतीनें उभा होता. त्याच्या प्रतापाचा महिमा वेड्या शास्त्रांनाही कळलेला नाहीं. शास्त्रं देखील त्याचं वर्णन पूर्णपणें करूं शकलीं नाहींत. **श्लोक १६** — राम उभा राहिला असें पाहून सर्वांचें लक्ष त्याच्याकडे लागलें. सर्वत्र आनंद दिसत होता. **चतुरंग सैन्य**— गज, अश्व, रथ व पायदळ असें चार प्रकारचें सैन्य. **परिधीं**– सभोंवार. **चित्रोपमा**– एखाद्या चित्राप्रमाणें सर्व निश्चल झालें. **थोकले**– थांबले, स्तब्ध झालें. **श्लोक १७**– रामाचें आणखी वर्णन. **भाळीं इ०**– कपाळाला अंगठ्याजवळचें बोट लावून. कोणतेंही जोखमीचें काम सुरूं

करतांना प्रथम नमनार्थ कपाळाला हें बोट लावण्याचा मल्लांचा वगैरे प्रघात आहे. **भूपांसुनें**— भूधूळीनें. मातीनें आपले बाहू माखले. ही देखील पहिलवानांची एक रीतच आहे. विठ्ठलानें या प्रकाराची पुनरुक्ति अनेकवार केली आहे. **भांवडभूत**— पिसाट. रामाच्या हालचालीनें त्याच्या गळ्यांतील मणि अस्ताव्यस्त झाला, व त्यानें आपल्या तेजानें विजानांही मागें सारलें. **वर्जिल्या**–मागें सारल्या. **कंजचरणीं**–रामाच्या पदकमलांमध्यें नेपुरें-पैंजण रुणुझुणु वाजत होते. **लघुकटीं**–बारिक कटीमध्यें. बारीक कंबर असणें हें सौंदर्याचें लक्षण आहे. रामाच्या कंबरेंत कंबरपट्टा ( कांची ), घागऱ्या ( किंकिणी ) व लहान घांटी ( घंटिका ) वाजत होत्या. **ब्रीद्रें पदीं**–रामानें जिंकलेल्या राजांच्या मूर्ती त्याच्या पादभूषणावर कोरल्या होत्या. **मेदुरें**–मोठीं, जाड.

**श्लोक १८**–धनुष्य उचलण्यास राम कसा सरसावला तें सांगतात. **चमकोनि इ०**–राम उल्हासानें बहरून गेला. **सांगातें**—बरोबर. **उजवे घालणें**–उजवीकडून प्रदक्षिणा घालून. **ज्या चढविले**–त्याला दोरी चढविली. **कर्णांत इ०**—कानापर्यंत जोरानें ओढलें. धनुष्याला दोरी बांधण्याचा जनकाचा पण रामानें जिंकला. **श्लोक १९**—रामानें तें धनुष्य उचलतांना त्याबरोबर विश्वामित्रालाही उचललें. रामानें विश्वामित्राच्याही मनाला उत्साह दिला. त्यानें तें धनुष्य मोडलें, व त्याबरोबरच राजे व जनक यांची संशयबुद्धी देखील मोडली. धनुर्भंग करून त्याबरोबरच रामानें इतर राजे व जनकराजा यांच्या मनांत असणारा आपल्याबद्दलचा संशयही पार घालविला. रामानें सीतेच्या चित्ताबरोबरच तें धनुष्यही आकर्षित करून परशुरामादिकांच्या अहंकार व गर्वाबरोबरच त्या धनुष्याचाही भंग केला, व सर्व धनुर्धरांना आपला नूर पालटायला लावला. रामाच्या या पराक्रमानें इतर धनुर्धरांची शरीरें काळवंडलीं. **धनुर्भृत्त्यक्त इ०**—धनुर्धाऱ्यांकडून टाकविल्या आहेत आकृती, सुंदर आकार ज्यानें असा राम. येथें सहोक्ति अलंकार होतो. हा श्लोक हनूमन्नाटकांतील खालील श्लोकाचा अनुवाद आहे.

पण विठ्ठलाला तो चांगला वठवितां आला नाहीं. त्यानें मुळांतील कांहीं शब्द जसे सोडले आहेत, तसे नवीनही शब्द योजले आहेत. तुलनार्थ पहा- " उत्क्षिप्तं सह कौशिकस्य पुलकैः सार्द्धं मुखैर्नामितं । भूपानां जनकस्य संशयधिया साकं समास्फालितम् । वैदेहीमनसा समंच सहसा कृष्टं ततो भार्गव-। प्रौढाहंकृति दुर्मदेन सहितं तद्भग्नमैशं धनुः "॥१-२३॥ **श्लोक २०**–रामानें तें शिवधनुष्य मोडलें, त्यावेळीं सर्वत्र कसा पृथ्वीप्रळयासारखा हाहाकार उडाला त्याचें वर्णन येथून दोन श्लोकांत केलें आहे. **दिग्मातंग**— अष्ट दिशांचे गज कंपायमान झाले. धनुर्भंगाचा आवाज त्यांनाही सहन झाला नाहीं. **रविरथीं**— सूर्याच्या रथाला जोडलेल्या घोड्याची हृष्टि मुलली. **उच्चैश्रवा**— हा वास्तविक इंद्राचा घोडा आहे. पण तो शब्द येथें सामान्य घोडा याअर्थी योजलेला दिसतो. **सीमा इ०**— त्या आवाजाचा एवढा परिणाम झाला कीं, समुद्रांनीं आपली मर्यादा सोडली. पहा- पृथ्वी याति विनम्रतां फणिपतेर्नम्रंकणामंडलं, बिभ्रत्क्षुभ्यति कूर्मराज सहितो दिक्कुंजराः कातराः । आतन्वंतिच्च बृंहितं दिशि भटैः सार्धं धराधारिणो, वेपंते रघुपुंगवे पुरजितः सज्जं धनुः कुर्वति–१।२२. मात्र शंकरानें आपली मान डोलवली. आपलें धनुष्य कोणीतरी वीरानें भंगलें, याबद्दल त्याला कौतुक वाटलें असावें. शिवाय तो रामभक्त असल्यानें, रामाच्या पराक्रमानें त्याला आनंद होणें साहजिक आहे. **श्लोक २१— शेष**– पृथ्वी डोक्यावर धारण करणारा शेष देखील भयानें कांपूं लागला. **उडुगणें**— नक्षत्रसमुदाय. **उलंडिलीं**– कलंडली. **हेलावला**– हेलकावला. **वारिधी**– समुद्र. पहा– 'हेलावला नलपयोधि दयारसाचा ' – रघुनाथपंडित – नलदमयंती. **सुमित्र**– लक्ष्मण. **मित्र**- मित्र असणारे. **मारू कुरू**– मारवाड व कुरु देशचे. **कोदंडदीक्षागुरू**– धनुर्विद्येची दीक्षा देणारा गुरु, श्रेष्ठ गुरु. पहा– " मग श्रीकृष्णरावो वानिला कवतिकें । वेधवंती दीक्षागुरु ॥ – नरेंद्र रु. स्वयंवर ६३६. राम हा धनुर्विद्येंत अग्रेसर असल्यामुळें, सर्व राजांत तो विजयी झाला.

**श्लोक २२**– या चापाच्याच अनुकूलतेमुळें, प्रभावानें, परशुरामानें ही पृथ्वी २१ वेळां निःक्षत्रीय केली व युद्धांत अनेक दुष्ट दैत्य मारले. अशीं धनुष्याकडून अनेक पापें घडल्यामुळें, त्यानें प्रायश्चित्त घ्यावयाचें ठरवून श्रीरामाच्या पादतीर्थीं जणु काय आपला देह ठेवला. एकाद्याच्या हांतून महापातकें घडलीं असतां, तो जसा एकाद्या पुण्यतीर्थीं आपला देह ठेवतो, त्याप्रमाणें या धनुष्याच्या हांतूनही अनेक हत्या घडल्यामुळें, त्यानें जणु शेवटीं रामाच्या पायाच्या पवित्र स्थळीं आपला देह ठेवला. वास्तविक रामानें कांहीं हा धनुर्भंग केला नाहीं, धनुष्यानेंच रामाच्या पायीं प्रायश्चित्त घेण्याच्या बुद्धीनें आपला देह विसर्जन केला, अशी कविकल्पना. पण हा श्लोक देखील कांहीं विठ्ठलाचा नसून तो हनूमन्नाटकांतील खालील श्लोकाचें भाषांतर दिसतें. पहा— " तब्द्रह्ममातृवधपातकि मन्मथारि क्षत्रांतकारि- करसंगमपापभीत्या । ऐशं धनुर्निजपुरश्चरणाय नूनं देहं मुमोच रघुनंदन पाणितीर्थे ॥१-२५॥" **आर्जवें**—मेहरबानीनें, अर्थात् प्रभावानें. **श्लोक २३** —रामावर पुष्पवृष्टि होते. **निर्जर**-देव. **देवदुंदुभि** – देवांचे नगारे. **तुरें-वाद्यें. संपूर्ण जाल्या इ०** – निनादानें दिशा भरून गेल्या. **भुजा**–बाहु. रामालिंगनासाठीं सीतेचे बाहु स्फुरण पावूं लागले. **श्लोक २४ – निशाण**– नगारे. **बिरुदाईत** – बाणा बाळगणारा. बाणा बाळगणारा राम विजयी झाला, असें नगाऱ्यांच्या आवाजांतून ध्वनित होत होतें. **विषयी** – गृह-स्थाश्रमी. ऋषी जसे आनंदित झाले तसे गृहस्थही झाले. **पुढें जाले इ०**- राजे पुढें चालूं लागले, व त्यांच्या मागून राम चालूं लागला. **उभी इ०** – उभी असलेली सीता हें सर्व पाहत होती, तर तिची सखी तिला हुडकतांना आनंदित झाली होती. 'प्रमुदित धराया धनुकरी' या काव्यसंग्रहाच्या पाठापासून चांगल्या अर्थाची निष्पत्ति होत नाहीं. सीतेला तें धनुष्य हातीं धरण्यासाठीं आनंदित होण्याचें कारण नाहीं. **श्लोक २५**– विश्वामित्र रामाचें अभिनंदन करण्यास पुढें येतो. **बाहो पसरुनि**–रामाला प्रेमानें आलिंगन देण्यासाठीं बाहू पसरून. रामानेंही आपली कृतज्ञता येथें व्यक्त

केली आहे. **गुरूआशीर्वादें**— गुरूच्या आशिर्वादानें. **श्लोक २६**— रामानें मग लक्ष्मणाला व इतर राजांना त्यांच्या अनुक्रमाप्रमाणें आलिंगन दिलें. **परिरंभिलें**— आलिंगिलें. **अर्धोन्मीलित**- डोळे किलकिले केले आहेत ज्यानें असा. रामाच्या विजयानें तो रागावल्याचें हें लक्षण आहे. **विक्रमें**— रामाच्या पराक्रमानें जो रागावला होता. **श्रोत्रीं**— श्रोत्रियांनीं, वैदिक ब्राह्मणांनीं. **कांचनपर्यळीं**— सोन्याच्या तबकांत, पहा—' क्षणु येकु स्वस्त जाली । आंतु माचेयावरि बैसविली । परियेळें वोवाळिलीं । राज-नितीं ॥३९१॥ —नरेंद्र—रु. स्वयं. **प्रणयिनीं**— स्त्रियांनीं. सोन्याच्या तबकांत ठेवलेल्या रत्नांनीं रामाला स्त्रियांनीं ओवाळलें.

**श्लोक २७**— **मणिमय** इ०— रत्नमय महापर्वत जो मेरु, त्या-प्रमाणें राम शोभला. **निकरीं**— निश्चितपणें. ' शिखरीं ' या काव्यसंग्र-हाच्या पाठांत स्वारस्य नाहीं. कारण मेरूच्या शिखराचें येथें कांहीं प्रयोजन नाहीं. **भूपें**- जनकराजानें. **श्लोक २८**— रामाच्या विजयोत्सवाप्रीत्यर्थ तेथें अप्सरांचीं व गंधर्वांचीं गायनें होतात. **सरिसे**- बरोबर. **सत्कार**- मानपान. **पारणें**- समाधान. राम पाहून देवांच्या डोळ्यांना समाधान झालें. **श्लोक २९**— आतां जनकराजा आपल्या प्रधानांना जानकील स्वयंवरमंडपाकडे आणण्याची आज्ञा करतो. **तीहीं**— प्रधानांनीं. **मूर्धनी**- मस्तक. नृपापुढें त्यांनीं आपलें मस्तक नम्र केलें. त्याची आज्ञा शिरसा-वंद्य केली. **सवें** इ०- बरोबर सैन्य घेऊन ते सीतेला आणावयास गेले **श्लोक ३०**— **वेत्रपाणी**— वेताच्या काठ्या हातांत घेतलेले. **पुढें**— सीतेपुढें. **हर्षपीयूष**— हर्षयुक्त अमृतवाणी. **बापें**— जनकानें. **श्लोक ३१**— सीतेला ते पुढें सांगतात. **मतंगिनी**— हत्तीण. सीतेला स्वयंवर-मंडपाकडे नेण्यास हत्तीण आणली होती. **रसनायिका**— अष्ट रस जाण-णाऱ्या स्त्रिया. श्रृंगार, वीर, करुण, रौद्र, हास्य, भयानक, बीभत्स व अद्भुत असे नाट्यशास्त्रांत रस सांगितले आहेत. असे रस जाणणाऱ्या स्त्रिया, सीतेला श्रृंगारशास्त्रांतील युक्त्या ( साधकी ) शिकवूं लागल्या. **साधकी**—

साधनें, युक्त्या, असा अर्थ 'साधणी,' व 'साधणूक' या शद्वांवरून केला आहे. कोशांत 'साधकी' असा शद्व सांपडत नाहीं. कामशास्त्रांतील अष्टनायिका खालीलप्रमाणें आहेतः— वासकसज्जा, विरहोत्कंठिता, स्वाधीन-भर्तृका, कलहांतरिता, खंडिता, विप्रलब्धा, प्रोषितभर्तृका, अभिसारिका. अशा अष्टनायिकांनीं सीतेला त्या शास्त्रांतील धडे देण्यास आरंभ केला असेल. 'रसनायकासि करिती सीतेप्रती साधकीं' असा हस्तलिखित प्रतीचा दुसरा पाठ आहे. पण तेथे करिती' या क्रियापदाला कर्ता दिसत नाहीं.

**श्लोक** ३२ – येथून सीतेचें शरीरवर्णन सुरू होत असून तें जसें सांकेतिक आहे, तसा त्यांत विठ्ठलाच्या चमत्कृति साधण्याच्या स्वभावानुसार ज्योतिषशास्त्रांतील बारा राशींचीं नांवें गोंवण्याचा त्याचा हव्यासही व्यक्त झाला आहे. प्रस्तुत श्लोकांत सीतेच्या अवयवांचें वर्णन करतां करतां कवीनें मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, धनु, मकर, कुंभ व मीन या बारा राशींची नांवेंही ध्वनित केलीं आहेत. विठ्ठलाला असे चमत्कार किंवा कूटप्रकार करण्याची संवय असून, पुढें सातव्या सर्गाच्या २७ श्लोकांतही त्यानें आपली ही हौस अशीच भागवून घेतली आहे. **भूकन्या कुचकुंभ** – पृथ्वीची कन्या जी सीता, तिचे स्तनरूपी कुंभ अतिशय कठीण ( कर्कश ) होते. स्तन घागरीप्रमाणें पुष्ट व कठीण असणें, हें सौंदर्याचें लक्षण मानतात. येथें कन्या, कुंभ व कर्क या तीन राशींचा निर्देश झाला आहे. **देखोनि इ०** या सीतेच्या स्तनकुंभांना पाहून हत्ती देखील लाजतो. आपलीं गंडस्थलें इतकीं पुष्ट व कठीण नाहींत म्हणून त्याला लाज वाटते. व्यतिरेकालंकार. **भ्रूचापें** – सीतेच्या भुंवया दोन धनुष्याप्रमाणें आहेत. येथें 'दोन चापें' यानें 'धनु' या राशीची सूचना दिली आहे. **नयनासि मीन न तुळे**– सीतेच्या डोळ्यांशीं मत्स्यांची तुलनाच होत नाहीं. सुंदर डोळ्यांना माशांची उपमा देतात, पण सीतेच्या डोळ्यांचें वर्णन करतांना ते अपुरे पडतात, असा भाव. येथें नयन द्वय=मिथुन असें समजल्यास मिथुन, मीन व तूळ या राशींचाही उल्लेख आला आहे. **पावे कटी केसरी** – सिंहानें सीतेची

बारीक कंबर घेतली. सिंहाच्या कंबरेप्रमाणें कंबर असणें, हें सुंदर स्त्रियांचें एक उपलक्षण आहे. पण येथें उलट सिंहानेंच सीतेच्या बारीक कंबरेचा स्वीकार केला आहे. इतकी सीतेची कटि अनुपम. यांत पुनः 'सिंह' या राशीचाही उल्लेख जातां जातां झाला आहे. **चंद्रास्या**- चंद्रवदना. सीतेचें मुख चंद्राप्रमाणें तेजस्वी होतें. **अलिकुंतळा**- भृंगाप्रमाणें काळेभोर केस आहेत जिचे अशी सीता. तथापि येथें अलि=वृश्चिक, विंचू, असा अर्थ असल्यानें 'वृश्चिक' राशीचीही येथें अभिव्यक्ति झाली आहे. **मृगदृशा**- हरिणाच्या डोळ्याप्रमाणें डोळे आहेत अशी. **लज्जा पडे मन्मथा**— जिला पाहून मदनहि लाजतो, जिच्या सौंदर्यानें मदनाला आपलें सौंदर्य तिच्यापुढें कांहींच नाहीं, असें वाटतें. येथें मन्मथ=मकरकेतु असें मदनाला दुसरें नांव असल्यानें, 'मकर' राशीही ध्वनित केली आहे. **ते तों मुख्य अजा**- ही सीता तर मुख्य आदिमाया, जिला जन्म नाहीं अशी (अजा). पण अजा=शेळी, मेषा, असा अर्थ असल्यानें, येथें मेष राशीही संबोधली गेली आहे. **वृषध्वजसखा त्याची प्रिया**- वृषध्वज जो शंकर त्याचा सखा जो राम त्याची ही पत्नी. सीता ही शंकराचा मित्र जो राम त्याची पत्नी. येथें वृषध्वज या शब्दानें 'वृषभ' या राशीचेंही संकीर्तन झालें आहे. **नान्यथा**- ही दुसरी तिसरी कोणी नव्हे. या श्लोकांत वर विवरण केल्याप्रमाणें बारा राशींचीं नांवें विखुरलीं आहेत. म्हणून या श्लोकावर 'द्वादशराशीन्यास' अशी संज्ञा दिली आहे. काव्यसंग्रहकारांना ही गोष्ट कळलीसें दिसत नाहीं. **श्लोक ३३**—सीतेच्या अवयवांचें आणखी सांकेतिक वर्णन. **कंबुग्रीवा**— शंखाप्रमाणें कंठ आहे जिचा अशी. पहा— 'स्मरस्य कंबुः किमयं चकास्ति दिवि त्रिलोकीजयवादनीयः।'–नैषध २२।२२. **कृशांगी**— सडपातळ अंगाची. पहा– "तन्वी श्यामा शिखरिदशना पक्वबिंबाधरोष्ठी। मध्ये क्षामा चकितहरिणिप्रेक्षणा निम्ननाभिः॥"—मेघदूत. देवलांच्या संशयकल्लोळ नाटकांतील खालील पद्यांत सुंदर स्त्रियांच्या अवयवांचें सांकेतिक वर्णन, एकत्र आलें आहे. पहा –'सुकांत चंद्रानना पातली

भ्रूधनु सरसावुनी ॥ कटाक्षखरशर सोडुनि भेदित हृदयाचि गजगामिनी ॥ रदन दिसति जणु शशिबिंबाचे खंड मुखीं खोंविले ॥ कुरळ केश शिरिं सरळ नासिका नेत्र कमलिनीदलें ॥ १ – २ **त्रिवळिस इ०** – सीतेच्या उदरावरील तीन वळया म्हणजे मदनाचा सोपानच जणु. पहा – ' या अत्यंत कृशोदरीं त्रिवळिका पाहा कशा शोभती । जैसा रोमलतेसि मंडप दिजे पावावया उन्नती ॥ '— निरंजनमाधव. किंवा " किंवा त्रिरेखा त्रिनदीच माना । रोमावळी सेतुनिबंध जाणा ॥ " – नागेश सीतास्व. २३७ **रंभास्तंभोरुकांडे** – केळीच्या खांबाप्रमाणें उरुभाग जिचा. पहा – रंभोरु कश्चिन्मनसो रुचिस्ते – रघु. ७. **रत्नें कीं दंतपंक्ती** – तिची दंत· पंक्ति जणु रत्नेंच. उत्प्रेक्षा. **श्रुतियुत पुतळ्या** – कानांत घातलेल्या पुतळया. त्या इतक्या तेजस्वी होत्या कीं, त्यांना चंद्रसूर्यही लाजत होते. **भांगीं** – भांगांत सेंदराची रेषा. भांगांत शोभेसाठीं सेंदूर रेखण्याची चाल असे. **मृगमद निडळीं** – कपाळीं कस्तूरी. पहा – " मृगमदतिलकं लिखति सपुलकं मृगमिव रजनीकरे ' – गीतगोविंद ७. **मुक्त नाकीं विराजे** – नाकांत मोतीं शोभत आहे. पहा – " भाळीं भांगटिळा, नासिकीं सुपाणीं—आनंदतनय—पूतनावध १८. तसेंच. " नासेस मोती विलसे सुपानी "—सामराज. रुक्मी. इ. ६।३४. किंवा. " नाकास मोतीं अति- रम्य भावें । दाणा तयाचा अति मोल पावें " ॥—नागेश सीतास्व. २०४. **श्लोक ३४**—आतां येथून सीतेच्या अंगावरील अलंकारांचें वर्णन करून कवीनें आपली बहुश्रुतता दाखविली आहे. **नवकनकमणी**-नऊ सोन्यांच्या मण्यांनीं युक्त अशी. नऊ फुलांची व शेवटीं गोंडा असलेली वेणी नवपरि· णीत वधूला पूर्वी घालीत असत. **साम्य इ०** – ज्या वेणीचें साम्य गंगेच्या त्रिवेणीसंगमाशींच शोभण्यासारखें आहे. सीतेची तिपेडी वेणी, गंगा, यमुना व सरस्वति यांच्या संगमाप्रमाणें शोभत होती असा अर्थ. पहा – वेणी त्रिवे· णीसम भासताहे । या कारणें ते त्रिगुणात्म, पाहे. ॥ नागेश – सीता. १९७ **लेणी**-दागिनें. **बत करिति इ०** – जिचे नेत्र पाहून हरिणी मनांत खेद

करतात. आपल्या डोळयाहून सीतेचे डोळे सुंदर असें पाहून हरिणींना खेद वाटला. **वत करणें**—खेद करणें. **एणी**-हरिणी. पहा-' एणिमांसमबळा च कोमला स्वर्गशेषमुपभुंजते नरः। " **केयूरें** – बाहुभूषण—' केयूरा न विभूषयंति पुरुषं हारा न चंद्रोज्ज्वला।'-भर्तृहरी. **पोतिपाणी** – गळयांतील मोत्याच्या कंठ्याचा पाणिदारपणा, तेज. सीतेचा कंठा पाणीदार मोत्यांचा होता असा भाव. **तळयुग इ०** –पायाचे तळवे तांबडे लाल. पहा 'प्रवाळाभा टांचा' – निरंजनमाधव. **बिंबोष्ट खाणी** – बिंबफलाप्रमाणें तांबड्या लाल ओठांची सीता जणु खाणच होती. **पुराणी** – मोत्यांची माळ. हा शब्द 'पुरवणी' यापासून रूढ झाला आहे. पहा– पुरणीगार = पटवेकरी. **गौरवा इ०** – जिचें गुणवर्णन करतांना कवींची वाणी कमी पडते, अपुरी पडते. या श्लोकांतही सर्ग २।५१ प्रमाणें द्वादशकमलबंध साधला आहे. **श्लोक ३५** – सुवासासाठीं सीतेनें अंगाला चंदनाची उटी लावली होती. **पटू**-रेशमी वस्त्र. **दाटित**—घट्ट, तंग. **कंचुकी**-चोळी. **मणि इ०**- जिच्या डोक्यांतील केसांत हिरा गुंफलेला होता. **पुरा**-पुरता. 'मणिपुरा' याचा काव्यसंग्रहकारांनीं दिलेला अर्थ निराधार आहे. **पंचांगुळीं मुद्रिका**—हाताच्या पांचीं बोटांत आंगठ्या होत्या. पहा—पोंहची जडित, नेटका सिका, । अंगुलीस नवरत्नमुद्रिका ॥ आरसीस अतितेज आगळें, । जेहगीर वरती दशांगुळें ॥२१३ – नागेश सीतास्व. तसेंच " त्या आरशा घालुनि आंगठ्याला, । त्याली असे सुंदर आंगठ्यांला ॥ साध्या बिलोरी नकशी जडीता, । दशावतारांकित मूर्तिमंता ॥'– सामराज रुक्मि ह. ६।२७. **अंजन** - काजळ. **शरच्चंद्रिका**-शरद् ऋतूंतील चंद्रप्रकाशाप्रमाणें शांत पण तेजस्वी.

**श्लोक ३६**-सीतेच्या अलंकारांचें आणखी वर्णन. **विरोद्या** – स्त्रियांच्या पायांच्या बोटांतील एक अलंकार. **पोल्हारें** – पायाच्या अंगठ्यांत घालण्याचें बायकांचें एक चांदीचें भूषण. **अनवट**—पायाच्या अंगठ्यांत घालण्याचा रुप्याचा दागिना. तुलनार्थ पहा-" अनवट निटल्या ही जोड

त्या जोडव्यांचा,। अनुपम उमटे हा शब्द पोल्हारियांचा ॥ रुचिरतर विरोल्या शोभती अंगुळीला। कितियक नग लेतां भार झाला मुलीला. ॥ — सामराज रुक्मिह. ६।३१. **गुणमयी**–गुणशालिनी सीता. **सुगंधे** इ०—ती जन्मरहित ( अजा ) सीता, सुगंधानीं सुवासित व सोन्याच्या अलंकारानीं युक्त अशी शोभली. **जांबूनद**— सुवर्ण. **मुकुर** — आरसा. पहा — ' करी धरोनि मुकुरास लक्षीं, । ते लेतसे अंजन, सारसाक्षी. ॥– नागेश – सीतास्व. २१७. **श्लोक** ३७ — **हडपिणी**–विडे देणाऱ्या. पहा — " सवें कर्पुरिका हडपिणी । चंद्रिका चवरीढाळिनी ॥ सिरगिरी धरी वारिणी । मयूरिका ॥ १०२ ॥ नरेंद्र – रु. स्वयं. विडे करून देणाऱ्या दासी सीतेला पिकलेल्या पानाचे विडे करून देत होत्या. **पायघडिया** – लग्नसमारंभासारख्या प्रसंगीं वरपक्षाकडील बायकांच्या मिरवणुकींत त्यांच्या रस्त्यावर अंथरलेलीं वस्त्रें. सीता ही राजकन्या असल्यानें ती चालतांना नेहमींच तिच्यापुढें पायघड्या पसरणें साहजिक आहे. **अवरजे** - हे कनिष्ठ भगिनी ! पहा – ' अमंस्त कंठार्पितबाहुपाशां विदर्भराजावरजां वरेण्यः ॥ ८४ ॥ रघु. ६. प्रधानांनीं सीतेला ' हे कनिष्ठ भगिनी ' असें संबोधणें शक्य आहे. **करी घेई** इ० – रामाच्या गळ्यांत घालण्यासाठीं माळ हातीं घे. **करिणीवरि** – हत्तिणीवर. **श्लोक** ३८ – आतां सीतेची आई तिला म्हणते. **म्हणे** इ० – " लाभस्तेषां जयस्तेषां कुतस्तेषां पराजयः । येषां इंदीवरश्यामो हृदयस्थो जनार्दनः " हा श्लोक म्हण असें सीतेची आई तिला सांगते. **अभिजित मुहूर्त** – दोनप्रहरचे बारा वाजण्याच्या पूर्वी एक घटका व नंतर एक घटका मिळून दोन घटकांचा काळ; सूर्योदयापासून आठवा मुहूर्त. पहा – ' वीरांच्या अभिमाना झाला अस्त । मध्यान्हीं आला आदित्य । मुहूर्तीं मुहूर्त अभिजित। समयो उचित लग्नाचा । एकनाथ रु. स्वयं. ७।६।४. या अभिजित मुहूर्तावर रामाला माळ घाल असे सीतेची आई तिला सांगते. शिवाय तिच्या हृदयांत इंदीवरश्याम असा राम वसत असल्यामुळें, तिला लाभ व जय हा ठेवलेलाच, असा

आईचा आशय. **श्लोक ३९** – सीता रामाकडे जावयास निघते. **घव-घवित** – ठसठशीत, गोंडस. पहा – ‘वदे ते अंबेसी घवघवित जीचा मुखविधू – सामराज – रु. इ. ८।८७. **शृंगारसरिता** – शृंगाररसाची नदी. **संभारेशीं** – सामग्रीसह. **गजगमनगा** – गजाप्रमाणें गति आहे जिची अशी. **मंजुगतिनें** – कोमल गतीनें. **महाद्वारीं इ०** – मग सीता स्वयंवरमंडपाच्या महाद्वारीं आली.

**श्लोक ४०** – सीतेला दासींची परिचर्या. एकजण तिला विडे देत होती, तर दुसरी तिला वाळयाच्या पंख्यानें वारा घालीत होती. **उशिर-व्यजन** – वाळयाचा पंखा. **विजणें** – वारा घालणें. रत्नजडित पिक-दाण्या घेऊन कांहींजणी सेवेसाठीं उभ्या होत्या. **लघुवस्त्रें** – हातरुमाल किंवा Napkins. या छोट्या वस्त्रांनीं कोणी सीतेच्या तोंडावरील घर्मबिंदू पुसत होत्या. **मुहुर** – मोहोर; लक्षणेनें घर्मबिंदु असा अर्थ घ्यावयाचा. **श्लोक ४१** – **मणिचवरडोलायुत** – रत्नजडित अंबारीनें युक्त. या शब्दाचा संबंध ‘करिणि’ कडे आहे. **चवरडोला** – अंबारी. पहा – ‘सहस्त्रकरी मदोन्मत्त । चवरडोल त्या पृष्ठीं ।’ – मुक्तेश्वर, विराटपर्व ८।२. काव्यसंग्रहकारांना याचा अर्थ लागलेला नाहीं. **आधोरण** – महात. महातानें मग सीतेपुढें, रत्नखचित अंबारी जिच्यावर घातली आहे अशी हत्तीण सजवून उभी केली. **सोपानें** – जिन्यानें. अंबारीवर चढावयास केलेल्या जिन्यानें सीता हत्तिणीवर चढली. **आसनपदीं**–आसनस्थानीं, अंबारींतल्या आसनावर मिरवली. **भूगोल** – सर्व पृथ्वी निखालस लखलखित भासूं लागली. **श्लोक ४२** – **सेनागवासित** – सेनेनें वेष्टित. **करां-भोजीं** – रामाच्या गळयांत घालण्यासाठीं हातीं माळ घेऊन आली. **श्लोक ४३** – सीतेची मिरवणूक पाहण्यास आलेल्यांची गर्दी वर्णन केली आहे. **आटणे** – थिजणें. त्या सेनेनें दाही दिशा थिजून गेल्या. **आटाळया** – गच्च्या, माळे, मनोरे. पहा – ‘आटाळयावरि लोकलाज त्यजुनि बाळा उभ्या ठाकती’। – शशिसेना. तसेंच. ‘वाटाबिही नाम.

भरें अटाळ्या। पौरांगना वाजविताल टाळ्या ' ॥ — सामराज, रु. इ. ५।१२ **श्लोक ४४ — भूदेव** — ब्राह्मण. **शांतिपाठ** — एरव्हीं मांगल्यासाठीं करतात तो वेदमंत्राचा पाठ. **स्वस्त्ययनें** — लग्नमुंजींतील एक धार्मिक समारंभ, स्वस्तिवाचन, पुण्याहवाचन. **श्लोक ४५** — सीतेच्या हत्तिणीच्या मागें, प्रधान हळू हळू बरोबर चालत होते.

**श्लोक ४६—महामूर्ध्निस्थानीं**—रामाच्या डोक्यावर. **किणकिणी**—किंकिणी, लहान घंटा. **रसना**— कडदोरा. **पदांभोजीं** इ०— रामानें पायांत आपल्या बिरुदावलीनें युक्त अशीं नूपुरें घातलीं होतीं व ज्यांच्या नादानेंच शत्रूंचा नाश होणार होता. **श्लोक ४७—देवर्षी** इ०- देव, ऋषि, राजे व सूर्य यांच्या समक्ष. **श्लोक ४८—सुलग्नीं**—विवक्षित कालीं उदयाचलाशीं संलग्न असणाऱ्या राशीस लग्न म्हणतात. शुभ राशींत सूर्याचा गमनकाल, यालाच मग सुलग्न असें म्हणतां येईल. अशा सुलग्नावर सूर्यानें ( पतंगें ) अभिजित् मुहूर्त पकडला असतां, सीतेनें रामाला माळ घातली. अभिजित् मुहूर्ताचा उल्लेख याच सर्गांत ३८ श्लोकांत आलाच आहे. **महीजेनें**—सीतेनें. **निजांगें**—आपणहून. **परिणिला**—विवाह केला. सीतेनें स्वयंवर केलें. **त्रिदशगण**— देवसमूह. **श्लोक ४९— मंत्राक्षता**— मंत्रयुक्त अक्षता, तांदूळ. **सूर्यांश**—सूर्यवंश. ज्या भाटांनीं रामाच्या सूर्यवंशाचें वर्णन केलें, त्यांचा जनकराजानें गौरव केला. **वानणें**—वर्णन करणें. **श्लोक ५०—खगपति**—गरुड. गरुड सर्पाचीं जशीं दोन शकलें करतो, त्याप्रमाणें रामानें आपल्या बाहूंनीं तें धनुष्य भंगिलें. **वदनीं** इ०—रावणाच्या मुखावर कालिम्याची कळा आली. सीतेनें रामाला वरलेलें पाहून रावणाचें तोंड काळेठिक्कर पडलें. **श्लोक ५१ विभागें**—पृथक्पणानें. **स्वार झाला** — निघाला, निरोप घेता झाला. त्यानंतर राजांनीं देखील जनकाचा निरोप घेतला. **श्लोक ५२** — जनक आतां दशरथाला आमंत्रण पाठवितो. **मूळ**--आमंत्रण. **लिखित** इ०—रामाचा सीतेशीं होणाऱ्या विवाहासाठीं, विश्वामित्रानें दशरथाला पत्र लिहिलें. ही कथा पुढील सहाव्या सर्गांत येणार आहे.

---

# सर्ग सहावा

रामानें शिवधनुर्भंग केल्यानंतर सीतेनें त्याला वरिलें व त्याच्या गळ्यांत माळ घातली. यानंतर जनकानें दशरथास अयोध्येहून आणून राम व सीता, यांचा विवाह निश्चित केला. या सर्गांत याच विवाहनिर्धाराचें वर्णन आलें आहे. **श्लोक १-धनुर्यागप्रांतीं**—धनुर्यागाच्या शेवटीं. धनुष्याला दोरी लावील त्याला जानकी देण्याचा जो पण जनकराजानें लावला होता, त्यालाच येथें 'याग' असें संबोधलें आहे. **प्रांतीं**—प्रकृष्टेन अंतीं. अगदीं शेवटीं. **लिखित**—पत्र. **अजपुत्रासि**—अजराजाच्या पुत्रास, दशरथास. **प्रेरावें**—पाठवावें. **निजकुळ**—आमचें कुळ, जनकाचें कुळ. पहा—'जनकानां रघूणांच संबंधः कस्य न प्रियः'। **श्लोक २ पूर्वारंभा प्रभुतिं**—पूर्वारंभा प्रभृति असें असावें. "पूर्वीं आरंभलेल्या कार्यापासून आतांपर्यंतचीं सर्व कार्यें निर्विघ्नपणें पार पडलीं" असें विश्वामित्राच्या लिहिण्याचा आशय आहे. विश्वामित्रानें दशरथाकडून रामलक्ष्मणांना आपल्या यज्ञरक्षणार्थ नेलें होतें. त्या कार्यापासून तों या धनुर्भंगापर्यंत सर्व कार्यें निर्विघ्न पार पडलीं, असें विश्वामित्र दशरथाला कळविण्याची संधि साधतो. **रायें**—जनकानेंही आपलें स्वदस्तुरचें पत्र प्रधानाबरोबर दिलेंच, व 'स्वयंवराची वार्ता सांगा व दशरथाला कांहींही करून आणा' असें त्यानें आपल्या प्रधानांना सांगितलें. **श्लोक ३-वसती**—मुक्काम. **श्लोक ४ राजमंत्रीं**—जनकराजाच्या प्रधानांनीं. **सांग**—यथासांग, आरंभापासून शेवटपर्यंत. **वासिष्ट**—वशिष्ट ऋषि हा दशरथाचा कुलोपाध्याय असल्यानें, विश्वामित्राचें पत्र त्यानेंच दशरथाला वाचून दाखविलें. **श्लोक ५-प्रणमुनि**—नमन करून. येथूनच विश्वामित्राच्या पत्रांतील मजकुरास प्रारंभ होतो. **यशोदारांमध्यें**—यशानें थोर असे जे राजे आहेत, त्यामध्यें. **दोघे कुमर**—रामलक्ष्मण. जे यज्ञरक्षणाला

नेले होते, ते सुखरूप आहेत. कारण विश्वामित्रानें त्यांना नेल्यापासून आतां- पर्यंत त्यांचा क्षेमसमाचार दशरथाला कळविलाच नव्हता.

**श्लोक ६**— विश्वामित्र आपल्या पत्रांत रामलक्ष्मणांना नेल्यापासून तों आजतागायत घडलेली सर्व हकीकत दशरथाला कळवितो. **स्वार झालों**- निघालों. पण असा वाक्यप्रयोग वीराला शोभेल तसा ऋषीला शोभणार नाहीं. **चौंच**— चार दिवसांतच. **सिद्धाश्रम** - विश्वामित्राचा आश्रम. **ताटका**- ताटका राक्षसी. तिचा रामानें वध केला. **याग**- विश्वामित्राचा यज्ञ, सात दिवस रामलक्ष्मणांनीं रक्षिला. **सुबाहु**- राक्षस. त्याच्या शरीराचें तिळाएवढे तुकडे करून त्याला रामानें मारला. **मरीचि**- मारीच राक्षस. **पिसारोन**- खवळून. **श्लोक ८**— विश्वामित्र पुढें आणखी लिहितो. **मूळ** – आमंत्रण. **थोर आश्चर्य**- रामानें धनुर्भंगाचा केलेला चमत्कार. **रघुविर इ०** – रामाच्या कररूपी तीर्थाच्या ठिकाणीं धनुष्यानें आपला देह ठेवला. रामाच्या पवित्र हातांनीं भंग पावल्यामुळें, धनुष्याचेंच उलट सार्थक झालें! **परिणिली** – विवाह केला. **श्लोक ९** – **धनुषदमानें** धनुष्याच्या भंगामुळें, रामानें धनुर्भंग करून पण जिंकल्यामुळें. **लग्नदानीं**- लग्नांतील कन्यादानप्रसंगीं. जनकराजा विधियुक्त कन्यादान करील तेव्हां. येथें विश्वामित्राचें पत्र संपतें. **हरिखेला** – हरखला, हर्षला. **घाव घाली निशाणी** – नगाऱ्यावर घाव घातला, नगारे वाजविले. पहा- हरीभक्तिचा घाव घाली निशाणीं। नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ – रामदास. हा नगारा कूच करतांना वाजवितात. येथें दशरथानें मिथिलेला कूच कर- ण्याची ही सूचनाच प्रधानांना दिली आहे. **श्लोक १० सुमंत** – दश- रथाचा प्रधान. **पालाणिजे** – सज्ज कर. तयार ठेव. पहा – "घाव दीधला निशाणा। म्हणे सैन्य पालाणा पालाणा ॥" – जैमिनी अश्वमेध – ४।१०७. तसेंच, 'जळनिभिवर यांनी शैल पालाणवावें' – मुक्तेश्वर, रामायण १।४४. **महंतें** – याचा संबंध 'सुमंतें' याकडे आहे. **श्लोक ११** – दशरथाच्या पागेंतील घोड्यांच्या जातींचें वर्णन. नागेशानें

देखील रामाच्या रागेंतील घोड्यांच्या विविध जाती देऊन आपलें अश्वशास्त्र-ज्ञान व्यक्त केलें आहे. पहा — नागेश, सीतास्वयंवर—" अरबी, बदक्षान, ताजी, तुर्की । रुमी, पर्वती, घुड्ड, कच्छी, इराखी, ॥ फिरंगी तथा यैंविये दक्ष माहा, । असे राघ रिचे घरीं अश्व पाहा ॥ २९७ ॥ सुरंग, सारंग, सुमेर, नीळे । जे पंचकल्याण, विशेष काळे ॥ जर्दे, बनोजो अबलख, तेजी, । नृपा घरीं ते बहुवेग वाजी "॥ २९८ ॥ **अरबी**—स्यात् पारसीकः ( राजव्य. कोश ) अरबस्तानांतील घोडा. आरबी घोडा प्रसिद्ध आहे. **इराखी**—यावनः स्मृतः ( राजव्य. कोश ). **हरी**—घोडे. **पंचरंगी**—पांच रंग एकत्र असलेले. **कच्छी**— कच्छी जवन उच्यते ( राजव्य. कोश ). **घोर**— मोठे. **टाकिती इ०**—धावतांना वायूला देखील वेगांत मागे टाकणारे. पहा—" नळाचेनि हस्तस्पर्शें । वारू उडाले गरुडा ऐसे । पवन वेगाहूनि विशेषें । मनोगती निघाले ॥ मुक्तेश्वर—वनपर्व—८।१०६. **श्लोक १२ – जीर्ण** — पुष्कळ दिवसांची, जुनी. **दिव्यांबरें**—किंमतीचीं वस्त्रें. **मातलीं** — माजलेलीं.

**श्लोक १३**—दशरथाबरोबर कोण कोण स्वारी चालले, त्यांचीं नांवें दिलीं आहेत. **भूपाळ**—दशरथानें. **नरवाहनीं**—पालखींत, मेण्यांत. **जे सृष्टिकर्ते**—ज्यांच्या अंगांत दुसरी सृष्टि निर्माण करण्याचें सामर्थ्य होतें. **सरिसे**—बरोबर. **पुजे**—पूज्य. **श्लोक १४**—पुनः घोड्यांचें वर्णन. **दुलदुलें**—घोड्याचा एक अलंकार. **गर्जन**—हेषारव, खिंकाळणें. **भूगोळ इ०**—पृथ्वीदेखील त्यांच्या खिंकाळण्याच्या आवाजानें खचे. **मुक्तें**—मोत्यांनीं. **पाखर**—घोड्याची झूल. **मोहाळी**—घोड्याचा लगाम. **सिरताज**—डोक्यावरचा एक अलंकार. **साज सडका**—गळ्यांतल्या दागिन्याच्या रेशमी गोंड्यासकट दोऱ्या, चवऱ्या. पहा—' ढळतु फरारे पताका । मिळतु चवॅर सडका । '—शिशुपालवध १०१७. ' कलाबतूच्या सडका '—ऐतिहासिक लेख—राजवाडे पुरवणी पत्र. ९।५०५. **कंडे**—कंठा तु कंठभूषा स्यात्—राजव्य. कोश ५.५५. **पटा**—स्यात् लगामपटा त्वश्वमुखभूषणनामकः—

राजव्य. कोश—५।५६. तुलनार्थ पहा—सर्जे तोडर पाखरा सजहुमे कंडे .पटे चांगले-सामराज रु. हरण ३।४५. **राजती**—शोभती.

**श्लोक** १५ — आणखी घोड्यांच्या जाती. **बोर**—काळसर, तांबूस रंग; बोरासारखा घोडा. याचे प्रकार दोन :— तेल्या बोर व तांबडा बोर. पहा— 'भला घोडा अस्सल काबूरचा लाल बोर टाकमतुर्की' — परशराम लावण्या. **चितोड**—घोड्याचा एक रंग. पांढऱ्या अंगावर तांबडे ठिपके असलेला घोड्याचा प्रकार. **नीळ**—नील कर्कः परिज्ञेयः ( राजव्य. कोश ) **तुरकी**—वल्गनः स्मृतः ( राजव्य. कोश ). one who gallops, दुडकी चालीचा. **पंचकल्याण**—गुडघ्यापर्यंत पांढरे पाय, व तोंडावर पांढरा पट्टा असलेला घोडा. हा शुभ असतो. **सारंगा**-Dark bay-coloured horse. **जरदे**—जरदा नाम पाटलः ( राजव्य. कोश ). **कुमाइत** — शामलस्तु कुमैतः स्यात् ( राजव्य. कोश ). **तोडर** — वाळे. **नभ इ०** — आपल्या खुरांनीं जणु आकाशांत उडी घालतात. **पुट** - पुढा. घोडा विकत घेतांना एका घोड्याबद्दल योजावयाचा शब्द. येथें 'घोडे' या अर्थी. **पर्वती** – पर्वतीयस्तु टांकणः ( राजव्य. कोश ). उंच घाट चढण्यास योग्य घोडा." **नृपतिनें** – दशरथानें. **श्लोक** १६ – घोड्यांचें शरीरवर्णन. **लांगूळ** – शेपट्या. **कुक्षिभाग** – कंबर. **दुघडीं** – दोन्ही बाजूंनीं. **लाक्षा** – लाखेच्या रंगानें, आळत्याच्या रंगानें. **रत्नखलीन** – रत्न-खचित लगाम. **तंगिले** – बांधले. **दांडी** – घोड्याचे शेपटीचा बुडखा. घोडे इतके पुष्ट व भरलेले होते कीं, त्यांच्या कानापासून तों शेपटीपर्यंतचा भाग सारख्या पातळींत दिसत होता. **धवळ** – पांढरे. ते इतके पांढरे कीं, जणुं दुधानेंच धुतले आहेत असें वाटावें. **जे इ०** – ते इतके वेग-वान् कीं, ते पाण्यावरून चालले तरी त्यांचे खूर आकाशांत असल्यानें, ते पाण्यांत बुडण्याची भीतीच नव्हती.

**श्लोक** १७-घोडेस्वारांचें वर्णन. **राउत**-घोडेस्वार. **टोप**—शिर्षण्य नामकः- ( राजव्य. कोश ), मस्तकावरील चिलखत. **शरीरबंध**—अंगाला

बांधलेल्या कवचांनीं युक्त. **थारले**—उभे राहिले. **पायांचे गण**-पदाति, पायदळ. **असिलता**—तरवारी. **मार्जी**—कंबरेला. **सारसनें**-सारसनं= A military girdle. पहा.—'सारशनं महानहि:-किरातार्जुनीय-१८।३२. **चवरें**—नगाईच्या केसांचे झुबके. **श्लोक १८**—यांत दशरथाच्या स्वारींतील हत्तीचें वर्णन आलें आहे. **दुरस्त**—योग्य नीट. **शूळदशनी**—भाल्यासारख्या टोंकदार दांताचे. **चौढोल**-अंबारी. **चित्रांबरी**-चित्रविचित्र वस्त्रें घातलेले. **शाष्ट्यायन**—(स. षष्टिहायन), an elephant (sixty years old)—Apte. पहा—" शाष्ट्यायन भद्रजाती। पट्टासनें दिव्य हस्ती। वसुदानें ओपिले हातीं। ऐरावतासारिखे ". ॥ २२४ ॥ मुक्तेश्वर-सभापर्व. **पुष्करी**—हत्ती. **गुढरिले**—आच्छादलेले, वर अंबारी घातली आहेत असे **श्लोक १९-संपदाशीळ**-संपत्तिमान्. **श्रावणारी**-श्रावणाचा शत्रु, दशरथ. दशरथाकडून अजाणता श्रावणाचा वध झाला होता. म्हणून कांहीं त्याला श्रावणाचा शत्रू म्हणतां येणार नाहीं. **हारी**—रांगा. **सुपर्णा**—गरुडाला. दशरथाच्या पताका एवढ्या उंच होत्या की, उंच भरारी मारणाऱ्या गरुडाला त्यांवर बसावेंसें वाटावें !

**श्लोक २०**—दशरथ हा राजकारणी मसलतींत नेहमींच सज्ज असल्यानें, वास्तविक त्याला हीं बाह्य राजचिन्हें धारण करून वचक बसवण्याचें कांहींच कारण नव्हतें. तथापि त्यानें सिंह, शार्दूल, मत्स्य यांचीं कीर्तिमुखें सेनेपुढें धरलींच होतीं. त्या सिंहादिकांचे डोळे अग्निकुंडाप्रमाणें जाज्वल्य होते. सेनेपुढील अशा मुखांच्या चित्रांनी सेनेचें भयंकर स्वरूप ध्वनित होई. **मंत्र**—मसलत, गुप्त खलबत. **श्लोक २१. मेघडंबर इ०**—डोक्यावर मेघाचें छत असणारा शंकर जसा शोभतो तसा डोक्यावर छत्र धारण करणारा दशरथ शोभला. **आतपत्र**—छत्र. पहा 'एकातपत्रं जगतः प्रभुत्वं नवं वयः कांतमिदं वपुश्च "—रघु. २. **रविपत्रें**—सूर्यपानें. सूर्याची आकृती वर काढली आहे अशी अबदागीर. **जगत्रें**—जगत्रयें.

**श्लोक २२** – सैन्याची आघाडी वर्णिली आहे. **यंत्रें** – तोफा. कांहीं उंटाच्या पाठीवर तर कांहीं हत्तीवर लादलेल्या होत्या. **सेनामुखीं** – सैन्याच्या तोंडाला, अघाडीला. **पायांचे** – पदाति, पायदळ. **वेताळ** – वेत्रधारी भाट बिरुदावळी गात होते. **शक्रादि इ०** – ज्याला इंद्रादि देव देखील भीत होते. **श्लोक २३**—ही स्वारी पहावयास देव, गंधर्व वगैरे येतात. **गजस्कंधीं** – हत्तीवर. **नरयानीं** – पालखींत. **पुरपती** – राजे. **पहाया इ०** – दशरथाला पहायला लोक जमले होते.

**श्लोक २४**—अनेक प्रकारचीं वाद्यें तेथें वाजत होतीं. **तुरें**—वाद्यें. **भेरी**—नौबत. **दमामे**–मोठे नगारे. **नफेरी**—पडघम. **शृंगे**—शिंगें. **बुरंगे**—एक वाद्य. **चौंडुके** - तुणतुणें. **झल्लरी**—झांज, टाळ. **रंगे**—रंग आणी. तुलनार्थ पहा–प्रभाव हा कोण दमामयाचा । नभस्थळी शब्द तमाम याचा ॥ कर्णे नफेऱ्या बहु वाजताती । नादें दिशा सर्वही गाजताती. ॥ १६८ ॥ प्रभाव तो थोर नगारियाचा । वर्णीतसे नाद नगारि याचा ॥ वाजेति ते थोर महातुतारे । ज्यांच्या स्वनें सांडति शत्रु तारे. ॥ १६९ ॥— नागेश–सीतास्व. **श्लोक २५—चमू**—सेना. पहा—पश्यैतां पांडुपुत्राणां आचार्य महतीं चमूम् '—गीता. **सरिसि**—बरोबर. **श्लोक २६**–वाद्यांचे अनुकरणात्मक आवाज. **भबुकार–भुभुःकार** **दोन्ही दळें**-दशरथ व जनक यांचीं सैन्यें. **यंत्राचे** – तोफांची सरबत्ती होत होती. **मार्तंड** – सूर्य. **पायाचे गण** – पायदळ. **प्रजीं** – लोकांनीं. रस्ता लोकांनीं खच्चून भरला होता. **श्लोक २७** – पुनः हत्तीचें वर्णन दिलें आहे. **अंदू** – हत्तींच्या पायां-तील सांखळी. **सिंदूर वदनीं** – ज्यांच्या तोंडावर ( सोंडवर ) सेंदूर माखला आहे. **इंदुदशनीं** – शुभ्र दंतावर रत्नें झळकत होतीं. **गळद्गंड इ०** – गळणाऱ्या गंडस्थळावरून मद गळत होता. **महावंत इ०** – असे हे हत्ती पाठीवर अंबाऱ्या व महात घेऊन होते. **श्लोक २८** – **असंभाव्य** – कल्पनातीत. **थाटें** – समुदाय. **निनादेति इ०** – रथ हे चाकोरींतून

मोठ्यानें आवाज करीत चालले होते. **पथीं १०** – सेना मार्गानें जात असतां रथाच्या चाकोरीला मुजवून टाकीत होती.

**श्लोक २९** – **संनद्ध** – तयार. **भार** – सैन्य. **करूनिशानें** – करून शान असा गोंगडा प्रयोग, 'केल्यानंतर' या अर्थी येथ योजिला आहे. **राजा** – जनक. **तगटी** – भरजरी. **कोतल** – कोतवाली घोडा. शृंगारलेला घोडा ( मिरवणुकीचा ). पहा – 'कोतल नर कोतवाल वारण मगनमस्त किल करित।' **श्लोक ३०-कटक** – सैन्य. पहा – 'हें कटक सोड तिकडे चाल तुझ्या हरुनि गोधना खळ तो' ॥ मोरोपंत-उत्तरगोग्रहण. **उभाविले**- उभारले. **पटकूट**—तंबू. **जानवसा**—परगांवाहून आलेल्या वधू किंवा वरपक्षाकडच्या मंडळीस उतरण्यासाठीं दिलेली जागा. **नियम** – नियोजलें या अर्थी. **श्लोक ३१-चळथा** – समुदाय. पण 'चळथा' हा शब्द जनसमुदाय या अर्थी वापरीत नाहींत. पहा – 'सदा उच्छिष्टांच्या उचलसि असंख्यात चळथा'—सामराज, रु. ह. ६।१५२. **जगतिपतिंच्या**— राजांच्या. **क्षेम** – आलिंगन. **अनुसंधान** – योग्य संबंधपूर्वक. **श्लोक ३२**–जनकाला भरत हा रूपानें रामाप्रमाणें वाटला व शत्रुघ्न हा लक्ष्मणाप्रमाणें भासला. **रेखिला** – तसाच लक्ष्मणासारखा प्रमाणबद्ध. जनकाला ही भरतशत्रुघ्नाची जोडी पाहून विस्मय वाटला. ते दोघे अगदीं रामलक्ष्मणाप्रमाणेंच असल्यामुळें, हे आणखी दुसरे रामलक्ष्मण कोठले आले, असें राजाला वाटलें. **भेटावयाकारणें** – भेटण्यासाठीं. **श्लोक ३३** – जनक राजा विश्वामित्राजवळ भरतशत्रुघ्नाबद्दल पृच्छा करतो. दुसऱ्या तिसऱ्या ओळींत विश्वामित्राचें जनकाला उत्तर आहे. **जावळे** – आवळेजावळे. **कैकै**—कैकेयी. तिच्यापासून दशरथाला भरत-शत्रुघ्न हे आवळेजावळे पुत्र झाले.

**श्लोक ३४** – येथें जनक राजा आपल्या भावाची व त्याच्या दोन मुलींची हकीकत सांगतो. **सुधन्वा** – "इंद्रदेशाचा राजा. यानें सीरध्वजासमीप

सीतेविषयीं मागणें केलें असतां, त्यानें सांगितलें कीं, माहेशचापाचा माझ्या प्रतिज्ञेप्रमाणें भंग कर म्हणजे सीता मी तुला देतों. ती गोष्ट हा मान्य करीना, व त्यामुळे जनकही त्याला सीता देईना. म्हणून यानें मोठ्या सेनेसहित येऊन मिथिलेस वेढा दिला, व जनकास व त्याच्या प्रजेस त्रास दिला. त्यावरून जनकाला क्रोध येऊन त्यानें याशीं युद्ध केलें व यांस ठार मारलें, आणि याची राजधानी जी सांकाश्या नगरी, तींत आपला भ्राता कुशध्वज याची स्थापना केली." हा सुधन्वा आपलें राज्य व सीता यांचे हरण करावयास आला असतां आपण त्याला मारून त्याचें राज्य आपल्या भावाला कसें दिलें त्याची कथा जनक राजा सांगतो. **कुशध्वज**—ह्रस्वरोमा नामक जनकाच्या दोन पुत्रांतील दुसरा, सीरध्वज जनकाचा कनिष्ठ बंधु. हा इंद्रदेशाचा राजा असून, मांडवी व श्रुतकीर्ति या दोघी याच्या कन्या होत. सीरध्वजाला पुत्र नव्हता म्हणून हाच पुढें मिथिलेचा राजा झाला होता. **कन्या दोनि** – त्या कुशध्वजाला दोन कन्या आहेत. त्या या भरत शत्रुघ्नांना अनुक्रमें, पत्नी होतील. त्या दोन कन्यांचीं नावें, अनुक्रमें मांडव्या व श्रुतकीर्ति अशीं होतीं. **श्लोक ३५** – जनक आतां भरतशत्रुघ्न व रामलक्ष्मण यांना कोणत्या कन्या कशा-कशा द्यावयाच्या तें सांगतो. मांडव्या ही भरताला व श्रुतकीर्त ही शत्रु-घ्नाला, तसेंच उर्मिला ही लक्ष्मणाला तर सीता ही रामाला. म्हणून 'आतां शुभ लग्नवेळ निश्चित करा.' असें जवळ असलेल्या ऋषींना जनकानें सांगितलें. **श्लोक ३६** —आतां यांच्या विवाहाचा मुहूर्त सांगितला आहे. **उत्तरा फाल्गुनी** – उत्तरा फाल्गुनी नक्षत्रावर. पहा – 'उत्तरे दिवसे ब्रह्मन्फल्गुनीभ्यां मनीषिणः । वैवाहिकं प्रशंसंति भगो यत्र प्रजापतिः ॥१३॥– रामायण बालकांड ७२. **मध्यमे यामिनीं** – रात्रीच्या मध्यभागीं. यावेळीं लग्न निश्चित केलें.

**श्लोक ३७** – विवाहाच्या वेळीं वधुवरांच्या कुळांचा नामोच्चार होतो. त्याप्रमाणें येथें रामाच्या सूर्यवंशाचा व जनकाच्या कुळाचा पूर्व-

जाबद्दल पुनरुच्चार केला आहे. सूर्यापासून मनु झाला, त्यालाच इक्ष्वाकु अशी संज्ञा आहे. पुढें पृथु, उत्तानपाद, ध्रुव, धुंधुमार, मांधाता, मुचकुंद, व हरिश्चंद्र हे सूर्यवंशांत राजे झाले. श्लोक ३८—यापुढ सूर्यवंशाचे आणखी राजे सांगून दशरथ पर्यंतची वंशावळ पूर्ण केली आहे. रुक्मांगद, धर्मांगद, अंबरीष, सगर, भगीरथ, ककुत्स्थ, दिलीप, रघु, अज, व दशरथ असे हे राजे झाले. पहा, रामायण – बालकांड – ७०. श्लोक ३९ – आतां या श्लोकात अहिल्येचा ज्येष्ठ पुत्र शतानंद, हा जनकाचा उपाध्याय या नात्यानें जनकाची वंशावळ सांगता. निमि-या राजाचा मुलगा जनक. याची वंशावळ फारशी लांबलेली नाही. श्लोक ४० – याच लग्नाच्या वेळीं भरताचा मामा त्याला भेटायला आला. त्याला दशरथानें लग्नसमारंभाला राहवून घेतला. युधाजित् – कैकय देशाचा राजा अश्वपति याचा पुत्र. दशरथस्त्री कैकेयीचा भ्राता. रामलक्ष्मणादिकांचे मिथिला नगरींत विवाहसमारंभ झाले, त्यावेळीं हा तेथें आला होता व पुढें अयोध्येस गेल्यावर यानें भरत-शत्रुघ्नाना स्वदेशीं नेले होतें. गोत्रज—आप्तसंबंधी. स्थानांतरीं – निरनिराळया जागीं. श्लोक ४१. लग्नविचार – विवाहनिश्चय. जनक लग्ननिश्चय करून व दशरथाची अनुज्ञारूपी फुलें घेऊन आपल्या मंडपांत आला. शेवटच्या दोन ओळींत आपली पुढील कथा ऐकण्याबद्दल विठ्ठल कवि श्रोत्यांना नम्रप्रणामेंच विनंति करतो.

...×...

# सर्ग सातवा



राम व जानकी यांचा विवाहविधि पूर्ण होऊन ते सपरिवार अयोध्या नगरींत प्रवेश करतात, हा कथाभाग प्रस्तुत सर्गांत आला आहे. लग्नांतील बारीकसारीक विधी व मंगलाष्टकें यांचें वर्णन नागेशाप्रमाणेंच विठ्ठलानें केलें असल्यानें, तें थोडेफार ठराविक ठशाचेंच वाटतें. तथापि मध्यंतरीं त्यानें दाखविलेल्या बहुश्रुततेंत त्याच्या व्यक्तित्वाचें अल्पसें दर्शन होण्यासारखें आहे. **श्लोक १.** सीता ही पूर्वावतारीं वेदवती होती, नंतर ती पृथ्वीची व मिथिलेच्या जनक राजाची मुलगी होऊन ती सीता या नांवानें प्रसिद्ध झाली. ही सीता जर गंगा असें मानलें, व लक्ष्मणभार्या उर्मिला जर यमुना मानली, तर त्यांच्या संगमाचें जें स्थल प्रयाग क्षेत्र, त्याची उपमा जनकराजालाच देणें योग्य होय. शिवाय प्रयागावर गंगा-यमुनांच्या संगमांत तिसऱ्या सरस्वती नदीचा गुप्त प्रवाह मिळून तेथें त्रिवेणी संगम होतो अशी जशी एक भाविक कल्पना आहे, तिला अनुसरून कवि म्हणतो कीं, सीता–उर्मिलारूपी गंगा-यमुनांच्या प्रवाहांत कवीची वाणीरूपी सरस्वती मिळून प्रस्तुत काव्यांतही त्रिवेणी संगम झाला आहे. **योग**–संगम. **श्लोक २–पुण्याहवाचन**–विवाहादि मंगलकार्यांतील प्रारंभीचें कर्म. यांत यजमान व त्याची पत्नी यांच्याकडून ब्राह्मणद्वारा "स्वस्ति पुण्योऽहं" इत्यादि मंत्रांचें वाचन होतें. **नृप**–जनक. **अजराजपुत्रें**–दशरथाकडून. **हळदि लावणें**–विवाहाचे वेळीं वधूवरांना प्रथम हळद लावून मंगलस्नान घालतात तो विधि यावरून विवाह होणें असा याचा अर्थ झाला. **वोहरांतें**–वधूवरांना. **निर्जरांतें**–देवांना. पहा–अजरा निर्जरा देवाः–अमरकोश. **श्लोक ३**–यांत आणखी बारीकसारिक विधी दिले आहेत. **नांदीश्राद्ध**—उपनयन—विवा-

हादि मंगल कार्यांचे प्रारंभीं पितरांना उद्देशून करावयाचें श्राद्ध. पहा— " नांदीश्राद्ध देवकविधान । केलें ब्राह्मणानें पूजन. ॥ एकनाथ. रु. स्व. ५।२१. **देवकविधान**—विवाहादि कार्यांच्या आरंभीं गणपति, सप्त मातृका वगैरेंचें पूजन करून स्थापना करावयाची असते त्यांस म्हणतात. **गोदानें**-गोप्रदानें. गाईचें दान. **साक्षपीं**—साक्षेपानें, आस्थेनें. **त्यापेक्षां**-जनकापेक्षां. **वोळला**—प्रसन्न झाला. जेथे जगोद्धारक परब्रह्मरूपी रामच पुत्र होऊन दशरथावर प्रसन्न झाला होता, तेथें काय कमी असणार ? **मेधा**—बुद्धि, भक्ति. रामाच्या पदकमलीं जिची भक्ति होती. वनलक्ष्मी जशी कुंजाकडे जातांना शोभते, तशी सुमेधा राणी रामाकडे रुखवत घेऊन जातांना शोभली. **रुखवत**—लग्नांत नवरामुलगा वधूच्या घराकडे लग्नासाठीं जाण्यांपूर्वी वधूपक्षाकडून वराच्या घरीं त्याला व त्याच्यां स्नेह्यांना जो उपहार देण्यांत यतो, तो. क्वचित् हा समारंभ वरप्रस्थाना-नंतर वधूमंडपांतही करतात. ( शब्द. को. ) **सीमांतपूजा**—नवरदेवाची गांवच्या सीमेवर किंवा देवळांत किंवा त्याच्या घरीं जी पूजा करतात ती. पहा—' राव समोर गेला त्याशी । केलें सीमांतपूजेसी ॥—एकनाथ, रु. स्वयं. ५।३२. सुमेधेनें रुखवत नेणें व सीमांतपूजा हे विधि केले. **श्लोक ५ अन्यांगनांसि**-इतर स्त्रियांना. **यानासमान**—वाहनाप्रमाणेंच. **शिबिका**-पालख्या. **गर्जेति इ**०—या वर्णनाची पुनरुक्ति विठ्ठलानें अनेक वेळां केली आहे. पहा—सर्ग, १।४६, २।११, ३।२, व त्यावरील टीपा.

**श्लोक ६**—जनक वरमंडपाला येतो. **विष्टरपदीं**—आसनस्थानीं. **श्लोक ७**—राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न असे चार वर असल्यानें तेथें चार चौरंग वरपूजेसाठीं लागले. **कुशध्वज**—हा भरतशत्रुघ्नांचा सासरा म्हणून त्यानें त्यांची वरपूजा केली. **दिव्यमूर्ती**—चार आचार्यांच्या तेजःपुंज मूर्ती. **वेदी इ**० चार वेदांत जसा ऋग्वेद श्रेष्ठ, तसा त्या चार भावांत राम श्रेष्ठ होता. **श्लोक ८**—**तेलवण**—तेलफळ. लग्न लागण्याचे पूर्वी

नवऱ्याकडून नवरीकडे पाठविलेलें तेल, वाडी खोबऱ्याच्या वाट्या, नारळ, हळदकुंकू. फराळाचें सामान, करंजा लाडू इ० सामान. लग्नापूर्वीचा आपुलकीचें व कौतुकाचें चिन्ह दाखविण्याचा हा पहिला प्रकार आहे. सुहृज्जापर्ण-जनकानें आपल्या मित्रमंडळींना वाढलें मावळला इ० — दिवस मावळून रात्र लागली त्यावेळीं, नवरे लग्नाकरीं जावयास निघाले. श्लोक ९—तुरंगयानीं - घोड्यावर. तुरांचे—वाद्यांचे. श्लोक १०-लग्न गात्रीं लागल्यानें दिव्यां व दारूकाम यांचें महत्त्व होतें. हिलाल—टेंभा, दिवटी. शरदिंदुज्योति—चंद्रज्योति. तुबक—तोफांची बंदुक. अंबुदनाद-मेघगर्जनेसारखे आवाज. बंदुकींचे आवाज मेघांच्या गडगडाटाप्रमाणें होत होते. पुरीकस—नागरीक. पैस —मोकळी जागा, मार्ग.

श्लोक ११—नवरे लग्नाला चालले त्या मिरवणुकींत घडलेला एक विनोदी, पण तत्त्वज्ञानांत परिणत होणारा प्रसंग कवीनें वर्णन केला आहे. रामाच्या या मिरवणुकीपुढें पिंगळा कलावंतीण ( वेश्या ) नृत्य करीत होती. तिचा धक्का एका संन्याशाला लागतांच, त्याला क्रोध चढून त्यानें आपल्या दंडानें तिला मारलें, व " तुम्ही बोलून चालून वेश्या, मग आमच्यासारख्यांना शिऊन आम्हांला विटाळ कां करतां ? " असें तो तिला म्हणाला. पण याचा कांहींच परिणाम न होता, ती वेश्या उलट त्याला हंसली. सर्वसंग-परित्याग करूनही विटाळ, शिवाशीव यासारखी अज्ञानी भेदवृत्ति त्या संन्याशाची राहावी, याबद्दल तिला उद्वेग वाटून ती उपहासानेंच हंसली. पिंगळा वेश्या असूनही तिची वृत्ति रामाच्या ठिकाणीं निमग्न झाल्यामुळें, तिच्या ठिकाणचा भेदवृत्ति नष्ट झाली होती. उलट संन्याशानें भगवी वस्त्रें घेऊनही त्याचें अज्ञान कायमच होतें. म्हणूनच येथें वेश्या व संन्याशी यांच्या वृत्तींतील विरोध मुद्दाम दाखविला आहे. बाह्य वेषावर आध्यात कांहींच अर्थ नाहीं. अभेदज्ञान होऊन भक्तींत रंगलेली एकादी वेश्या, सर्वत्र भेद मानणाऱ्या व वरवर भगवी वस्त्रें परिधान करणाऱ्या संन्याशाहून श्रेष्ठ होय;

हेंच तत्त्व कवीला या प्रसंगानें स्पष्ट करावयाचें आहे. श्लोक १२—म्हणून कवि म्हणतो, कीं जर चित्तशुद्धि होऊन समदर्शित्व अंगीं बाणलें नाहीं, तर संन्यास घेण्यांत फायदा नाहीं. जोपर्यंत मनुष्य नित्याच्या संसारांत, जागतिक व्यवहारांतच गुरफुटलेला आहे; जोपर्यंत त्याच्या वृत्तींत वैराग्य मुरलें नाहीं, तोपर्यंत त्याला परब्रह्मांत मिळून जाण्याचा मोक्ष प्राप्त होणार नाहीं. शिवाय आपण मेल्यावर आपणास मोक्ष मिळेल किंवा नाहीं अशा संशयांत जो पडतो, उभ्या आयुष्यांत ज्यानें मोक्षाला कारणीभूत होणारी समत्वबुद्धि मिळविली नाहीं, त्यालाच पापपुण्य किंवा विटाळ, शिवाशीव असले भेदाचे, अज्ञानाचे प्रकार सुचणार, व त्याला मग परमेश्वराची प्राप्ति कधींही होणार नाहीं. वास्तविक संन्यास घ्यावयाचा तो चित्तशुद्धीसाठीं, वसुधैव कुटुंबकवृत्ति अंगीं बाणण्यासाठीं, व हेंच खरें ज्ञान होय. अशी वृत्ति न होतां, बाह्य काम्यकर्मांतच ज्याची बुद्धि अजून रेंगाळत राहते, त्याला हें ज्ञान होणार नाहीं, व मग मोक्षही त्याच्यापासून लांबच राहणार. " शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः " असें समत्व बाणल्यावर, मग मरणोत्तर आपणास मोक्ष मिळेल किंवा कसें, याबद्दल शंका पडण्याचें कारणच नाहीं. कारण समत्व बाणलेला योगी जीवन्मुक्तच असतो. म्हणून हा माझा हा तुझा, हें पाप, तें पुण्य, हा ब्राह्मण तो चांडाळ, हे भेद अज्ञानी माणसाच्या ठिकाणीं संभवतात, व त्याला ब्रह्मप्राप्ति किंवा परमेश्वरप्राप्ति होणेंच शक्य नाहीं. सायुज्य—परब्रह्मांत मिळून जाण्याचा मोक्ष. विठ्ठलानें वरील दोन श्लोकांत वर्णिलेला वेश्या-संन्यासीप्रसंग, हा वास्तविक एकनाथांच्या रुक्मिणीस्वयंवरांतील श्रीकृष्ण रुक्मिणीच्या विवाहप्रसंगींच्या अशाच वेश्या-संन्याशाच्या तंटाप्रसंगाचा निवळ अनुवाद होय. पहा—" वेश्या आणि संन्यासी । मंडपवसणी होतसे कैसी । कोप आला श्रीपादासी । दंडें वेश्येसी ठोकिती ॥ २६ ॥ येरी विसरली देहासी । वृत्ती लागली कृष्णरूपासीं । रागें लाता हाणोनि तिसी । विटाळ आम्हांसि कां केला ॥ २७ ॥ येरी हांसोनि कपाळ पिटी । अजुन क्रोध न सांडी पोटीं । विटंबिली दंड कांसोटी । आत्मदृष्टी तुम्हां नाहीं ॥ २८ ॥ मी

उत्तम पैल हीन । विषयभेदाचे अळकन । सर्वांभूतीं समसमान । निजात्मज्ञान तुम्हां नाहीं ॥ २९ ॥ नाहीं निजशांती रोकडी । तंव कां केली तडातोडी । भगवीं नाशिलीं लुगडीं । उपाधि गाळी श्रीपाद ॥ ३० ॥ शेंडी सांडिली उपडोनी । वासना वाढविली चोगुणी । श्रीकृष्ण देखिलिया नयनीं । विटाळ मानी तो निजांध ॥ ३१ ॥ ऐसा करितां वाग्वाद । तंव दूरी अंतरला गोविंद । आडवा दाटला जनसंबंध । न दिसे मुकुंद सर्वथा. ॥ ३२ ॥ ”

**श्लोक १३**— वधूवरें मिरवत येऊन लग्नमंडपांत प्रवेश करतांनां राजाच्या नोकर लोकानीं आपणास खुशाली मिळण्याच्या इच्छेनें, पण थोड्या वेळेनें, मंडपाची दारें लावलीं, व ‘आम्हांला बक्षिसि मिळाल्याशिवाय आम्ही दारें उघडीत नाहीं.’ असा आशय प्रगट केला. त्यांना योग्य त्या देणग्या दिल्यावर त्यांनीं दारें उघडलीं. **निवाडें**—अखेर शेवटीं. **लिप्त केलीं**—लिंपणें—बंद-करणें—लावलीं, झांकलीं. **कवाडें**-दारें. **नृपवरदासीं**-राजाच्या नोकरानीं. **वोपिलें**—दिलें. ( वप् = देणें. ) **प्रमुदित**—आनंदित होऊन. **मुक्त केलीं**—उघडलीं. **श्लोक १४**— **वऱ्हाडी**—लग्नकार्यासाठीं जमलेली मंडळी. **अयोध्यापती**-दशरथ. **श्लोक १५**-**मधुपर्क**— विवाहसमयीं नवरा मुलगा दाराशीं आला असतां, किंवा तसाच कोणी सन्मान्य शिष्ट घरीं आला असतां, यजमान त्याचे पाय धुऊन त्याची पूजा करतात तो विधी. पहा— ‘वर वरिष्ठ कृष्णदेवो । मनीं धरूनि हाचि भावो । मधुपर्क विधी पाहा वो । पूजाविधान करीतसे ॥ ”—एकनाथ रुक्मिणी स्वयं. ३।५. **उभयकुळ इ.** — नवरानवरीकडच्या कुलोपाध्यायांना योग्य ती संभावना देऊन संतोषविलें. **श्लोक १६**—आतां लग्न घटका. **प्रतिष्ठित जळीं**— पाण्यांत ठेऊन. **घटिका**—घटिका पात्र. घटकापात्र पाण्यांत ठेऊन, लग्न घटका मोजण्याचें काम सुरू झालें. **संलग्न**—जवळ. लग्न घटका, नेमलेल्या मुहूर्ताची वेळ जवळ आली. **अंत्रपट**-नवरानवरीच्या मध्यें लग्नाचे वेळीं वस्त्र धरतात तें. “ पहा— “ कैंचा अंत्रपाट जाण । कवण म्हणेल सावधान ” ॥—एकनाथ रुक्मि

स्व. ४११. तसेंच "सीताराम उभी करी हिंव मधें त्या अंवपाटा वरी."—नागेश—सीतास्व. ४०७. गणिकीं—ज्योतिष्यांनीं, जोशांनीं. तूष्णी-स्तब्ध.

श्लोक १७—येथून मंगलाष्टकें सुरू होत असून, पहिलें मंगलमूर्ति गणेशाला अनुलक्षून आहे. मत्तेभानन—मदोन्मत्त हत्तीचें मुख आहे ज्याला असा गजानन. षट्पदा इ.—दानोदकानें सारखा गळत आहे, व म्हणून भृंगांनीं व्याप्त असा ज्याचा कपोलप्रांत आहे तो. पाश—फांस. वराभयांकुशपदा—ज्याच्या हातांत भक्तांना द्यावयाचा वर, अभय व अंकुश आहेत. काव्यसंग्रहाची 'वराभ त्या कुशपदा' ही ओळ चुकीची व अशुद्ध पडली आहे. संहृष्ट—आनंदित. कटीं-कंबरेला कडदोरा व वस्त्र. निडळीं—कपाळावर तिसरा डोळा व अर्धा चंद्र. कंठीं—गळ्यांत साप. 'कुर्यात् सदा मंगलम्' हें प्रत्येक मंगलाष्टकाचें ध्रुपदच म्हणावयास हरकत नाहीं. श्लोक १८—विष्णूला संबोधून. उपविष्ट—बसलेला आहे असा. रत्नज्योति—तेजःपुंज रत्नांची. आलापनें—गायनांतील ताना. तुंबर—प्राधेच्या गंधर्वपुत्रांतील एक. याची स्त्री रंभा होती. हा चैत्रमासीं सूर्यासमागमें संचार करणाऱ्या गणांतील गंधर्व होय. ऊपनें—तोंडानें. श्लोक १९--शंकराच्या स्तुतिपर. वामांगीं—डाव्या बाजूला. नगजा—पार्वती. कुमार—कार्तिकस्वामी, शंकराचा मुलगा. वामान्य-भागीं-डाव्याच्या दुसऱ्या बाजूला, उजवीकडे. दुजा—दुसरा प्रकार. पार्वती डाव्या बाजूस असणें हें शंकराचें पहिलें उपलक्षण, तर उजवी-कडे कुमार असणें हें दुसरें. आस्यें पंच—ज्याला पांच तोंडें आहेत. शंकराला पंचानन म्हणतात. पहा 'पंचानन मनमोहन मोहन सुखकारी'—गोसावीसुत, आरती शंकराची. गजाजिनांबर—हत्तीचें कातडें हेंच ज्याचें वस्त्र आहे असा. पहा—'स कृत्तिवासास्तपसे यतात्मा—' कुमारसंभव १।५४. तिजा—हें तिसरें वैशिष्ट्य. दिग्गुप्त—ज्याचे दहा हात दाहीं दिशांत गुप्तपणें राहिलेले आहेत. शंकराला दहा

हात आहेत पण ते गुप्त आहेत. **गंगामूर्ध्नि**—डोक्यावर गंगा. पहा—' मस्तकिं गंगा तेणें शुभांगा " **अजानुबाहु**–गुडघ्यापर्यंत पोचणारे हात आहेत असा. **पुरारी**–मयासुरानें निर्मिलेल्या तीन पुरांचा संहारकर्ता. **नक्तप**–चंद्र. ज्यांच्या कपाळावर चंद्र आहे असा. **जाश्वनीळ**–शंकर. असा शंकर मानवांचे सदा मंगल करो.

**श्लोक** २०—आतां सूर्याच्या स्तवनपर मंगलाष्टक येतें. **स्यंदन**—रथ. ज्याचा रथ एक चाकाचा. **भुजगी** इ०—जो रथ सापाच्या बळकट दोरानें वेढलेला आहे. **सप्ताश्वी**—सात घोड्यांनीं जो रथ युक्त आहे. म्हणूनच सूर्याला सप्ताश्व म्हणतात. पहा—' सप्ताश्व तेथे बहु पे दिसावे '–सामराज. रु. इ. **छायेसीं** इ०—जो सूर्यनारायण नेहमीं छायेसह असलेला दिसतो. छाया, सावली ही सूर्याला कधींही सोडीत नाहीं, म्हणून त्याला छायानायक म्हणतात. पहा—' छायानायकसा निदाघसमयीं छाया धरी तो विधू '–रघुनाथपंडित. नलदम. २८. **कीजे स्वस्ति**–असा सूर्यनारायणा. करून वधूवरांना ' स्वस्ति '—( कल्याण ) केलें जावो. **श्लोक** २१–येथे देव ऋषि, गंधर्व, किंनर, यक्ष, राक्षस, विद्याधर, पितर इत्यादिकांच्या तुष्टयर्थ रचलेलें मंगलाष्टक येतें. **सनक सनंदन**–सर्व महर्षींच्या पूर्वी ब्रह्मदेवानें जे सनक, सनत्कुमार, सनत्सुजात व सनंदन असे चार मानसपुत्र निर्माण केले, त्यांतील पहिला व शेवटचा. **हाहा**—कश्यपापासून प्राधेस झालेल्या गंधर्वांतील एक. हा प्रतिज्येष्ठ मासींच्या सूर्यासमागमें संचार करण्यास असतो. **हुहू**—चालू मन्वंतरींचा कोणी गंधर्व. देवळ ऋषीच्या शापानें हा जलामध्यें नक्र झाला होता. पुढें गजेंद्राच्या संबंधानें याचाही त्यासमागमें विष्णूनें उद्धार केला. **शेष**—पाताळांतील नाग. **श्लोक** २२–यांत कांहीं मातृकांचा व देवांचा नामनिर्देश झाला आहे, व त्यांना उद्देशून हें मंगलाष्टक रचलें आहे. **कौमारी**—ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी व चामुंडा, या सप्त मातृका पैकीं एक. **कमलालया** व **कमलजा**—ही लक्ष्मी.

चींच नांवें आहेत. **कामेश्वरी**—ही मदनाची स्त्री रती अशावी. **कालिका, काली, कात्यायनी**-हीं पार्वतीचींच नांवें आहेत. **कौमुदी**-चंद्राची प्रभा **कालरात्र**-अमावस्या. **कौळिका**-कुलपंचांधिना देवता (?) **कालकल्मषापहारिणी** -कलियुगांतील पाप हरण करणारी **कारुण्यकल्लोळिनी** - कारुण्याची नदी. अशा सर्व देवतांना विठ्ठल वंदन करतो. येथ अनुप्रास म.घला आहे.

**श्लोक २३ – वेदीच्या कलाशाति** – चौरंग्याच्या कडप्यावरील तांब्या. याराच महाकलश म्हणतात. लग्नांत गणपतिस्थापना अगोदर कीं कलशस्थापना अगोदर असा वाद ब्राह्मणांत असतो. नागेशानें आपल्या सीतास्वयंवरांत त्याचा उल्लेख केला आहे. पहा-" गृहांतोन पुरोहितें निज हतें, सीते पहा आणिलें । चौरंगावरि बैसवोन तिजशीं पूजेस आरंभिलें; ॥ तों तेथे द्विज फार भांडति अती, आधी गणेशस्थिती । कोणी ते म्हणती महाकळस हो, आधीं तयाची गती. ॥ ४०३ ॥ येथे " कलशाला सादर असा " असें सांगून, विठ्ठलानें अगोदर कलशस्थापना करण्याबद्दलचें आपलें मत किंवा पद्धति सांगून टाकली आहे. **श्लोक २४ – लक्ष्मीकांत** इ०—विष्णूच्या पदकमलाच्या चिंतनांत. **पूर्णांशें** इ० -लग्न मुहूर्ताची घटका भरली असतां, सावधान असणें जरूर असल्यानें, वाजंत्र्यांचीं वाद्यें थांबवावी. **श्लोक २५– ॐ पुण्यें** - ' ॐ पुण्योऽहं ' या अक्षरांनीं आरंभ होणाऱ्या मंत्राच्या उच्चारानें. **घाळिती** – डोक्यावर घालतात. **नवरे** – राम-लक्ष्मण–भरत–शत्रुघ्न हे चार नवरे. **जायांसि** इ० –आपल्या वधूसह शोभत होते. **प्राचीमुखीं** – नवऱ्यांची तोंडें पूर्वेकडे तर वधूंचीं पश्चिमेकडे. कारण वर–वधू समोरासमोर पाहिजेत. **नवरिया** – नवऱ्या, वधू.

**श्लोक २६—सुनचोति**—गुंफून. **वोहरा**—वधुवरांना. **अंबा शिंपणें**-लग्नात भिंतीवर काढलेल्या आंब्याच्या झाडावर नवरानवरी हळदीचें पाणी शिंपडतात, व मग एकमेकावर शिंपडतात, तो समारंभ.

**सप्तपदी**-लग्नांत वधूवरांनी तांदुळाच्या राशीवरून होमाच्या अग्नी. भवळून सात पावलें बरोबर चालण्याचा मुख्य महत्त्वाचा विधि. हा विधि झाल्यावर लग्न पक्कें होतें. **श्लोक** २७-हा श्लोक रामाच्या स्तुतिपर असूनही त्यांत ज्योतिष शास्त्रांतील १२ राशींचा उल्लेख मोठ्या खुबीनें केला आहे. विठ्ठलाला कूटश्लोक रचण्याची हौस असून, सीतावर्णनप्रसंगीं असाच बारा राशींचा न्यास त्यानें याच काव्याच्या पांचव्या सर्गाच्या वत्तिसाव्या श्लोकांत केला आहे. प्रस्तुत श्लोक, बारा राशींचें ज्ञान, पूर्वेतिहास, तारतम्य व थोडें शब्दज्ञान असल्याशिवाय लागणें कठीण आहे. काव्यसंग्रहाकारांना तो लागला नाहीं, म्हणून त्यावर टीका देतांना ते मुग्ध राहिले आहेत. शिवाय त्यांच्या प्रतींतील पाठही फार अशुद्ध आहेत. **नातु आदि**-राम हा आदि-राशीचा म्हणजे मेषाचा=अजाचा नातु आहे. राम हा अजराजाचा नातु होय. **अंतकेतनतनु**-अंत म्हणजे बाराराशींपैकीं शेवटची रास मीन ही होय. अंत=मीन, हें समीकरण स्वीकारून वरील शब्दप्रयोग 'मीनकेतनतनु' असा होऊन त्याचा अर्थ मदनाप्रमाणें शरीर आहे ज्याचें तो, असा होईल. श्रीराम हा मदनाप्रमाणें सुंदर शरीराचा आहे. **युग्मध्वजप्रीतिमान**-युग्म=दुसरी रास वृषभ ही होय. म्हणून वरील सामासिक शब्द 'वृषभध्वजप्रीतिमान्' असा होऊन, त्याचा अर्थ शंकराची प्रीति ज्याला प्राप्त झाली आहे असा. शंकर हा रामभक्त असल्यानें रामाला वरील विशेषण शोभणारें आहे. **एकादशकर्णरावणरिपुः**-- एकादश म्हणजे अकरावी राशि कुंभ होय. वरील समासांत 'एकादश' बद्दल 'कुंभ' घातल्यास, 'कुंभकर्णरावणरिपुः' असा शब्द होऊन, 'कुंभकर्णाचा व रावणाचा शत्रु, असा त्याचा रामाला शोभेसा वर्णनाचा अर्थ होतो. **दिक्कुंडलें दीप्तिमान्**-दिशा दहा आहेत. म्हणून दिक् बद्दल दहा शब्द आला, व त्यानंतर पुनः दहा य बद्दल दहावी राशि 'मकर' ही मांडली, तर 'मकरकुंडलें दिप्तिमान्' असा नवीन शब्द सिद्ध होतो, व त्याचा अर्थ राम आपल्या कानांतील मकराकृति-

कुंडलांनीं झळकत होता. **चौपृष्टीसम**—येथें ‘ चौपृष्ठासम ’ असा पाठ असावा. चौ=चौथी राशि कर्क. याप्रमाणें वरील शब्द ‘ कर्कपृष्ठासम ’ असा होऊन त्याचा अर्थ ‘ खेकड्याच्या पाठीप्रमाणें ’ असा होईल. **अष्टकीट-नवमें**—हाही शब्द ‘ अष्टकीटनवमा ’ असा असावा. अष्ट=आठवी राशि वृश्चिक व नवमा=नववी राशि धनु होय. या समीकरणाप्रमाणें वरील शब्दाची नवीन सिद्धि, ‘ वृश्चिककीटधनुला ’ अशी होऊन त्याचा अर्थ ‘ विंचवाप्रमाणें वांकड्या अशा धनुष्याला ’ असा होईल. **केलें त्रिधा**—तीन तेरा नऊ आठरा केलें, तीन तुकडे केलें. **पंचमें**—पांचवी राशि सिंह असल्यानें, पंचमें=‘ सिंहें, ’ असें समीकरण बसेल. एकंदरीनें या तिसऱ्या ओळीचा अर्थ असा:—या रामरूपी सिंहानें विंचवासारख्या वांकड्या अशा त्या धनुष्याचे, खेकड्याच्या पाठीप्रमाणें तीन भाग केले. रामानें धनुर्भंग केला. खेकड्याच्या पाठीचे जसे तीन भाग असल्यासारखे दिसतात, तसें त्या धनुष्याचे तीन तुकडे केले. येथें रामाच्या पराक्रमानें त्या धनुष्याची गत खेकड्याच्या पाठी-प्रमाणें त्रिधा होऊन म्हणजे त्याचे तीन तुकडे होऊन तें भंगलें, असा भावार्थ. **भूषष्ठीयुत**—भू म्हणजे पृथ्वी व षष्ठी=सहावी राशि कन्या. यावरून ‘ भू-कन्यायुत ’ असा तो शब्दप्रयोग होईल व त्याचा अर्थ भूकन्येसहित, भूकन्या सीता तिनें युक्त असें. **तिजें**=तिसरी राशि मिथुन. तें वधूवरांचें सीतायुक्त मिथुन अथवा जोडा, बोहल्यावरच्या कट्टयावर शोभला. सीतारामांचा तो जोडा बोहल्यावर शोभला, असा एकंदरीनें अर्थ. **नसे सप्तमें**—सातवी रास तूळ होय त्यामुळें ‘ नसे तुळें ’ असा तो शब्दप्रयोग होईल. सीतारामांचा तो जोडा इतका शोभला कीं, त्याच्याबरोबर तुलनेला दुसरा तसा नाहींच. द्वादश राशि कोणीकडून तरी या रामवर्णनपर श्लोकांत गोंवून टाकण्याचा हव्यास विठ्ठलानें येथें पुरवून घेतला आहे. यांत त्याचा कलतिबाज स्वभाव चांगलाच व्यक्त झाला आहे.

**श्लोक २८**—लग्नसमारंभ झाल्यावर राम आतां अयोध्येस जाण्याची अनुज्ञा जनकाजवळ मागतो. पण जनकानेंही उलट ‘ चवथा होम ’ करण्याची

आपली मनीषा व त्यासाठीं रामानें थोडे दिवस मिथिलेंत रहावें अशी आपली इच्छा प्रगट केली. त्याला रामानें 'मला यापुढें याहून मोठें काम आहे तरी राहतां येत नाहीं' असें सांगितल्यावर जनकानें भोजनोत्तर त्याला जाण्यास संमति दिली. **चतुर्थ होम**--चवथा यज्ञ. **प्रस्थान**--प्रवासास निघणें. **श्लोक २९**--यांत भोजनसमारंभाचें वर्णन आलें आहे. **काश्मीरोदक**--केशर घातलेलें पाणी. **माजनें**--मादनें=स्नानें. पहा-मातें गोकुळीं पाठविलें । तैं गोसावी मादनें वर्जिलें ॥-उद्धवगीता-१३९. सर्वांचीं स्नानें केशराच्या पाण्यानें झालीं. **मणिपयेळी**--अलंकरत्नांचीं ताटें. **अडणियां**--लहानशी तिवई. यावर जेवणाचे ताट मांडतात. पहा-'अडणीया पडीघे रत्नखचीतें परीयळ'-महदंबा-धवळे, उत्तरार्ध ६२. तसेंच 'मांडुनि स्वस्तिक सुवर्णपाट, अडणीवरि सोन्याचें ताट'। अमृतराय-कटाव. **सुमेधा**--जनकराजाची पत्नी. **अष्टौ सिद्धि**--'अणिमा महिमा चैव गरिमा लघिमा तथा । प्राप्ति प्राकाम्यमीशित्वं वशित्वं चाष्टसिद्धयः'. **नवजणी**--नवविधा भक्ति=श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन. जेथें अष्टसिद्धि पंक्तींत वाढीत होत्या व जेथें नवविधा भक्तीची दीपारति ओवाळली जात होती, तेथें समारंभांत कमीपणा किंवा असंतुष्टता येणार कोठून !

**श्लोक ३०**--भाज्या, रायतीं व पक्वान्नें. **शाखा**--शाका=भाज्या. **विस्तारिलीं**--मांडलीं, वाढली. रायतीं विविध प्रकारची असल्यानें त्यांची ओळ लांबच लांब होती पहा- ताट विस्तारिलें रुक्मिणी । भोजना उठतां चक्रपाणी ! आयकोनि द्रौपदीची वाणी । ताट हातें लोटिलें ॥ मुक्तेश्वर वनपर्व. ११।९५. **रायतीं-सांबारीं**--या वर्णनाला समानार्थक पहा--"अनेक परींच्या कोशिंबिरी । लवणशाका सहस्त्रवरी । कुटें आणी सांबारीं । रायतीं तेथें विचित्रें ॥ मुक्तेश्वर--सभापर्व--९।१३४. **परमान्न**--साखर व दूध घालून शिजविलेला भात. **वोगराळें**--मुदी पाडण्याचें अगर आमटी वगैरे वाढण्याचें पात्र. **वरान्न**--वरण. **क्षीरी**--खिरी.

**सद्यस्तप्त घृतें**—नुकतीच कढविलेली तुपें. पहा-- थिजलीं विघरलीं सद्यस्तप्त । नवनीताचीं चत्वारि घृतें । दुग्धसारें म्हणती हातें । होय परतें अमृता. ॥— मुक्तेश्वर-सभापर्व- ९।१२२. या श्लोकाच्या चवथ्या ओळीच्या मी स्वीकारलेल्या पाठांत 'मधू' हा शब्द आल्यानें त्याची द्विरुक्ति झाली आहे. पण ती टाळण्यासाठीं हस्तलिखिताचा तळ टीपांत दिलेला पाठ घ्यावा, तर त्याचा समाधानकारक अर्थ लागत नाहीं. **निर्भरा**- पुष्कळ. **श्लोक ३१- घृतपाचितें**- तुपांत तयार केलेलीं, तुपांत शिजविलेलीं. **अपोशन**- जेवण्याच्या आरंभीं 'अमृतोपस्तरणमसि स्वाहा' अशा मंत्रानें पाण्याचें आचमन घेतात तें. **सारिलीं**—घेऊन टाकलीं. **प्रतिपदीं**- पावलापावलाला, क्षणोक्षणीं, **तारतम्य**-विचारपूस. **श्लोक ३२**- जनक आतां आपला व्याहि जो दशरथ, त्याची पंचोपचार पूजा करतो. **त्रयोदशगुणी तांबूल**- सुपारी, पानें, चुना, कात, जायफळ, जायपत्री, वेलदोडा, केशर, कंकोळ, कापूर, लवंग, बदाम व खोबरें किंवा पिस्ते अशा १३ पदार्थांचा बनविलेला विडा. **नवरंग**- याचा अर्थ 'केशरी वस्त्र' असा 'राजवाडे--ग्रंथमाला' या आधारें शब्द-कोशांत दिला आहे. पण येथें 'लावी' हें क्रियापद पुढें असल्यानें, त्याचा अर्थ 'नऊ प्रकारचे रंग' असा असेल अशी शंका येते. 'अत्तर' असा त्याचा अर्थ कोठें सांपडल्यास तो युक्त होईल. 'नवरंगे' असें एक आडनांव आढळतें. डॉ. काशीबाई नवरंगे या कांहींना ऐकून ठाऊक असतील **ऐरणिपूजन**-लग्नात वरातींच्या पूर्वी वेळूच्या परडींत कणकीचे दिवे लावून व त्यांत उमामहेश्वरांची पूजा करून तें पात्र वरमातेस दान करतात. पण असें हें ऐरणीदान करण्यापूर्वीं त्या वेळूच्या परडीचें जें पूजन करतात तें. पहा 'भीमकें मांडलें विंदान । भव ऐरणी संपादन । कृष्णासी वंशपात्रदान । विधिविधान वेदोक्त ॥- एकनाथ रु. स्व. १६।१५८. **संपादिले**—यथाविधि केलें. **अजात्मज**-दशरथ. **पुटभेदनातें**—नगरास, अयोध्येस जावयास निघाला.

**श्लोक ३३**— चारी वधूवरें हत्तीच्या अंबारींतून चाललीं. त्यांच्या पुढें वाद्यें वाजत होतीं, पण जातांना वाटेंत त्यांना थोड्या वेळांत अपशकुन झाला. **चिन्ह**— या अपशकुनाचें लक्षण, स्वरूप. **प्रत्योतर**- प्रत्युत्तर= स्पष्टीकरण. रामानें आपल्या धनुष्याचा भंग केला हें ऐकून परशुरामाला राग आला व तो रामाशीं युध्द करण्यासाठीं येणार हें अपशकुनाचें कारण विश्वामित्रानें दशरथास पुढील भविष्य म्हणून सांगितलें. मूळ रामायणांत दशरथानें वशिष्ठाला अपशकुनांचें कारण विचारल्यानें त्यानें तें राजाला सांगितलें आहे. विश्वामित्र आपल्या आश्रमाला केव्हांच निघून गेला होता. **श्लोक ३४**—परशुरामाचें वर्णन. **कार्मुक**-धनुष्य. **द्वीतूण**-दोन भाते. **तो शापादपि** इ०-परशुराम हा आपल्या अंगच्या शाप देण्याच्या सामर्थ्यानें व शरसंधान करण्याच्या सामर्थ्यानें शत्रूंना ताप देणारा होता. शाप देणें हें ब्राह्मणाचें तर शरसंधान हें क्षत्रियाचें सामर्थ्य होय. परशराम हा ब्राह्मण असूनही त्याच्यांत हें ब्राह्म व क्षात्र तेज सारखेंच वसत होतें. महाभारतांतील " अग्रतश्चतुरो वेदाः पृष्ठतः सशरं धनुः । इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि ॥ " या द्रोणाचार्यांच्या वर्णनासारखेंच हें परशुरामवर्णन आहे. विठ्ठलानें प्रस्तुत श्लोक रचतांना महाभारतांतील वरील द्रोणवर्णनाचाच अनुवाद केलेला दिसतो. **क्षत्र्यांवरी**-इ० क्षत्रियांचा सिंह. परशुरामानें २१ वेळां निःक्षत्रीय पृथ्वी केली. म्हणून त्याला क्षत्रियकेसरी म्हटलें आहे. **भस्मोध्दूलित** इ० – भस्मानें मळलेलें आहे मस्तक ज्याचें असा. **लांछन**— इ० ज्यानें रुद्राक्षाची माळ आपलें एक चिन्ह म्हणून छातीवर धारण केली आहे. **मांजिष्टांबर**- तांबडें अथवा भगवें वस्त्र घेतलें आहे ज्यानें असा. **ब्रह्मदंड**—संन्याशाचा दंड, काठी. **रसना**-दोरी. **व्याघ्राजिनें**-वाघाचें कातडें. **उत्तरीं**-वर, अंगावर. ज्यानें अंगावर वाघाचें कातडें पांघरलें होतें असा. परशुरामाचा हा वेष अर्धा क्षत्रियाचा तर अर्धा संन्याशाचा होता.

**श्लोक ३५** – रामानें आपलें धनुष्य मोडलें म्हणून परशुरामाला राग येऊन तो रामाला जिंकायला म्हणून दत्त उभा राहिला. रामाव्यतिरिक्त सर्व त्याला भ्याले. **श्लोक ३६** – परशुराम रामापुढें आपली बढाई सांगतो. **तनुनयनवेळा** – तनु-एक व नयन=दोन. 'अंकानां वामतो गतिः' या न्यायानें, २१ हा आंकडा यावरून सिद्ध होतो. एकूण २१ वेळां असा अर्थ. "हे रामा ! मी आपल्या बाहुबलानें एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रीय करून ब्राह्मणकुलांत विजयी झालों आहे. मी माझ्या प्रतापानें राक्षसांच्या रक्तानें रणांत तर्पण केलें आहे. आतां तर या शिवधनुर्भंगाच्या प्रकरणांत तुझ्याशीं मी लढायला आलो आहे. **श्लोक ३७** – परशुरामानें रामावर सोडलेले बाण रामानें कसे परतविलें तें वर्णन. **भाळीं इ.** – ज्या बाणांच्या शिरावर ( भाळीं ) लांब अशीं बगळ्याची ( कंक ) पिसें आहेत, असे बाण परशुरामानें रामावर सोडले. **भुजातें तुळी** – परशुरामानें आपले दंड थोपटले. **बाणें इ.** – रामानें आपल्या हातांत धनुर्धाऱ्याचें अंगुस्तान ( गोधांगुळी ) चढवून, परशुरामाचे बाण आपल्या बाणानें मागें परतविले. **गोधांगुळी**–धनुर्धाऱ्याचें अंगुस्तान. हें घोरपडीच्या कातड्याचें असून, धनुष्याच्या दोरीपासून इजा होऊं नये म्हणून, हें डाव्या हाताला गुंडाळलेलें असतें. पहा–जरासंध पाहे हस्त विलोकुन । तो देखे गोधांगुळी चिन्ह ॥– हरिविजय ३३।७५ ( शब्दकोश ). **देखे इ०**—परशुरामानें रामाचा एक निराळाच प्रताप पाहून तो त्याला 'तूं माझ्याशीं झुंजणारा असा कोण ?' असें म्हणाला. **सर्वज्ञ इ०**—रामानें परशुरामा उत्तर दिलें, 'तूं सर्वज्ञच आहेस, मी कोण आहे हें तुला ठाऊक आहे.' **श्लो. ३८**–राम आतां आपली आपणच ओळख करून देतो. **श्रीकौशिकें** – विश्वामित्र ऋषीनें. **आम्ही इ०**—"आम्हीं रविवंशांतले वीर, ब्राह्मणावर शस्त्र धरीत नाहीं, व तशी आमच्या गुरुची आम्हाला आज्ञाच आहे. तूं तर ब्राह्मणच आहेस, म्हणून मला तुझ्यावर शस्त्र उचलावयाचें नाहीं. तूंच आतां माझा शिरच्छेद कर" असें म्हणून रामानें आपलें शिर परशुरामापुढें केलें.

श्लोक ३९ — राम परशुरामाला आणखी सविनय बोलतो. "हे स्वामी ! ( महाराज ! ) मी आपल्यास सांगतो कीं, माझ्याकडून युद्ध म्हणाल तर घडणारच नाहीं. देवा ! तुमच्यापुढे सर्व राजे लोक भिकाऱ्याप्रमाणें सुदैव तुच्छ आहेत. आम्हां क्षत्रियांचें धनुर्बळ एकपट, तर महाराजांचें बळ आमच्याहून नऊ पट अधिक ( आगळें ) आहे. शिवाय आपण आपल्या यज्ञोपवीतानें ( जानव्यानें ) सामर्थ्यवान् आहां. आपल्या ब्राह्मण्यांचें बळ अधिक आहे तें निराळेंच." अशी कोंवळीं ( सविनय ) वाणी राम बोलला.
श्लोक ४० – इकडे चमत्कार असा झाला कीं, परशुरामाचा भाताच रिकामा झालेला त्याला आढळला. त्यांतले बाणच नाहींसे झालेले ! मग तो आपलें धनुष्य नुसतेंच लडबड असें हालवूं लागला. रामापुढें त्याचें कांहींच चालेनासें झाल्यानें परशुराम गांगरून गेला, गोंधळला. हडबडणें — गोंधळणें. रामानें त्याचें शिवधनुष्य मोडलेंच होतें. म्हणून आतां आपल्या जवळील वैष्णव धनुष्य रामापुढें करून 'तेंही आतां मोड व तुझ्या बळाची थोरवी काय ती मला रणांगणावर दाखीव' असें तो रामाला म्हणाला.
श्लोक ४१ — परशुरामानें पुढें केलेलें वैष्णव धनुष्य राम आतां मोडणार, इतक्यांत परशुरामानें त्याचा हात मध्येंच पकडला व एका रामानें ( परशु रामानें ) दुसरा राम ( दाशरथी राम ) मोठ्या प्रेमानें हृदयाशीं धरला. पुढें "हें तुला योग्य असें वैष्णव धनुष्य घे' असें म्हणून परशुरामानें तें रामाला दिलें, व अयोध्येला जाण्यासही आज्ञा दिली. रामादि बंधू मग मिरवत आपल्या नगरीला गेले.

श्लोक ४२--राजपुत्र आपल्या नवपरिणीत वधूंसह नगर प्रवेश करणार म्हणून अयोध्यानगरी शृंगारण्यांत आली होती. **कापडिलीं**— कापडणें = कापडानें मढविणें. **उभाविल्या**—उभारल्या. **दृष्टीं इ.**—दृष्टीचं पारणं फिटलं., समाधान झालं. **चौबारें**—चव्हाट्यावर. **बिदीं**—राजरस्त्यावर. **हाटवटिया** बाजार केले. श्लोक ४३—अमृतनगरी—मोक्षपुरी.

पश “ अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवंतिका । पुरी, द्वारवती चैव सप्तैते मोक्षदायकः ॥ ” यांतच अयोध्या येते. काश्मीराचे-केशराचे. महाद्वारीं इ०--प्रत्येक दरवाजांवर गजाननसारख्या मंगलमूर्तींची व जलपूर्ण कलशांची स्थापना करण्यांत आली होती. नवरे--ते चार नवरे व चार वधू. श्लोक ४४-- आतां वधूवरांचा गृहप्रवेश व घरभरणी वर्णन केली आहे. हे समारंभ लग्नाच्या शेवटचे आहेत. भरतजननी--कैकयी. महालक्ष्मी करणें--गृहप्रवेशानें नवऱ्या मुलीला सासरीं आणल्यानंतर दांपत्याकडून केलेली लक्ष्मीची पूजा. गृहभरुनि घेती--घरभरणीचा समारंभ डोळ्यांनीं पाहून घेतला. घरभरणीं--पतीच्या घरीं वधूचा प्रथम प्रवेश होतांना करण्याचा विधि, वरात. येथेंच हें आख्यान संपलें असें कवि जाहिर करतो.

श्लोक ४५-युधाजित् – हा कैकय देशाचा राजा अश्वपति याचा मुलगा, व कैकयीचा भाऊ. यानें आपले भाचे भरत शत्रुघ्न, अश्वपतीचा मोड करण्यासाठीं कैकय देशाला नेले. भरत-शत्रुघ्नांच्या मदतीनें युधाजितानें आपल्या वडिलाकडून राज्य घेतलें. वृद्धसंमतें—जुन्या परंपरेप्रमाणें वागणूक लावून दिली, रामानें वृद्ध व अनुभविक मुत्सद्यांच्या मताप्रमाणें वागावें, असा नियम घालून दिला. वाल्मिकादित—वाल्मीकि ऋषीनें सांगितलेलें. विठ्ठलानें प्रस्तुत सीतास्वयंवर हा ग्रंथ वाल्मीकिरामायणांतील बालकांडाच्या १८-७७ अध्यायांच्या आधारें रचिला आहे.

श्लोक ४६ – कवि येथें आपलें गोत्र, व गांव इत्यादि आत्मचरित्रपर माहिती देतो. विठ्ठलकवि आश्वलायन शाखेचा ऋग्वेदी ब्राह्मण असून बीड परगण्याखालीं येणारें गौरीपुर हें त्याचें राहण्याचें ठिकाण होय. त्याचें गोत्र कौशिक असून, श्रीरामाची उपासना हा त्याचा नित्याचाच परिपाठ होऊन बसला आहे. म्हणूनच त्यानें सीतास्वयंवराची रामचरित्रांतील कथा

आपल्या काव्यासाठीं निवडली. आपल्या काव्याच्या वाचनानें लोकांचें कल्याण होवो अशी इच्छा कवि प्रगट करतो. **श्लोक ४७** – या शेवटच्या श्लोकांत विठ्ठलानें प्रस्तुत काव्याची रचना, शक, संवत्सर, मास, तिथि, काव्याची श्लोकसंख्या व सर्गसंख्या इत्यादि देऊन, आपल्या हातून कांहीं दोष घडले असल्यास त्याबद्दल वाचकांची क्षमा भाकली आहे. प्रस्तुत काव्य शालिवाहन शके १५९९, पिंगल संवत्सरीं रामनवमी दिवशीं पूर्ण झालें. यांतील श्लोकसंख्या ३६३ असून, सर्गांची संख्या ७ आहे. **नान्यथा** – या शिवाय दुसरें कांहीं मागणें नाहीं, फक्त दोष मात्र क्षमा करा.



# कठिण शब्दांचा कोश

अ

अंगद—बाहुभूषण.
अंघ्रि—पाय.
अध्वर—यज्ञ.
अनवट—पायांच्या अंगठ्यांत घालण्याचा रुप्याचा दागिना.
अर्यमा—सूर्य.
अलकेश—कुबेर.
अवधारणें—ध्यानांत धरणें.
अवरजा—कनिष्ठ भगिनी.

आ

आटणें—थिजणें.
आटाळ्या—गच्च्या, माळे, मनोरे.
आटोपणे—सांभाळणें.
आतपत्र—छत्र.
आदान—मिळवावयाचें तें.
आधोरण—महात.
आर्जव—खुषी, मेहेरबानी.
आवर्तन—प्रदक्षिणा.
आशंका—भीति.

इ

इंद्रगोप—तांबड्या मखमली रंगाचा पावसाळी किडा.

उ

उडुगण—नक्षत्रें.
उगला—उगीच.
उद्यापन—व्रताची समाप्ति.
उद्रस—ओस.
उपरि—माडी.
उपल—दगड.
उपहत—शापित.
उमाणण—झाडा घेणें.
उलथा—संस्कार.
उलंडणें—कलंडणें.

क

कंटाळणें—त्रासणें.
कदन—युद्ध.
कनकअंबर—पीतांबर.
कराळ—भयंकर.
कर्णधार—नावाडी.
कळकुंबा—दांडगा.
काचावणें—खचणें.
कापडी—कावड घेऊन तीर्थयात्रा करणारा.
कांक्षी—संशयी.
किंकिणी—घागऱ्या.
कु—पृथ्वी.

**कुसुमधनुष** — मदन.
**केयूर** — बाहुभूषण.
**कोकनद** — तांबडें कमल.
**कोटीर** — रत्नमुगुट.
**कोतल** — कोतवाली घोडा.

**ख**

**खगपति** — गरुड.
**खुळगा** — रेडा.

**ग**

**गंगावणी** — गंगेचें पाणी.
**गुढरणें** — आच्छादणें.
**गोत्रज** — आप्त.
**गोधांगुळ**-धनुर्धाऱ्याचें अंगुस्तान.
**गोपुर** — मुख्यद्वार.
**गौ** — वाणी.

**घ**

**घवघावित**-ठसठशीत, सुंदर.
**घाव घालणें**-वाजविणें.

**च**

**चंड**-मोठें.
**चतुष्पथ**-चव्हाटा.
**चमकणें**-दचकणें, बहरून जाणें.
**चवणें**-पडणें.
**चवरें**-चवऱ्या.
**चवरडोली**-अंबारी.
**चळथा**-समुदाय.
**चक्षुकानी**-वासुकी, सर्प.
**चाटे**-कापडाचे व्यापारी.
**चांचर**-चंचल.
**चार करणें**-बडबडणें.
**चौडुंक**-तुणतुणें.

**ज**

**जांबूनद**-सुवर्ण.
**जावळे**-आवळेजावळे.
**जेठी**-मल्ल

**झ**

**झल्लरी**-झांज, टाळ.
**झळंबणें**-चिकटणें.
**झिडकणें**-धुडकावणें.

**ड**

**डाजणें**-डांचणें.

**ढ**

**ढेंसणें**-दडपून भरणें.

**त**

**तगटी**-भरजरी.
**तंगणें**-बांधणें.
**तपन**-सूर्य.
**ताळ**-इमारतीचा मजला.
**तिंबणें**-ओलें होणें.
**तुंदिल**-मोठ्या पोटाचा.
**तुबक**-तोड्याची बंदूक.
**तुरें**-वाद्यें.
**तुरंबणें**-बांधणें, खोंवणें.
**तूण**-भाता.

तेलवण-तेलफळ.

तोडर-पायांतील दागिना.

थ

थारणें-उभे राहणें.

द

दंड—शिश्न.

दंदी-वैरी, बांदी.

दनुज-राक्षस.

दशकंधर-रावण.

दाटणें-गच्च भरणें.

दाटित-घट्ट, तंग.

दिनमणि-सूर्य.

दुणावणें-दुप्पट होणें.

दुंदुभी-नगारा.

दुरस्त-योग्य, नीट.

दुरित-पाप.

दुर्बाध-प्रत्यवाय.

दुलदुले-घोड्याचा अलंकार.

देव्हारा चौकी-देवघरांतला चौरंग.

ध

धारणा-धैर्य.

न

नक्तप-चंद्र.

नफरी-पडघम.

नागर-सुंदर, सुरेख.

नाचणी-नृत्यांगना.

नावकरी-नावाडी.

निकर-समूह.

निकें-योग्य, चांगलें.

निडळ – कपाळ.

निदानें—शेवटचीं, निश्चित.

निमासुर – सुंदर.

निवणें—संतोषणें.

निशाण—नगारा.

निक्षेपणें – ठेवणें.

नीड—घरटें.

प

पट-रेशमी वस्त्र.

पटकूट – तंबू.

परिणणें-विवाह करणें.

पारिधी-सभोंवार.

परिरंभणें-आलिंगणें.

परिसणें-ऐकणें.

पर्यळ-तबक.

पाकशासन-इंद्र.

पाचारणें-विचारणें.

पारद-पारा.

पालाणणें-खोगीर घालणें.

पिनाक-धनुष्य.

पिसारणें-खवळणें.

पुटभेदन-नगर.

पुरा करणें-मारणें.

पुराणी (पुरवणी)-मोत्यांची माळ.

पुष्करी-हत्ती.

पोतिपाणी—मोत्यांच्या कंठ्याचें तेज.
पोल्हार—पायाच्या अंगठ्यांत घालण्याचा दागिना.
प्रांतीं—शेवटीं.

ब

बत करणें—खेद करणें.
बाबणें—ठसणें.
बाहणें—बोलावणें.
बिरुद—कीर्ति.
बीद—रस्ता.
बुजणें—समजावणें.
बुरंग—एक वाद्य.

भ

भर्ग—शंकर.
भव—शंकर.
भाउक—हित, कल्याण.
भांबडभूत—पिसाट.
भार—सैन्य.
भाविनी—पुढें होणारी.
भूदेव—ब्राह्मण.

म

मंजु—कोमल.
मढिवणें—सजविणें.
मतंगिणी—हत्तीण.
मंत्र—मसलत.
मथाक—घुंघुरटें.
महामारी—जिवापाड श्रमान.
महावंत—महात.
माज—कंबर
मांडखुटी—वीरासन.
मातणें—माजणें.
मातुलिंग—म्हाळुंग.
मांदुस—पेटी.
मार्तंडपत्र—सूर्यपान.
मुकुर—आरसा.
मुक्तें—मोतीं.
मुखरणी—मुख्य, प्रमुख.
मुद्रिका—अंगठ्या.
मुहुर—घर्म.
मूळ—आमंत्रण.
मृगमद—कस्तुरी.
मृगांक—चंद्र.
मेघडंबर—छत.
मेदुर—जाड, मोठा.
मोहाळी—लगाम.

य

यावा—डौल.

र

रसना—कडदोरा.
राजणें—शोभणें.
रूपरेखा—अंगलट.

ल

ललाम—भूषण.

**लाघव**—विनय.
**लांगूल**—शेपूट.
**लाडकोडें** - लाडीगोडीनें.
**लिखित**—पत्र.
**लुति**—लूत, एक त्वग्रोग.
**लेखा**—हिशेब, गणति.

**व**

**वसति**—मुक्काम.
**वांकी**—पायांतला दागिना.
**विचारणें**—विचार करणें.
**विजणें**—वारा घालणें.
**विटंबिणें**—नष्ट होणें.
**विनियोग**—व्यवस्था.
**विपिन**—अरण्य.
**विरंची**—ब्रह्मदेव.
**विलंबी**—लोंबणारा.
**विषम**—वांकडे.
**विष्टर**—आसन.
**विसावणें**—स्थिरावणें.
**विसंबणें**—विसरणें.
**वेताळ**—वेत्रधारी.
**वोगराळें**—मुदी पाडण्याचें व आमटी वगैरे वाढण्याचें पात्र.
**वोपणें**—देणें.
**वोळग**—सेवा.
**वोळणें**—प्रसन्न होणें.
**वोहर**—वधूवर.

**श**

**शची**—इंद्राणी.
**शतक्रतु**—इंद्र.
**शरासन** - धनुष्य.
**शाठ्यायन**—साठ वर्षांचा.
**शिबिका**—पालखी.
**शुद्धि**—शोध.
**शूळ**—भाला.

**स**

**संगर**—युद्ध.
**सप्ताश्व**—सूर्य.
**समीरण**—वारा.
**सरिसे**—सारखे.
**संसद**—सभा.
**साजसडका**—गळ्यांतल्या दागिन्याच्या रेशमी गोंड्यासकट दोऱ्या, चवऱ्या.
**साटोप**--नेटानें.
**सामावणें**—पोटांत घालणें.
**सारणें**--घेऊन टाकणें.
**सारसन**--लष्करी कंबरपट्टा.
**सितच्छद**—हंस.
**सिरताज**-डोक्यांतला एक अलंकार
**सुताविणें**—गुंतविणें.
**सुपर्ण**—गरुड.
**सेटे**—बाराजारावरील अधिकारी.
**सोपान**—जिना.

**संनद्ध**—तयार.
**संपादणें**--करणें.
**स्यंदन**—रथ.
**स्वार होणें**—निरोप देणें.
**स्फुराण**--धडधडाट.
**स्मेर**—हास्य.

**ह**

**हडापिणी**—विडे देणाऱ्या.
**हारिखणें**—हर्षणें.
**हल**--नांगर.
**हळू होणें**—हलकी होणें.
**हाटवटी**--बाजार पेठ.
**हारी**—रांग.
**हेलावणें**--हेलकावणें.
**हृद**--डोह.

**क्ष**

**क्षमा**—पृथ्वी.
**क्षेत्र**—पत्नी.
**क्षेम**—आलिंगन.

## टीका व साहित्यचर्चा

| | | |
|---|---|---|
| वाङ्मयविहार | प्रो. फडके | १॥ रु. |
| साहित्य आणि संसार | ,, ,, | १॥। ,, |
| कोंदण | ,, ,, | ३ ,, |
| गोकर्णीचीं फुलें | वि. स. खांडेकर | २॥ ,, |
| धुंधुर्मास | ,, ,, | १॥ ,, |
| हिरवे कंदील | अनंत काणेकर | २॥ ,, |
| आस्वाद | प्रो. पंगु | २॥ ,, |
| तुषार | ,, ,, | २॥। ,, |
| प्राचीन मराठी कविपंचक | ,, ,, | २॥ ,, |
| वाङ्मयविलास | ग. त्र्यं. माडखोलकर | २ ,, |
| तीन तपस्वी | प्रभाकर पाध्ये | २ ,, |
| खांडेकर चरित्र आणि वाङ्मय | प्रो. मा. का. देशपांडे | ३॥ रु. |
| साहित्याचे मूलधन | कालेलकर | १। रु. |

## संकीर्ण

| | | |
|---|---|---|
| मानसमंदिर | प्रो. ना. सी. फडके | २॥ रु. |
| हिरवळ | वि. स. खांडेकर | १। ,, |
| शिंपले आणि मोती | अनंत काणेकर | १॥ ,, |
| मुक्तेश्वर वनपर्व | प्रो. द. सी. पंगु | ४॥ ,, |
| गलोल | शामराव ओक | २ ,, |
| अवार्चीन पंचकन्या | बा. गो. नाईक | २ ,, |
| मनाचे संकल्प | प्रो. म. ना. अदवंत | २॥ ,, |
| रा. ब. काने व साने | ग. र. इनामदार | २॥ रु. |